शिवराम महादेव परांजपे

# स्वातंत्र्य-सूक्तें

'काळा'तील निवडक निबंधांचा संग्रह



संग्राहक : अनंत अंबादास कुलकर्णी

प्रस्तावना : डॉ. के. ना. वाटवे,
एम्. ए., पीएच्. डी.

कॉण्टिनेण्टल् प्रकाशन, पुणें २

# अनुक्रमणिका


संग्राहकांचे ‘दोन शब्द’ ... चार व पांच

शिवरामपंतांची वाङ्मयी मूर्ति (प्रस्तावना) ... सहा–अठ्ठेचाळीस

१. काळ ... ... १

२. ईश्वर विभु आणि नित्य आहे ... ... ६

३. डेक्कन कॉलेजला पाहून केशवरावांच्या मनांत आलेले विचार. २१

४. ईश्वराची लीला अगाध आहे ... ... ३०

५. धर्मकल्पनांचा परिणाम ... ... ३९

६ दिल्लीचें तख्त आणि भाऊसाहेबांचा पण. ... ... ४९

७. स्वयंवर व संकुल युद्ध. ... ... ६०

८. उच्च पर्वताच्या उच्च शिखरावर ... ... ६८

९. शिवाजीचें पुण्याहवाचन ... ... ८०

१०. ब्लॅक होल ... ... ९४

११. जसे लोक तसे त्यांचे देव ... ... १०५

१२. मंगळ ... ... ११४

१३. सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली [illegible] ... ... ११८

१४. अर्जुनाचा वेडेपणा ... ... १२५

१५. शिवाजीची एक रात्र ... ... १३५

१६. जोसेफ मॅझिनी : आत्मचरित्र व राजकारण ... ... १४६

१७. माझ्या पर्वता ... ... १५६

१८. भासाची भवितव्यता ... ... १६२

# दोन शब्द :

'**स्वातंत्र्य-सूक्तें**' हा 'काळां'तील निवडक निबंधांचा संग्रह तयार करतांना संग्राहकानें कोणती दृष्टि ठेविली आहे याविषयीं दोन शब्द लिहिणें आवश्यक आहे. शिवरामपंतांचें एकंदर निबंधलेखन अफाट आहे. इ. स. १८९८ ते १९०८ या दहा वर्षांत 'काळ' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या आपल्या लेखांतून कांहीं महत्त्वाच्या लेखांची निवड खुद्द शिवरामपंतांनींच केली होती. तीं निवडक निबंधांचीं दहा पुस्तकें इंग्रजी राजवटींत त्या वेळीं लगेच जप्त झालीं. पण पुढें कॉंग्रेस सरकारनें, सत्ता हातीं येतांच, त्यावरची जप्ती उठविली, आणि ते सारे भाग जसेच्या तसेच श्री. य. गो. जोशी यांनीं प्रकाशित करून मराठी वाचकांची फार दिवसांची अत्यंत उत्कट इच्छा पुरी केली.

या दहा भागांतील कोणत्याहि एका भागांत, त्या भागांतील सर्व निबंध लक्षांत घेऊनहि, शिवरामपंतांचें सारें वैशिष्ट्य पूर्णपणें दिसून येतेंच असें म्हणतां येणार नाहीं. काळाच्या ओघांत अभिरुचि भिन्न झाली आहे, वाङ्मयमूल्यें बदललीं आहेत, आणि पंतांच्या महत्त्वाच्या लक्ष्यांचा तर हल्लीं अजिबात पत्ताच नाहीं. अशा जमान्यांतहि शिवरामपंतांचें सारें वैशिष्ट्य व त्यांच्या लेखनकलेचें शाश्वत रूप ज्यांमधून प्रतीत होईल असे कांहीं निवडक निबंध प्रस्तुत संग्रहांत संग्राहकानें समाविष्ट केले आहेत.

अर्थात् ही निवड संग्राहकाच्या वैयक्तिक अभिरुचीची आहे. तिला पृष्ठांचीहि मर्यादा आहे. त्यामुळें पंतांचे सर्वच चांगले निबंध या संग्रहांत आले आहेत असें नाहीं. परंतु शाळा-कॉलेजांतील विद्यार्थ्यांना व मराठी भाषेच्या उपासकांना पंतांच्या वाङ्मयमूर्तीचें सम्यक् दर्शन या संग्रहाच्या वाचनानें व्हावें असा नम्र हेतु ही निवड करतांना संग्राहकानें ठेवलेला आहे. तसें दर्शन कांहीं अंशीं तरी होतें असें रसिक वाचकांस वाटलें तर तो गौरव निवडीचा नसून मूळ निबंधांचा आहे. त्याचें सारें श्रेय संग्राहकाला नसून मूळ निबंधकाराला आहे.

गुरुवर्य डॉ. नानासाहेब वाटवे यांच्या बोलण्यांत ज्या ज्या वेळीं शि. म. परांजपे व त्यांचें वाङ्मय त्यांचा उल्लेख होई त्या त्या वेळीं तो अत्यंत आदरानें झालेला मीं ऐकला होता. टीका करतांना एखाद्या कलाकृतीकडे किती रसिक, सहानुभूतिपूर्ण व चोखंदळ दृष्टीनें डॉ. वाटवे पाहात हें मीं अनुभविलेलें होतें. आधाराशिवाय डॉ. वाटवे यांनीं कधीं कसलें विधान केल्याचें मला स्मरत नाहीं. या संग्रहाची कल्पना सुचतांच मी सरळ त्यांच्याकडे गेलों.

'प्रस्तावना लिहा' अशी विनंति करण्याची माझी ही दुसरी खेप होती. मला दुसऱ्या वेळींहि नकार देणें कदाचित् त्यांच्या भिडस्त मनाला बरें वाटलें नसावें. पण यापेक्षां शिवरामपंतांच्या निबंधांचें जबर आकर्षण डॉ. वाटवे यांना विशेष होतें. म्हणूनच त्यांनीं मला चटकन् होकार दिला असें मला वाटतें. त्यांचे आभार मानून मोकळें होण्याइतके त्यांचे—माझे संबंध औपचारिक नाहींत.

डॉ. वाटवे यांची प्रस्तावना वाचून, सूक्तकाराला साजेसाच भाष्यकार मला लाधला असें म्हणण्यांत रसिक माझ्याशीं सहमत होतील अशी माझी खात्री आहे.

ज्यांच्या परवानगीवांचून या कामाला सुरुवात करणेंच दुसऱ्या एखाद्यास अशक्य झालें असतें त्यांच्याकडे तर मी पुस्तकच पुरें करून घेऊन गेलों. भाऊसाहेब म्हणाले, "माझ्याकडून परवानगी मिळणारच या गाढ विश्वासानें तूं पुस्तक छापलें आहेस, तेव्हां आतां व्यावहारिक कांहीं गोष्टी ठरवावयाच्या असतील तर तो अधिकार माझ्यावर असलेल्या तुझ्या विश्वासाचा आहे. तुला परवानगी दिलेली आहे. तुला काय वाटेल तें ठरव." असे पूल्य ज्येष्ठ स्नेही श्री. य. गो. जोशी यांचे मी नुसते आभार कसे मानूं?

**अ. अं. कुलकर्णी.**

# शिवरामपंतांची वाङ्मयी मूर्ति

## पंतांची प्रत्यक्ष मूर्ति !

इ. स. १८९८ ते १९०८ या दहा वर्षांतील 'काळ'कर्त्या शिवरामपंतांची चालती-बोलती मूर्ति ज्या सभाग्यांनीं प्रत्यक्ष पाहिली त्यांच्या मनश्चक्षूंना ती अद्यापहि दिसत आहे ! ती त्यांची भव्य, निकोप, नीटस, गोरीपान आणि उंचीपुरी देहयष्टि, त्यांच्या मस्तकावरील ती मोतिया रंगाची पगडी, त्यांच्या अंगावरील तो पेशवाई घेरदार अंगरखा, त्यावरील तें रुईफुलकांठी उपरणें, त्यांच्या कानांतील ती टपोऱ्या मोत्यांची भिकबाळी, त्यांच्या हातांतील ती रुपेरी मुठीची काठी; गंभीर, करारी पण मिस्किल स्मितानें सदैव उजळलेली ती मुद्रा; प्रज्ञा, पांडित्य आणि प्रतिभा यांच्या एकत्रित तेजानें चकाकणारे ते नेत्र, अन्त:करणांतील उत्कट स्वातंत्र्यभक्ति व क्रान्तीचे ज्वलन्त विचार सर्व घेऊन कंठापर्यंत आलेली पण पुढें फिरत्या कारंज्यांतील जलधारेप्रमाणें वक्रोक्तीच्या विविध छिद्रांतून मनोहरपणें प्रकट होणारी त्यांची ती अमोघ वाणी,—थोडक्यांत बोलावयाचें तर राजकारणाच्या विषारी कालियाडोहांत खवळलेल्या आणि दडपशाहीचे फूत्कार चौफेर टाकीत असलेल्या इंग्रज सरकारच्या डोक्यावर — वाणीची आणि लेखणीची मुरली वाजवीत — तांडव नृत्य करणारी बालकृष्णाच्या उग्रमनोहर मूर्तीसारखी ती त्यांची मूर्ति अद्यापहि त्या भाग्यवंतांना दिसत आहे. तिनें आपल्या लवचिक कण्ठांतून काढलेला, भावनेच्या लाटांबरोबर चढउतार करणारा, सहस्रसहस्र श्रोत्यांना मंत्रमुग्ध बनविणारा तो आवाज — तो व्यंजक ध्वनि — त्यांच्या मन:कर्णांना अद्यापहि ऐकूं येत आहे !

## 'काळा'वरहि मात

पण—शिवरामपंतांच्या भौतिक मूर्तीचा 'तो ठसा स्वहृदयांत पडावा' असें मनापासून इच्छिणाऱ्या त्यांच्या भक्तांची पिढी आतां हळूहळू मावळूं लागली आहे. त्या मूर्तीच्या दर्शनाचा आनंद — त्यांच्या तोंडून का होईना — चाखण्याचें भाग्य पुढीलांना इतउत्तर लाभणें अशक्य होऊं लागलें आहे; व कांहीं कालानंतर शिवरामपंतांचें सर्वच भौतिक जीवन

महाराष्ट्राच्या गतइतिहासांतील एक पान होऊन बसणार आहे. परंतु ' काळ '-कर्त्या शिवरामपंतांची भौतिक मूर्ति जरी त्या काळानेंच नष्ट केली असली तरी त्यांनीं निर्माण करून ठेवलेली आपली वाङ्मयी मूर्ति तिच्या अजर व अमर गुणांनीं ' काळा 'वरहि मात करणारी आहे. याच दहा वर्षांत आपल्या ' काळा 'मध्यें त्यांनीं जे निबंध लिहिले त्यांच्या पानोपानीं स्वतः शिवरामपंत भरून राहिले आहेत. आणि या शिवरामपंतांची ही निबंधमूर्ति पुढील पिढ्यांना अखंडपणें आणि अगदीं जवळून न्याहाळावयास मिळणार आहे, ही मोठी समाधानाची गोष्ट होय.

**माणूस म्हणजे हृदय, डोकें नव्हे !**

कोणत्याहि चांगल्या वर्तमान-पत्राचा यशस्वी संपादक त्याच्या लेखांच्या रूपानें थोडाफार चिरजीवी होतो. आणि गणिती, इतिहासकार, अध्यात्मशास्त्रकार व रसायनशास्त्रवेत्ते हेहि आपली वाङ्मयी मूर्ति आपल्या-मागें ठेवून जातात. मात्र या अर्थानें शिवरामपंतांची मूर्ति मागें शिल्लक राहिली आहे असें मी म्हणत नाहीं. वस्तुनिष्ठ दृष्टीनें जगाकडे पाहून मानवी व्यवहार व भौतिक सृष्टि यांच्यासंबंधीं कांहीं सिद्धान्त आपापल्या ग्रंथांत ग्रथित करून मानवी ज्ञानांत भर घालणारे प्रज्ञावन्त हे अजरामर आहेत हें खरेंच आहे. त्यांच्या ग्रंथमूर्ति मागें राहतात, व त्या सदैव वंद्यच आहेत. पण निव्वळ प्रज्ञावंताचें जें मागें राहतें ती त्यांची प्रज्ञाच. आणि प्रज्ञा हा माणसाचा फार तर एक गौणांश असतो. खरा आणि सबंध माणूस म्हणजे त्याची बुद्धि नव्हे. ' Man is not, in any sense, primarily an intelligence, he is a system of interests, intelligence helps man, but does not run him ' असें आय्. ए. रिचर्डस् म्हणतो तें खरें आहे. मग खरा व संपूर्ण माणूस कोठें व कशांत दडलेला आहे ? तो कोठें सांपडेल ?, या प्रश्नाचें उत्तर रीबो या मानसशास्त्रवेत्त्यानें दिलें आहे. तो म्हणतो, ' Man is hidden in the heart and not in the head.' ' संपूर्ण मानव त्याच्या हृदयांत दडलेला आहे, डोक्यांत नाहीं.' शिवरामपंतांची संपूर्ण मूर्ति त्यांच्या निबंधांत साकार होऊन राहिली आहे, असें विधान करतांना मला सांगावयाचें आहे कीं, त्यांच्या लिखाणांत – इतर वस्तुनिष्ठ लेखकांप्रमाणें–त्यांचें

नुसतें डोकेंच शिल्लक राहिलेलें नसून' त्यांत त्यांचें भावनोत्कट अन्तःकरण, त्यांची संवेदनशीलता, त्यांच्या जिव्हाळ्याच्या वासना, त्यांच्या आवडी-निवडी, त्यांचे गुणदोष, त्यांची कल्पना, त्यांची अन्तःस्फूर्ति – थोडक्यांत बोलावयाचें तर त्यांचें संपूर्ण भावजीवन – म्हणजेच सगळे शिवरामपंत – ओतप्रोत भरून राहिलेलें आहे.

### वर्तमानपत्री लिखाण चिरंजीव कां झालें ?

वर्तमानपत्री निबंध म्हणजे तात्कालिक महत्त्वाचें वस्तुनिष्ठ व नाशवंत लिखाण अशी आपली सर्वसामान्य समजूत असते. पण शिवरामपंतांचें लिखाण या वर्गांत पडणारें नव्हे. त्यांचें लिहिणें आत्मनिष्ठ होतें. शिवरामपंत हे हाडाचे कवि, मराठी गद्य-काव्याचे प्रभावी प्रवर्तक; आणि तात्कालिक घटनांना आपल्या अगाध पांडित्यानें आणि अफाट कल्पनेच्या किमयेनें चिरंतन रूप देणारे जादूगार. म्हणून त्यांच्या या तेजस्वी व्यक्तिमत्त्वानें अन्तर्बाह्य नटलेलें त्यांचें लिखाण अविनाशी झालें. अशा या तेजस्वी लिखाणांतील निवडक भागाचा परिचय करून घेण्यासाठीं आपल्याला त्या लिखाणाच्यामागें असलेल्या शिवरामपंतांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाची, त्यांच्या अंतरींच्या जिव्हाळ्याची ( System of interests), त्यांच्या अंतःकरणाची – म्हणजेच पारतंत्र्याच्या घोर निराशेच्या रात्रीं स्वातंत्र्याची पवित्र आणि काव्यमय सूक्तें गाऊन उषःकालाची ललकारणी देणाऱ्या या थोर उद्गात्या ऋषिकवीची – थोडी ओळख करून घेतली पाहिजे.

### व्यक्तिमत्त्वाची घडण

इ. स. १८६४ मध्यें महाड येथें एका सुविद्य व सुसंस्कृत कुलांत शिवरामपंत जन्माला आले. जन्मतःच निसर्गानें उदार हातानें त्यांच्या पदरीं शारीरिक व मानसिक गुणसंपदेचें ' देणें ' भरपूर ओतलें होतें; आणि बाह्य परिस्थितीनें त्या देणगीचा पूर्ण विकास करण्याचें जणों काय योजून ठेवलें होतें ! त्या योजनेप्रमाणें तिनें भावनात्मकता, कल्पकता, अवखळपणा, बुद्धिमत्ता इत्यादि त्यांच्या आनुवंशिक गुणबीजांचा विकास तन्मयतेनें केला. कोंकणचें सृष्टिसौंदर्य त्यांच्या कवित्वाला स्फुरवीत होतें. महाडनजीकचा रायगड त्यांच्या मनांत शिवशाहींतील स्वातंत्र्याच्या

उत्तुंग कल्पना चाळवीत होता, आणि रत्नागिरी हायस्कूलमधील त्यांचे एक शिक्षक - मराठीचे शिवाजीच – त्यांच्या मनांतील स्वातंत्र्यप्रीतीच्या रोपट्यांची जोपासना एखाद्या ' मालाकारा 'प्रमाणें करीत होते. पुण्यानजीकचा तानाजीचा सिंहगड व पुण्यांतला शनिवारवाडा त्यांचीं ऐतिहासिक स्फुरणें चेतवीत होते. तर नजीकच असलेलें ' न्यू इंग्लिश स्कूल ' त्यांच्या बुद्धीची मशागत विद्यादानानें करीत होतें. विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, प्रिं. वा. शि. आपटे, प्रिं. आगरकर या सरस्वतीकंठमण्यांचें तेज शिवराम-पंतांच्या अन्तस्तेजाला आवाहन करीत होतें. प्रसिद्ध खडकीच्या लढाईची साक्ष देणाऱ्या माळावर उभें असलेलें डेक्कन कॉलेज त्यांच्या ठाईं विकसत असलेल्या गुणांना पल्लेदार, कार्यक्षम व आविष्कारोन्मुख करीत होतें. शाळा-कॉलेजच्या बाहेरील महाराष्ट्राची राजकीय, सामाजिक व औद्योगिक परिस्थिति तर त्यांच्या मनाच्या दरवाजावर धक्के देत उभी होती. १८९५ सालीं एम्. ए. ची पदवी घेऊन बाहेर पडलेले शिवरामपंत एखाद्या सुप्त ज्वालामुखीप्रमाणें स्फोटक व दाहक द्रव्याची भरपूर सामग्री उदरीं सांठवूनच आपल्या [illegible] आखाड्यांत उतरले. एक दोन वर्षें ' महाराष्ट्र कॉलेजां 'त प्राध्यापक म्हणून काम करून, व राजकीय पुराणिकाचीहि भूमिका पत्करून त्यांनीं आपली वाणी व लेखणी परजून तयार केली; व १८९८ च्या पाडव्याच्या सुमुहूर्तावर ( २५-३-१८९८ ) आपल्या ' काळ ' पत्रांतून स्वातंत्र्यसंग्रामाला त्यांनीं प्रारंभ केला.

**अनेक आघाड्यांवरील रणसंग्राम**

' धार्मिक, सामाजिक, राजकीय, ऐतिहासिक, आणि वाङ्मयीन विषयांची निःपक्षपातानें व निर्भयपणें पूर्ण चर्चा करणारें साप्ताहिक ' अशी शिवरामपंतांनीं दिलेली ' काळ 'ची जाहिरात म्हणजे इतक्या आघाड्यांवर सुरू होणाऱ्या रणसंग्रामाची घोषणाच होती. वास्तविक पाहिलें तर खरी आघाडी एक राजकीयच. पण तिचीं उपांगें म्हणून शिवराम-पंतांनीं इतर आघाड्यांचा निर्देश केला होता. आतां, एखाद्या होत्याप्रमाणें [illegible]तांनीं जो हा रणयज्ञ सुरू केला होता, त्याची सामग्री कोणती होती, भारतीय युद्धांतील शस्त्रसंपाताचे वेळीं कृष्णाप्रमाणें त्यांनीं जी प्रेरक गीता [illegible]ाइली तिचीं अक्षरें काय स्वरूपाचीं होतीं, एखाद्या ऋषिकवीप्रमाणें

त्यांनीं जें स्वातंत्र्य-देवतेचें सूक्तांनीं आवाहन केलें त्या सूक्तांचे मंत्रार्थ कसले होते, किंवा वर सांगितल्याप्रमाणें जागृत झालेल्या ' काळ 'ज्वाला-मुखीमधील स्फोटक द्रव्यें कोणतीं होतीं याची थोडीशी कल्पना अभ्यासकास असणें जरूर आहे.

## राजकीय विचारांचें उत्थान

पंतांच्या राजकीय स्वातंत्र्य-विचारांचें उत्थान मराठेशाहींतील स्वराज्याच्या कल्पनेंतून मुख्यतः झालेलें होतें. त्यांतल्या त्यांत हिंदुपदपाद-शाहीचे पुरस्कर्ते व महाराष्ट्रांतील स्वराज्याचे संस्थापक पुण्यश्लोक श्रीशिवछत्रपति हें त्यांच्या स्वातंत्र्य-स्फुरणाचें मुख्य केंद्र होतें. विक्रम, शालिवाहन, चन्द्रगुप्त इत्यादि प्राचीन, व शिंदे-होळकर व भाऊसाहेब पेशवे इत्यादि अर्वाचीन पराक्रमी पुरुष हेहि वैभवशाली स्वातंत्र्यभक्त त्यांच्या आदराचे विषय होते. स्वातंत्र्यप्रेम ही भावना अखिल मानवव्यापी असल्यानें स्वदेशस्वातंत्र्य आळवितांना पंतांनीं इतर देशांतील स्वातंत्र्यभक्तांचें गुणगान मोठ्या आवडीनें केलें आहे. फ्रेंच राज्यक्रान्तीच्या भीषण गडगडाटा-नंतर सबंध युरोपभर जी स्वातंत्र्य, समता व बंधुता या सद्विचारांची जलवृष्टि झाली, तिनें पोसलेल्या ' पिकाची पाहणी '( भाग ५ ) करण्याच्या निमित्तानें पंतांनीं स्वातंत्र्याच्या लढ्याचें व देशभक्तांचें मोठ्या तन्मयतेने गुणग्रहण केलें आहे. इंग्रजांच्या गुलामगिरीनें चिडून गेलेल्या पंतांच्या मनाला निर्भेळ स्वातंत्र्याचा ध्यास लागलेला होता. त्यामुळें त्यांच्या राजकीय स्वातंत्र्याची कल्पना शिवछत्रपतीच्या हिंदुपदपादशाहींतून स्फुरली असली तरी तिनें फ्रेंच लोकशाहीच्या व आर्थिक साम्यवादी सोशिॲलि-झमच्या विचारांनाहि स्पर्श केला होता. ( भाग २. इन्कम् टॅक्स आणि सोशिॲलिझम् ). इंग्रजी साम्राज्यशाही आपल्या बेगुमान आणि उर्मट नोकराकरवीं जो दडपशाहीचा धिंगाणा हिंदुस्थानांत घालीत होती तीमध्यें असल्या स्वातंत्र्य-विचारांना केवढा स्फोटकपणा आला असेल याची कल्पनाच केलेली बरी.

## ध्येयवादी व कल्पनारम्य राजकारण

पंतांच्या राजकीय भूमिकेचा विचार करतांना हें लक्षांत ठेवलें पाहिजें कीं, ते व्यवहारी राजकारणाच्या किंवा राज्यशास्त्राच्या तपशिलांत फारसे

कधीं शिरले नाहींत. निर्भेळ राजकीय स्वातंत्र्याचें प्रेम व गुलामगिरीचा द्वेष या भावना हरतऱ्हांनीं व हरप्रकारें चेतवीत राहणें हेंच त्यांचें राजकारण. या दोन प्रबल भावनांची आळवणी [illegible] शैलीनें व समाज, धर्म, इतिहास व आर्यसंस्कृति यांच्या उद्दीपनांनीं [illegible] करीत राहिले म्हणूनच त्यांचे ' काळां 'तील निबंध गद्यकाव्यें झालीं. मॉनर्की, रेपब्लिक्, सोशॅलिस्टिक किंवा कम्युनिस्टिक् स्टेट, इंपीरिॲलिझम् असल्या राज्यशासन प्रकारांच्या चर्चेंत ते शिरले असते तर त्यांचे निबंध वस्तुनिष्ठ व ज्ञानप्रधान झाले असते. त्यांना ध्यास लागला होता स्वातंत्र्याचा. त्यामुळें कोणत्याहि लोककल्याणमूल शासनप्रकारांतील लोकस्वातंत्र्य तेवढें ते उचलीत व त्यावर काव्यमय गुंजारव करूं लागत. शिवरामपंतांचें राजकारण म्हणजे निर्भेळ आणि संपूर्ण ध्येयवादी स्वातंत्र्याचा काव्यमय व कल्पनारम्य ( Romantic ) उद्घोष होय. हा अंतरिक्षांतील काव्यमय राजकीय ध्येयवाद सोडून ते प्रत्यक्ष व्यवहाराच्या भूमीवर फारसे उतरले नाहींत. शिवरामपंतांचे राजकीय विचार विजेसारखे तेजस्वी, स्फोटक, आणि क्रान्तिकारक असले तरी ते उच्च अंतरिक्षांत कडाडून जाणाऱ्या विद्युल्लतेसारखे होते. कारखाने चालविणाऱ्या, संथ, संयमित व व्यवहारोपयोगी विद्युत्प्रवाहासारखे नव्हते.

## शिवाजी – आर्यसंस्कृतीचें प्रतीक

राज्यशासनप्रकारांत त्यांचा जो काव्यमय ध्येयवाद तोच राज्यप्राप्तीच्या उपाययोजनेंतहि दिसतो. त्यांना नेमस्तांचे उपाय मुळींच पटत नव्हते. आणि जहालांच्या गोटांत ते व्यवहारतः वावरत असत हें खरें, पण त्यांचा ओढा सशस्त्र क्रान्तीकडे होता. कोणतीहि व्यावहारिक अटक जुमानूं नये, निर्भेळ ध्येयवादाच्या उन्मादांत रंगावें अशीच या काव्यात्म व कल्पनारम्य प्रिय पुरुषाच्या मनाची ठेवण होती, तसेंच राजकारणाचा विचार त्यांनीं सुटा व निराळा केला नाहीं. त्यांच्या राजकीय स्वतंत्रतेच्या विचारांतच स्वधर्म, स्वभाषा, स्व-विद्याकला, स्व-समाजधारणा इत्यादि स्वसंस्कृतीचे म्हणजे प्राचीन आर्यसंस्कृतीचे विचार अनुस्यूत असत. श्रीशिवछत्रपतीच्या मूर्तीची स्थापना आपल्या मनोमंदिरांत करून तिचीं काव्यमय स्तोत्रें पंत अनेक ठिकाणीं आळवतांना दिसतात, त्याचें कारण शिवराय केवळ राजकीय स्वातंत्र्य

मिळविणारे होते म्हणून नव्हे; तर ते पंतांना आर्यसंस्कृतीचें प्रतीक वाटत होते म्हणूनच होय. आणि याच कारणास्तव प्राचीन व अर्वाचीन राजर्षि, कवि, संत, कलाकार, आचार्य, वेदोपनिषदें, [illegible] इतिहासपुराणें, रामकृष्णादि देव, आणि पांडवांसारखे पराक्रमी भक्त इत्यादि गोष्टींबद्दल त्यांना विलक्षण प्रेम वाटे.

## प्रेम म्हणूनच द्वेष !!

याप्रमाणें स्वसंस्कृतिगुण. राजकीय स्वातंत्र्याचीं सूक्तें श्रद्धेनें आळवावयाचीं म्हणजे स्वधर्मरक्षकांचें आणि स्वातंत्र्यभक्तांचें गुणगान करून ती भावना गुलामगिरींत पिचत पडलेल्या देशबांधवांच्या मनांत रुजवावयाची, तें काम एका बाजूनें पंत करीतच होते. पण या कामाची दुसरी एक आवश्यक व अपरिहार्य बाजू आहे, ती म्हणजे या स्वातंत्र्यप्रेमाला जे म्हणून कोणी विरोध करीत असतील त्यांच्याबद्दल असंतोष, अप्रीति, चीड व संताप उत्पन्न करावयाचा. प्रेमाची उत्कट भावना प्रेमविरोधी लोकांबद्दलच्या द्वेषासहच आपला व्यापार करूं लागते. एकाच नाण्याच्या दोन बाजूप्रमाणें प्रेमाच्या नाण्याला एकीकडून प्रेम व दुसरीकडून द्वेष अशा दोन बाजू असतात हें मानसशास्त्रीय सत्य आहे. देवाधर्माबद्दल नितान्त भक्ति व्यक्त करणारे तुकारामांसारखे समचित्त संतसुद्धां देव व धर्म यांच्या 'नाठाळ' विरोधकांच्या माथ्यावर 'काठी'चा प्रहार करावयास प्रवृत्त होतात. मग इतरांची कथा काय? कोणत्याहि विधायक कामांत विध्वंसनाचा भाग येतो. म्हणून पंतांना विरोधकांचा समाचार घ्यावा लागला. पंतांच्या विरोधकांत अग्रगण्य म्हणजे परकीय ब्रिटिश नोकरशाही होय. त्या खालोखाल त्या नोकरशाहीच्या अन्नानें ओशाळे झालेले स्वकीय सरकारी नोकर, नेमस्त राजकारणी, हिंदुधर्माची निंदा करून हिंदूंना बाटविणारे ख्रिस्ती धर्मोपदेशक, सुधारणेच्या नांवाखालीं आपलाच तेजोभंग करणारे व पंतांच्या मतें धार्मिक अनाचार करणारे सुधारक, आणि शेवटीं इंग्रजी राज्य व परकीय संस्कृति यांनीं दिपून जाऊन जे कोणी वाङ्मय, इतिहास, समाजरचना व धर्म या विषयांतहि आत्मावमानाची जाणीव व्यक्त करीत असतील ते सर्व समाविष्ट झाले होते.

## जहाल व मवाळ

स्वसंस्कृतियुक्त राजकीय स्वातंत्र्य या एका मुख्य सूत्रांत पंतांचे इतर विचार अनुस्यूततेनें कसे येतात हें वर सांगितलेंच आहे. त्यामुळें त्यांच्या धार्मिक, सामाजिक व इतर विषयांवरील विचारांची वेगळी चर्चा नको. तथापि, त्याहि बाबतींत थोडें अधिक स्पष्टपणें लिहिणें आवश्यक आहे. स्वराज्य व स्वातंत्र्य जाऊन परक्याची गुलामगिरी कपाळीं आल्यावर या देशांतील विचारवंतांत दोन विचारप्रवाह दिसूं लागले. एका प्रवाहाच्या पुरस्कर्त्यांनीं आपला पराभव आपल्यामधील सामाजिक व धार्मिक दोषांनीं झाला असें मानून ते समाजसुधारणेच्या मार्गाला लागले. आपल्यांतील विषमता, अंधश्रद्धा, धर्मभोळेपणा, नीतिभ्रष्टता इत्यादि गोष्टी चव्हाट्यावर मांडून बुद्धिप्रामाण्य व समता या भूमिकांवरून स्वदोषाचें उद्‌घाटन त्यांनीं चालू केलें. हें आत्मपरीक्षण ज्या सुसंस्कृत इंग्रज राज्यकर्त्यांमुळें आपल्याला शक्य झालें त्यांच्याबद्दल त्यांना गूढस्थ आदर वाटूं लागला. कोणी त्यांना स्वदोषनिरसनार्थ परमेश्वरानें पाठविलेले दूतच मानूं लागले. त्यामुळें त्यांच्याशीं राजकीय हक्कांसाठीं भांडणें तें मृदुपणें व्हावें असें त्यांचें मत. ही विचारसरणी रूढ होऊन तिला जेव्हां प्रत्येक बाबतींत आत्मावमान व तेजोभंग यांचें स्वरूप येऊं लागलें तेव्हां तिची प्रतिक्रिया म्हणून कांहीं विशिष्ट स्वाभिमानी विचारवंतांच्या विचारांचा दुसरा प्रवाह निर्माण झाला. पहिल्या विचारप्रवाहाच्या पुरस्कर्त्यांत लोकहितवादी, महात्मा फुले, पंडित, रानडे, भांडारकर, आगरकर वगैरे मंडळी असून दुसऱ्याचा उगम विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यापासून झाला; व त्यांत लोकमान्य टिळक, विजापुरकर, राजवाडे, खाडिलकर व इतर अनेक देशभक्त होते. त्यांना 'इंग्रज हे देवदूत' ही कल्पना भ्रामक वाटत होती, व आपल्या राजकीय हक्कांसाठीं त्यांच्याशीं लढा देणें हें त्यांना पवित्र कर्तव्य वाटत होतें. त्यांनीं स्वदेश, स्वसंस्कृति व स्वभाषा यांबद्दल स्वाभिमान जागृत करून चाललेल्या आत्मावमानाला आळा घातला. पहिला पक्ष समाजकारणांत जहाल व राजकारणांत मवाळ; तर दुसरा पक्ष समाजकारणांत मवाळ व राजकारणांत

जहाल होता. शिवरामपंत दुसऱ्या पक्षांत होते. आगरकर मात्र या दोन्हीहि पक्षांत सारखेच जहाल होते.

### त्यांच्या उत्कटतेला तडजोड नाहीं

परंतु शिवरामपंत अधिक भावना-प्रधान व अधिक पुराणप्रेमी असल्यानें त्यांच्या सुधारणाविरोधाला आणि खिस्ती धर्मोपदेशकांच्या प्रतिकाराला तत्पक्षीयांपेक्षां विशेष तीव्र स्वरूप आलें. त्यांनीं सुधारकांची, नेमस्तांची, धर्मोपदेशकांची, आणि तत्सम लोकांची कातडी वक्रोक्तीच्या फुंकरानें सोलून काढली आहे. आजच्या भाषेंत पंतांना कोणी सनातनी किंवा प्रतिगामीहि म्हणतात; पण त्यांचे हेहि विचार त्यांच्या विरोधकांना त्या वेळीं स्फोटक द्रव्यासारखे वाटत होते. शिवरामपंत अगदीं सगुणोपासक भक्त नव्हते. त्यांची परमेश्वरकल्पना व्यापक होती. नैयायिक किंवा मीमांसक यांच्या मताप्रमाणें जगत्कारणरूप किंवा कर्म-फलप्रद अशी कोणती तरी एक अचिंत्य, विशाल व अनादि शक्ति या पसाऱ्यामागें आहे असें त्यांचेंहि मत असावें असें दिसतें. त्यांचें संस्कृत व मराठी या भाषांवरील व वाङ्मयावरील प्रेम गाढ होतें. पण म्हणून इंग्रजीसारख्या समृद्ध परभाषेकडे त्यांनीं पाठ फिरविली नाहीं. याप्रमाणें त्यांनीं आपलें स्वातंत्र्यप्रेम व स्वधर्मप्रेम पांडित्यानें आणि व्यासंगानें धारदार व पल्लेदार केलें, व आपल्या मोहिमेला हिरीरीनें सुरुवात केली. स्वमतानुकूलाबद्दल नितान्त आदर व स्वमतप्रतिकूलांबद्दल नितान्त तिरस्कार यावांचून तिसरी संमिश्र भावना त्यांच्या मनःकोशांत नव्हती.

### देशभक्ति हा रस

पंतांचें प्रेम व अप्रीति, त्यांचे राग व द्वेष, आणि त्यांची श्रद्धा व तिरस्कार हीं वरील विषयांना अनुलक्षून अनुक्रमें प्रकट झालीं आहेत. ज्यांत शिवरामपंत दडलेले आहेत तें हेंच अंतःकरण; स्वातंत्र्यप्रेम, व तें स्वातंत्र्य स्वदेशाला लाभावें ही उत्कट इच्छा याच त्यांच्या जिव्हाळ्याच्या बासना (System of interests). शिवरामपंतांच्या बुद्धीनें, त्यांच्या गाढ पांडित्यानें, त्यांच्या अचाट कल्पनाशक्तीनें, आणि त्यांच्या प्रतिभेनें त्यांना बहुमोल साहाय्य केलेलें आहे; पण त्यांना खरी प्रेरणा, चेतवणी आणि स्फुरण देणारी एकटी स्वातंत्र्यलालसाच. शिवरामपतांनीं धर्माचा,

समाजाचा, इतिहासाचा आणि वाङ्मयाचाहि विचार एकाच संपूर्ण राजकीय स्वातंत्र्यदृष्टीनें केला. स्वातंत्र्यप्रेम हाच त्यांच्या गद्यकाव्यांतील त्यांचा स्थायीभाव. देशभक्ति हा रस. तोच त्यांच्या सूक्तांचा मंत्रार्थ. आत्मप्रेम व परद्वेष हीच त्यांची यज्ञीय सामग्री. हीच त्यांच्या गीताक्षरांतील प्रेरक शक्ति. या मंत्राची ओळख करून घेतल्यावर कोणत्या विशिष्ट तंत्रानें त्यांनीं आत्माविष्कार केला तें आतां तपशिलानें पाहावयाचें.

**पूर्वीचा वस्तुनिष्ठ निबंध**

शिवरामपंतांनीं आपलें स्फोटक व तेजस्वी मनोगत व्यक्त करण्यासाठीं ज्या वाङ्मयप्रकाराचें साहाय्य घेतलें तो प्रकार निबंध हा होय. आधुनिक मराठी निबंधाची सुरुवात इ. स. १८३२ च्या सुमारास झाली. प्रारंभकालीं मराठी निबंध केवळ सामान्य नीतिबोधक, ज्ञानप्रसारक व तत्त्वबोधक असे. तो गंभीर, वस्तुनिष्ठ, साधा, कलाहीन आणि प्रचारात्मक होता. वर्तमानपत्रें व मासिकें हीं त्यांचीं प्रकाशन-स्थलें असत. १८३२ मध्यें ‘ दर्पण ’ या वृत्तपत्रांतून त्यांच्या प्रकाशनाची सुरुवात मानतां येईल. स्वतंत्र पुस्तिकेंतूनहि तो क्वचित् प्रकट होई. ( मिसेस् फारार इची ‘ कुटुंबप्रवर्तन नीति ’ १८३५ ). लोकहितवादींचीं ‘ शतपत्रें ’ हा पत्रात्मक निबंधप्रकार ‘ प्रभाकर ’ या पत्रांत १८४८ मध्यें सुरू झाला. जांभेकर, भाऊ महाराज, छत्रे, गुंजीकर, हरि केशवजी, शिंत्रे, मोडक, वि. कों. ओक, माडगांवकर, बाबा पदमनजी वगैरे मंडळी त्या वेळच्या निबंधकारांत होती. त्यांपैकीं लोकहितवादीसारख्यांनीं आपल्या मनाची तळमळ आपल्या पत्रांतून व्यक्त केली आहे, हें खरें असलें तरी त्या वेळचे निबंधकार प्रायः वस्तुनिष्ठच.

**मराठीचे शिवाजी**

इंग्रजी निबंधांचा वाढता परिचय, हरएक विषयांवर निर्भीडपणें आपलें मत व्यक्त करण्याची प्रवृत्ति, व मराठी भाषेला येणारें डौलदार वळण, या कारणांनीं १८३२ पासून १८७४ पर्यंत प्रकट झालेल्या निबंधांचा नूर पालटला; व त्या बदललेल्या निबंधांचें प्रत्यक्ष दर्शन विष्णुशास्त्री चिपळोणकरांच्या ‘ निबंधमालें ’त प्रथम झालें ( १८७४–१८८१ ), आणि जागृत झालेला महाराष्ट्राचा स्वाभिमान निबंधाच्या रूपानें बोलूं लागला

असें तत्कालीनांना वाटूं लागलें. ‘ मराठीच्या शिवाजी ’ची ती डौलदार, रेखीव, मर्मभेदक, उपहासगर्भ आणि पल्लेदार भाषा, तिच्यांतील पांडित्य आणि आत्मविश्वास, तिच्यांतील निर्भयपणा आणि झुंझारवृत्ति, यांमुळें सबंध महाराष्ट्रीय विचारांना नवें वळण लागलें. प्रा. वि. ह. कुलकर्णी यांच्या भाषेंत सांगावयाचें तर ‘ मालेनें मराठी भाषेविषयींची सुशिक्षितांची अनास्था नाहींशी केली, मिशनरींच्या धर्मविघातक चळवळीला आळा घातला, इंग्रजी राज्यपद्धतींतील आपमतलबी धोरणाचा दंभस्फोट केला, पारतंत्र्याची चीड उत्पन्न करून स्वातंत्र्याचा दिव्य संदेश दिला, आणि या प्रत्यक्ष कामगिरीखेरीज त्यांच्या लेखणीनें टिळक, आगरकर, राजवाडे, आपटे, परांजपे, कोल्हटकर व केळकर अशी श्रेष्ठ लेखकांची परंपरा निर्माण केली.’

**धनी, मित्र व प्रिया !**

होय. विष्णुशास्त्र्यांनीं निर्माण केलेल्या या नव्या तेजस्वी परंपरेंतच शिवरामपंत वाढले. पण परंपरा एकच असली तरी तिच्यामध्यें वाढणारे सारेच परंपरारक्षक अगदीं एकसारखे नसतात. त्यांच्या भिन्न भिन्न व्यक्तिमत्त्वानुसार त्यांची त्यांची अभिव्यक्ति भिन्न भिन्न होते. विष्णुशास्त्री यांनीं आपल्या विशिष्ट शैलीच्या निबंधांतून प्रवर्तित केलेली विचारसरणी लोकमान्य टिळकांच्या निबंधांतून शास्त्रीय चिकित्सेच्या रूपांत, केळकरांच्या निबंधांतून ललित आणि समतोल बुद्धिवादाच्या रूपांत, तर परांजपे यांच्या निबंधांतून ती वक्रोक्तिरम्य गद्य-काव्यांत प्रकट झाली. लोकमान्यांच्या ठाशीव, न्यायघटित व सिद्धान्तरूप निबंधांचें आवाहन वाचकांच्या तर्कबुद्धीला, केळकरांच्या ललित, अलंकृत आणि मन वळविणाऱ्या निबंधांचें आवाहन त्यांच्या समंजसपणाला, त्यांच्या रसिकतेला व व्यावहारिक न्यायबुद्धीला, तर परांजपे यांच्या कल्पनाप्रचुर, वक्रोक्तिगर्भ व काव्यमय निबंधांचें आवाहन त्यांच्या भावनेला असे. म्हणून या तिघांचे निबंध, जुन्या काव्य-शास्त्रीय परिभाषेंत सांगावयाचें झालें तर, अनुक्रमें प्रभुसंमित, सुहृत्संमित व कान्तासंमित होते असें म्हणतां येईल. ‘ शास्त्रीय सिद्धान्तांनीं हें सिद्ध होत आहे म्हणून तुम्हीं असेंच केलें पाहिजे ’ असा, एखाद्या धन्याप्रमाणें, लोकमान्य आदेश देत. ‘ असें करणें हिताचें आहे, तद्विरुद्ध करण्यानें

अनहित होईल ' असें मित्राच्या सौहार्दभावानें केळकर पटवून देत, तर परांजपे एखाद्या कान्तेप्रमाणें आपल्या कल्पनेच्या व वक्रोक्तीच्या भुलभुलावणीनें वाचकांच्या भावना ताब्यांत घेऊन त्याला आपल्यासारखें वाटावयाला लावीत. टिळकांनीं आपली शास्त्रीय बैठक कधींच सोडली नाहीं. केळकरांनीं भावनाविवश न होतां आपलें म्हणणें ललित पद्धतीनें, समतोलपणानें व रसिकतेनें मांडलें. पण परांजप्यांनीं मात्र भावनेच्या व कल्पनेच्या रंगानें आणि पांडित्याच्या सजावटीनें आपलें संपूर्ण भावजीवन वाचकांपुढें ध्वनिरेखांत चितारिलें. टिळक शास्त्री, केळकर न्यायप्रेमी रसिक, तर परांजपे वक्रोक्तिनिपुण कवीच होते.

**अनुकरण अशक्य**

म्हणून मराठी निबंधकारांमध्यें परांजप्यांचें एक विशिष्ट स्थान आहे. त्यांची म्हणून एक वेगळी शैली आहे. तिचें संपूर्ण व यशस्वी अनुकरण झालें नाहीं. तिचा उगम विष्णुशास्त्र्यांच्या शैलींत, सारखवटपणा सावरकरांच्या शैलीशीं, पण तंतोतंत साम्य कोणाच्याच शैलीशीं नाहीं. अच्युत बळवंत कोल्हटकर, माटे, सानेगुरुजी, काका कालेलकर, पु. भा. भावे (रक्त आणि अश्रू) इत्यादि निबंधकार प्रसंगवशात् आपल्या निबंधांतून कधीं भावनात्मकता, कधीं कल्पना, कधीं वक्रोक्ति आणतात व शिवरामपंतांची आठवण करून देतात. पण ती आठवणच. एखाद्या गंभीर विषयाची काव्यानुकूल बाजू निवडून काढून तिच्यावर काव्याचा संपूर्ण साज अखेरपर्यंत एकसारखा चढवीत राहणें ही गोष्ट एकंदरीनें अवघडच आहे. साध्यासुध्या माणसानें हें केलें तर असलें लिखाण कृत्रिम व नीरस होण्याचाच संभव जास्त. पण या पद्धतीचा अवलंब शिवरामपंतांसारख्या महाबुद्धिवान्, पंडित, भावनाप्रधान, कल्पना-कुशल, आणि पराकाष्ठेच्या मिष्किल आणि काव्यसौंदर्यलक्षी लेखकानें केला म्हणूनच तिला मराठी निबंध-वाङ्मयांत एक कायमचें वैशिष्ट्य प्राप्त झालें. आतां, त्यांच्या या विशिष्ट पद्धतीचा — शैलीचा — थोडा परिचय उदाहरणांसह करून घेऊं.

**जडांना चेतन केलें !**

कोणत्याहि वस्तूकडे किंवा घटनेकडे पाहण्याची शिवरामपंतांची दृष्टि

आत्मनिष्ठ ( subjective ) असे. मग ती घटना ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक, राजकीय किंवा तात्त्विक असो. आणि ती वस्तु तारे, नक्षत्रें, पर्वत, नद्या, किल्ले किंवा एखादी गंजलेली तरवार यांपैकीं कोणतीहि असो. आपल्या उत्कट भावनेनें आणि उज्ज्वल कल्पनेनें त्या घटनेला व वस्तुला ते साकार व सगुण करीत. तिच्यामध्यें नवा प्राण घालीत. तिची पार्श्वभूमि ऐतिहासिक पांडित्य व तत्त्वज्ञानी विवेचन यांनीं सजवीत; आणि अखेर राजकीय स्वातंत्र्याचा ध्वनि तिच्या अंगप्रत्यंगांतून स्फुरावयाला लावीत. त्यामुळें अचेतन व जड वस्तूवर चेतनारोप ( personification ) करणें, मृत किंवा विस्मृत व्यक्तींना संबोधून प्रत्यक्षवत् बोलणें, अव्यक्ताला व्यक्त करणें, मूकांना वाचा फोडणें, अमूर्ताला मूर्त बनविणें, निर्गुणाला सगुण करणें, वाच्यार्थांत लपलेला लक्ष्य व व्यंग्य अर्थ उकलून दाखविणें, व शून्यांतून नव्या सृष्टीची रचना करणें—हे त्यांच्या विशिष्ट काव्यात्म व वक्रोक्तिगर्भ शैलीचे कायमचे विशेष झाले.

## जमिनीवर फरपट, पण आकाशांत भरारी

शिवरामपंतांचें बोलणें व लिहिणें एकरूप असे. ते सभांतून बोलत तसेंच लिहीत, व लिहीत तसेंच बोलत. त्यांच्या लिहिण्यांत बोलण्याचा जिवंतपणा व समयस्फूर्तता जाणवे; आणि त्यांच्या बोलण्यांतहि भाषेचा फुलोरा, व्याकरण-शुद्धता, पल्लेदार व सफाईची वाक्यरचना, व पूर्वपार कल्पनांचें व शब्दप्रयोगांचें अचूक अनुसंधान कधीं सुटत नव्हतें. लिहिण्यांत व बोलण्यांतहि ते प्रथम गंभीर, साधें, वाच्यार्थाचें, शास्त्रीय व वस्तुनिष्ठ असें कांहीं मांडीत. आपल्या मनांतील नव्या किमयेचा थांग वाचकांस व श्रोत्यांस ते प्रारंभीं लागूं देत नसत. पण मग हळूहळू आपल्या कल्पनांच्या व भावनोत्कटतेच्या चढणीला ते श्रोत्यांना लावीत, आणि शेवटीं अस्मान गांठून व्याजोक्ति व वक्रोक्तीच्या गवाक्षांतून स्वातंत्र्यकल्पनेचा 'परस्पर्श' करीत. त्यांच्या पद्धतीला समर्पक उपमा उड्डाण करूं पाहणाऱ्या विमानाची देतां येईल. प्रथम गति व वेग घेण्यासाठीं विमान कांहीं काळ साध्या चाकांच्या साहाय्यानें जमिनीवरच फरपट करतें, व त्या रुक्ष व गंभीर फरपटीनें अंगीं वेग संचारला कीं नकळत जमीन सोडून अस्मानांत तरंग

लागतें. व अखेर अन्तरिक्षांतील अनेक चमत्कार प्रवाश्यांच्या चकित नजरेला आणतें. तोच प्रकार पंतांच्या लेखणीचा व वाणीचा असे.

**काळ ' सूड ! सूड ! ' म्हणून ओरडला !**

उदाहरण म्हणून प्रस्तुत निबंधसंग्रहांतील पहिला व शेवटचा हे दोन आदि-अन्तींचेच निबंध पाहा. पहिल्या ' काळ ' या निबंधांत शिवराम-पंतांनीं वर्तमान, भूत व भविष्य या कालाच्या तीन रूपांची फोड अगदीं साध्या पण शास्त्रीय भाषेंत प्रथम केली आहे. काल अनादि व अनन्त आहे हेंहि परिचित उपमांनीं समजावून दिलें आहे. याप्रमाणें पहिल्या ५०–६० ओळींच्या जमिनीवरील फरपटीनंतर त्याच्या विमानांत भावनेची वाफ व कल्पनेची भरारी स्फुरूं लागते, व जमीन सोडून तें अन्तरिक्षांत नकळत संचार करूं लागतें. आणि मग तेथून वाचकांना काय काय चमत्कार दिसूं लागतात तें पाहा :

" हिमालय पर्वताच्या जागीं डोळे फिरून जातील इतके खोल खळगे आणि अटलांटिक महासागराच्या जागीं मेघमंडळांत घुसणारीं पर्वतशिखरें कदाचित् यानें ( काळानें ) पाहिलीं असतील. ईजिप्त देशांतील उंच उंच मनोरे बांधलेले आणि जमीनदोस्त झालेले यानें पाहिले आहेत. बाबिलोनच्या कळसाचें काम चाललें असतां दररोज वाढत वाढत तो अगदीं स्वर्गलोकाजवळ जाऊन ठेपलेला यानें पाहिला आहे, व त्याच्यापूर्वींचे सारे लोक एक भाषा बोलत होते ती यानें ऐकिली आहे...यानें घोड्यांना आणि पर्वतांना पंख असलेले पाहिले आहेत. यानें समुद्राचें गोड पाणी प्राशन केलें आहे. यानें ऋषींना ऋग्वेदांतील सूक्तें रचीत बसलेले असतांना पाहिलें आहे. यानें आजपर्यंत कैक राजांचीं राज्यें, गर्विष्ठांचा गर्व, धनाढ्यांचें धन, बलाढ्यांचें बल, आणि मस्तवालांची मस्ती हीं लयास गेलेलीं पाहिलीं आहेत, आणि यापुढें पाहील...ल्युक्रेशियावर टार्किनिसनें जुलूम केला, रावणानें सीतेला चोरून नेलें, आणि दुःशासनानें द्रौपदीला भर सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न केला, त्या वेळीं ब्रूटसच्या, रामाच्या आणि भीमाच्या आधीं मोठ्यानें गर्जना करून ' सूड ! सूड ! ' हे शब्द हाच ओरडला......कोणत्या राजांना तख्तावरून खालीं ओढावयाचें व कोणाला नेऊन तेथें बसवावयाचें हें सर्व यानें कायम करून ठेविलें आहे.

राष्ट्रांचा नकाशा एखाद्या कुशल चित्रकारानें यानें रंगवून तयार केला आहे. हिरवा, पिवळा, तांबडा, निळा, पांढरा हे निरनिराळे रंग कोठें कोठें कसे भरावयाचे याचा त्यानें कधींच निकाल लावून टाकला आहे. "

**काळानेंच तिरंगी झेंडा रंगविला होता !**

'काळ' पत्राच्या पहिल्याच निबंधांत प्रकट झालेली ही शिवरामपंतांची शैली पाहा. हिच्यामध्यें वर निर्दिष्ट केलेले सर्व विशेष अल्प प्रमाणांत दिसतील. अव्यक्त, निर्गुण आणि तटस्थ अशा कालतत्त्वावर पंतांनीं व्यक्तता, सगुणपणा आणि कर्तृत्व या चेतनधर्मांचा आरोप केला आहे. हें करतांना आपल्या पुराणेतिहासाच्या ज्ञानाचा चातुर्यानें उपयोग केला आहे. एखाद्या अध्यात्मवाद्याप्रमाणें विश्वाच्या घडामोडींचा व्यापक व दूरदृष्टीनें विचार केला आहे. बाणभट्टाच्या गद्यकाव्यांतील ओघ साधून ऐतिहासिक प्रमाणांची परंपरा, नदीच्या लाटांप्रमाणें, एकामागून एक अवतारविली आहे. आणि सर्वांतून एक गूढस्थ ध्वनि सूक्ष्मपणें व सतत भरून ठेविला आहे तो न्याराच. जुलमी आणि मस्तवाल इंग्रजी राज्यकर्त्यांच्या राजवटीला विटलेल्या आणि निराश झालेल्या हिंदी प्रजेला 'काळा'च्या अघटित कर्तृत्वांतून एक आशेचा किरण येथें दाखविला आहे. 'हेंहि राज्य नष्ट होईल आणि आपल्याहि नकाशांतील तांबडा रंग पुसला जाऊन तेथें इतर रंग येतील. कारण 'काळा'ची योजनाच तशी आहे !' या पतांच्या ध्वन्यर्थाला भविष्यवाणीचें मोल आज आलें आहे; व तांबड्या रंगाच्या जागीं हिरवा, पांढरा व केशरी हे तीन रंग आपल्या स्वातंत्र्यध्वजावर खरोखरच 'काळा'च्या योजनेप्रमाणें आले आहेत. पण हें दृश्य पाहायला, आपली भविष्यवाणी खरी झाल्याचा आनंद चाखायला, आणि ज्या स्वातंत्र्याचा त्यांनीं अहर्निश ध्यास घेतला तें प्रत्यक्ष अवतरलेलें बघावयाला आज शिवरामपंत नाहींत ही खेदाची गोष्ट आहे.

**पंतांच्याच हृदयाचें आक्रंदन**

'भासाची भवितव्यता' हा शेवटचा निबंध 'काळ' पत्र बंद पडल्यावर, 'काळां'तील निबंध गोऱ्या इंग्रजांच्या काळ्या हुकुमानें जप्त झाल्यावर, व शिवरामपंतांच्या ज्वालामुखी जवळ जवळ विझत आल्यावर लिहिलेला आहे. त्याचा आरंभहि साधा आहे. पण १५–२० ओळींतच

पंत शेंकडों शतकांपूर्वी मृत झालेल्या भास कवीशीं एकदम बोलूं लागलेले तुम्हांस दिसतील. भासाचीं नाटकें कोणीं तरी जाळलीं होतीं. त्यामुळें भग्नहृदय झालेला भास आपल्यासमोर उभा आहे अशी कल्पना पंतांनीं केली आहे. आणि अशा तन्मयतेनें पंतांनीं भासाच्या विदीर्ण हृदयाचें आविष्करण केलें आहे कीं, एखाद्यास भास म्हणजे पंतच आहेत असा क्षणभर आभास व्हावा. पण हा आभास नसून तें एक सत्यच होतें. भासाप्रमाणें पंतांवरहि स्वतःच्या रक्तानें लिहिलेलें लिखाण प्रत्यक्ष जाळलें गेल्याचें पाहण्याचा प्रसंग आला होता. म्हणून भासाचें निमित्त करून ध्वन्योक्तीनें पंत स्वतःच्या हृदयाचें आक्रंदन पुढील शब्दांनीं वाचकांस ऐकवीत आहेत—

'भासा, ही गोष्ट झाली – तुझीं नाटकें जाळलीं – तेव्हां तूं जिवंत होतास? तुझ्या डोळ्यांदेखत ही गोष्ट झाली असेल तर ती पाहून तुझ्या मनाला काय वाटलें असेल! तुझीं पुस्तकें होरपळलेलीं पाहत असतांना तुझें अंतःकरण होरपळून गेलें असेल! तुझ्या पुस्तकांतून अग्नीच्या ज्वाला निघत असतांना तुझ्या हृदयांतूनहि तितक्याच लाल क्रोधाच्या ज्वाला निघत असतील! तुझ्या जळणाऱ्या ग्रंथांतील आणि डोळ्यांतील ठिणग्या एकदमच बाहेर पडल्या असतील. भासा, कांहीं वेळानें तुझ्या पुस्तकांची आग विझली असेल, पण तुझ्या मनाची आग कधीं तरी विझली असेल काय रे? बहुधा ते बाहेरचे अंगार धुमसण्याचें थांबल्यानंतरहि अनेक वर्षेंपर्यंत तुझ्या [illegible] क्रोधाङ्गार तसेच धुमसत राहिले असतील! तुझीं नाटकें जाळलेलीं पाहून तूं रडला असशील, ओरडला असशील, हळहळला असशील, तळमळला असशील! त्या आगीच्या उष्णतेनें तुझे हातपाय गार पडले असतील! आणि त्या नाटकांची प्रसवित्री ती तुझी जीभ दुःखातिरेकानें वांकडी पडल्यानंतर कंठाच्या अग्रभागीं आलेले तुझे पंचप्राण त्या पेटलेल्या अर्चीवर आरूढ होऊन त्या सुप्रसिद्ध अर्चिरादि मार्गानें ब्रह्मलोकांत जाण्याला खरोखर उत्कंठित झाले असतील!

**कृतघ्नांवर तडाखा**

यानंतर, ज्या देशबांधवांसाठीं आपण ही आपत्ति सहन केली त्यांनीं हे ग्रंथ जाळले जात असतां उदासीनता धारण केली याबद्दलची आपली उद्विग्नता शिवरामपंत भासाला पुढें करून व्यक्त करतात :

‘ अशा स्थितींत, भासा, कोणाला तुझी दया आली नाहीं ? आणि कोणी तुझें सान्त्वन करण्याला उद्युक्त झालें नाहीं ? या उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ जाळूं नका हो नका, असें कोणीं म्हटलें नाहीं ? का सगळेच लोक दुर्बल होऊन बसले होते ? ’

यापुढें, आपले निबंध सजविण्यासाठीं आपण कोणती सामग्री कोठून आणली याचें सूचक वर्णन, भासाच्या निमित्तानें, करून पंत अखेरीस उद्वेगानें म्हणतात :

“ परंतु इतकीं संकटें सोसून अखेरीस सगळें व्यर्थ झालें ? भासा, तूं कवि होऊन ह्या अचेतन आणि अकृतज्ञ अशा सृष्टिसौंदर्याचें वर्णन करीत बसलास, त्यापेक्षां एखादा भगवद्भक्त होऊन त्या करुणाघन प्रभूचें कीर्तन करीत बसला असतास, किंवा एखादा योगयुक्त वेदान्ती होऊन त्या चैतन्यघन परमात्म्याचा अपरोक्ष अनुभव घेत बसला असतास तर त्यानें तुला अशा संकटकाळीं खात्रीनें दगा दिला नसता.” ( या ठिकाणीं बूर्के या राजकारणी थोर पुरुषाचे असेच खेदोद्गार वाचकांना आठवतील. )

**भविष्यवाणी खरी झाली !**

याप्रमाणें कळवळणारें, व क्षणैक निराश आणि क्षणैक उद्विग्न होणारें पंतांचें अंतःकरण अखेरीस आशायुक्त झालें आहे. लुप्त झालेले वेद, जाळलेली गुणाढ्याची बृहत्कथा, बुडविलेले तुकारामाचे अभंग, इत्यादि दाखले देऊन आपले जप्त झालेले निबंध पुनरपि बंधमुक्त होतील असा आशावाद पंतांनीं व्यक्त केला आहे. भासाला ते म्हणतात : “ पण हे भासाच्या आत्म्या, तूं असा निराश होऊं नकोस. परमेश्वर या जगांत जोंपर्यंत हयात आहे तोंपर्यंत दुष्ट लोकांनीं कितीहि अपकार केले तरी [illegible] निराश होण्याचें कारण नाहीं. ज्यानें बुडणारी श्रुति मत्स्यरूपानें तारली, ज्यानें ज्वाळांमध्यें प्रविष्ट झालेली सीतादेवी प्रत्यक्ष अग्नीच्याहि हातून श्रीरामचंद्राच्या हातीं आणून दिली, आणि ज्यानें तुकारामाच्या अभंगांची गाथा श्रीपांडुरंगाच्या रूपानें इंद्रायणीच्या डोहांतून कोरडीच्या कोरडी वर काढून आणली, तोच परमेश्वर तुझ्याहि कवितेच्या पाठीमागें उभा आहे.” पहिल्या निबंधांतल्याप्रमाणें याहि निबंधांतील पंतांची भविष्यवाणी खरी झाली; आणि त्यांचे नाहींसे झालेले निबंध आपल्या स्वतंत्र देशांतील

सरकारच्या कृपेनें पुनरुज्जीवित झाले. हा सर्वच निबंध पंतांच्या शैलीचा एक उत्कृष्ट नमुना आहे. त्यांत त्यांची उत्कट भावना, उत्तुंग कल्पनाशक्ति, आणि विशाल पांडित्य कांठोकांठ भरून राहिलें आहे. वरून भासाबद्दल बोलणें व आंतून आपल्या दुःखाचे कढ सूचित करणें हा ध्वनीचा अप्रतिम नमुना येथेंच आपल्याला पाहावयास मिळतो. 'आपल्या निबंधांत पंत भरून राहिलेले आहेत' या विधानाची सत्यता येथेंच पटते. इतका आत्मलक्ष्यी व काव्यमय निबंध उभ्या मराठींत हाच होय.

**एका रसिकाचा अरसिक अभिप्राय !**

आपल्या अमळनेर येथील (साहित्य-परिषद् १९५२) टीका विभागाध्यक्षीय भाषणांत याच निबंधाला उद्देशून एक आधुनिक टीकाकार, प्रा. श्री. के. क्षीरसागर म्हणतात, "'भासाची भवितव्यता' यासारख्या उत्प्रेक्षा-प्रधान पण उथळ लिखाणाला या काव्यरूप टीकेच्या (Creative criticism) वर्गांत जेव्हां आमच्याकडील कांहीं मंडळी घालतात, तेव्हां मला परम खेद होतो. पण अनेक शतकें संस्कृत अलंकारशास्त्राला महत्त्व दिल्यावर असा मूल्यसंकर झाला नाहीं तरच नवल !" आत्मनिष्ठ टीकापद्धतीच्या ज्या या भोक्त्यांना केशव-सुताच्या 'पुष्पाप्रत' या कवितेंत खुद्द केशवसुत दिसतात, त्यांना भासांत शिवरामपंत दिसूं नयेत, या गोष्टीचा मलाहि 'परम खेद होतो.' या लेखांत नुसत्या कोरड्या व कृत्रिम उत्प्रेक्षा नाहींत, तो उथळ नसून फार खोल आहे. व संस्कृतसाहित्यशास्त्र रसहीन व कृत्रिम अलंकारांची तरफदारी कधींच करीत नाहीं. माझ्या मतें पंतांचा हा लेख Recreative criticism चा उत्तम नमुना असून तें स्वतः एक उत्तम ध्वनिकाव्य आहे. त्यांतील ध्वनिगर्भ आत्मनिवेदन समजून घ्यावयास, आपल्या हातांनीं आपले जप्त निबंध जाळीत बसलेल्या शिवरामपंतांचेच पुढील जळजळीत उद्गार उपयोगी पडतील : "देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा होऊनसुद्धां मला जितका धक्का बसला नसता तितका सरकारनें माझा प्रतिप्राण असणारें दहा वर्षांतलें वाङ्मय जप्त करून दिला. व हाच माझा तरुणपणचा जिवंत मृत्यु होय." याच त्यांच्या भावनेचा सूक्ष्म व सूचक पाठपुरावा पृ. १६६ वरील 'काळे गोरे' अशासारख्या शब्दप्रयोगांतूनहि

सहानुभूतीनें पहावा, म्हणजे या लेखांतील सखोलता सहज जाणवेल. पण ती गोष्ट प्रा. क्षीरसागरांनीं, एवढा विरुद्ध अभिप्राय देण्यापूर्वीं, केली नसावी. मूळ कवीबद्दल सहानुभूतीचा अभाव, व एखाद्या साहित्यशास्त्राबद्दल गैरसमज असला कीं एरवीं रसिक असलेला टीकाकारहि रसिकत्वाला पारखा कसा बनतो याचा नमुना म्हणूनच प्रा. क्षीरसागरांचें वरील विधान येथें उल्लेखिलें आहे.

## वक्रोक्ति म्हणजे काय ?

शिवरामपंतांच्या शैलीच्या वर्णनांत 'वक्रोक्ति' हा शब्द अनेक वेळां वापरण्यांत येतो. त्याचा अर्थ केवळ छद्मी बोलणें, मिष्किलपणानें बोलणें, 'वर एक, आंत दुसरें' असें बोलणें एवढाच लोक घेतात. म्हणून त्या शब्दाची व त्याच्या व्यापक अर्थाची थोडी फोड येथें केली पाहिजे. संस्कृत साहित्य-शास्त्रांत 'वक्रोक्ति' हें काव्याचें प्राणतत्त्व मानलें आहे. सरळ, साधें, आहे तसें वर्णन करणारें (स्वभावोक्ति) आणि सौंदर्यपोषक, रमणीय, व थोड्या निराळ्या वांकड्या वाटेनें जाऊन जगाचें वर्णन करणारे (वक्रोक्ति) असे वाङ्मयाचे दोन प्रकार दण्डीनें आपल्या 'काव्यादर्शा'त (३६३) सांगितले आहेत. तो म्हणतो : 'भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम्।' भामहानें 'वक्रोक्तीमुळेंच काव्यार्थाला सौंदर्य येतें, वक्रोक्तीवांचून एकहि अलंकार साधतां येणार नाहीं. म्हणून कवींनीं वक्रोक्तीकडे सारें लक्ष द्यावें' असें स्पष्ट सांगितलें आहे. (सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते। यत्नोऽस्यां कविभिः कार्यः कोऽलङ्कारोऽनया विना – काव्यालंकार २·८५) 'श्लेषामुळें वक्रोक्तीला शोभा येते' (श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम्') असें म्हणून दण्डी श्लिष्ट लिखाणाला वक्रोक्ति मानतो, तर भामहानें वक्रोक्तीला अलंकाराच्या बुडाशीं असलेलें तत्त्व मानलेलें आहे. पण कुन्तलानें मात्र वक्रोक्तीला काव्यजीवित मानून तिचा व्यापक अर्थ विशद केला आहे. अतिशयोक्ति व वक्रोक्ति काव्यतत्त्वें या दृष्टीनें एकच समजण्यांत येतात.

## व्यापकाला थोडी मुरड

कुन्तलानें वक्रोक्तीची फोड पुढीलप्रमाणें केली आहे : 'मोठ्या चातुर्यानें युक्त अशा वेगळ्याच बोलण्याच्या प्रकारास वक्रोक्ति म्हणतात.'

( वक्रोक्तिरेव मैदग्ध्यभङ्गीभणतिरुच्यते । ) 'बोलण्याचा प्रसिद्ध आणि सर्वजनसामान्य मार्ग सोडून वैचित्र्य साधण्यासाठीं दुसरी – न्यारीच वाट जेथें अर्थव्यक्तीसाठीं अनुसरली जाते तेथें तिला वक्रोक्ति म्हणावें' ( प्रसिद्धं मार्गमुत्सृज्य यत्र वैचित्र्यसिद्धये। अन्यथैवोच्यते सोऽर्थः सा वक्रोक्तिरुदाहृता । ) वरील लक्षणांतील 'वैचित्र्यसिद्धि' याचा अर्थ अत्यंत असामान्य आणि आश्चर्यजनक पण सुदर आणि हृद्य वाटणारें विधान करणें असा घ्यावयाचा. या दृष्टीनें पाहिलें असतां सबंध काव्य-व्यापारच वक्रोक्तिमूल ठरतो; व शिवरामपंतांचे बहुतेक सारे निबंध काव्यमय असल्यानें त्यांमध्यें वक्रोक्ति आहे असें म्हणतां येण्यासारखें आहे. पण इतक्या व्यापक अर्थानें पंतांच्या लिखाणाला वक्रोक्तियुक्त म्हणणें खरें असलें तरी तें वैशिष्ट्यवाचक नाहीं. म्हणून वरील व्यापक विधानाला थोडी मुरड घालून घेतलेली कोणती वक्रोक्ति पंतांच्या शैलींत आहे तें पाहूं.

## Sublime कीं Beautiful ?

शिवरामपंतांची वक्रोक्ति समाधिगुणमूल, अलंकारमूल, लक्ष्यार्थमूल, आणि व्यङ्ग्यार्थमूल अशी चार प्रकारची आहे. दण्डीनें वक्रोक्तीला खरी शोभा श्लेषानें येते असें सांगितलें, असलें, आणि शिवरामपंत श्लेषप्रधान संस्कृत भाषेच्या साहित्यशास्त्राचे गाढे व्यासंगी असले, तरी त्यांच्या लिहिण्यांत श्लेष – मग तो शब्दश्लेष असो कीं अर्थश्लेष असो – फारच विरळ येतो ही मोठी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. कोल्हटकर, केळकर, फार काय विष्णुशास्त्रीसुद्धां, श्लेषयुक्त रचना करीत असतां परांजपे मात्र त्यापासून अलिप्त राहतात. त्यांनीं 'काळे गोरे, मलिन, उंच असे कांहीं शब्द द्व्यर्थी वापरले आहेत, पण ते क्वचित् प्रसंगींच. त्यांचें भावनोत्कट व कल्पना-प्रधान मन मोठाल्या विचारांची भव्य मांडणी करण्यांतच गुंतून गेल्यामुळें त्याला श्लेषासारखें किरकोळ सौंदर्यसाधन तितकें महत्त्वाचें वाटलें नसावें. प्रमाणबद्धता, बारीक कलाकुसर, ठाकठीकपणा हे पंतांच्या कलेचे विशेष नाहींत. भव्यता, उत्तुंगता आणि विशालता हे त्यांच्या कलेचे विशेष आहेत. म्हणून त्यांची कला sublime आहे, beautiful नव्हे, असें म्हटलें तर चालेल. समाधिगुण हा, दण्डीच्या कल्पनेप्रमाणें, निर्जीव किंवा अचेतन पदार्थांवर सजीव किंवा सचेतन प्राण्यांच्या धर्मांचा आरोप

केल्यानें शैलीमध्यें उत्पन्न होतो. शिवरामपंतांनीं आपलें भव्य शिल्प आणि उत्तुंग कलाकृति याच गुणानें सर्वत्र भूषित केलेल्या आहेत. शिवजीच्या राज्यस्थापनेला देवांचा आणि ऋषींचा आशीर्वाद असून यावनी सत्तेखालीं नाहक चिरडून गेलेल्या आणि सूड घेण्यास उत्सुक असलेल्या असंख्य मृत शूरांचा पाठिंबा होता हें दाखविण्यास पंत लिहितातः—

'हे हजारों आणि लाखों सूड त्या वेळीं योग्य संधीची मार्गप्रतीक्षा करीत बसलेले होते. ते कण्हत होते, कुंथत होते, आणि त्वेषाच्या किंकाळ्या फोडीत होते; तोडलेले पायहि धांवून जाऊं पाहत होते, कापलेले हातहि लढूं पाहत होते, आणि फोडलेले डोळेहि अतिशय त्वेषानें पाहत होते.' (पृ. ८६).

### रस्किन्‌ची Pathetic Fallacy

या Personification च्या एका करुणरसप्रधान प्रकाराला रस्किन्‌नें Pathetic Fallacy म्हटलें आहे. तोहि प्रकार शिवरामपंत वारंवार वापरतात. सह्याद्रीबद्दल ते लिहितात : 'मी स्वतंत्रतेचा पर्वत; परंतु हल्लीं मी परतंत्रतेंत आहें, असें पाहून वणव्याच्या रूपानें या पर्वताचें हृदय जळत असतें, झऱ्याच्या रूपानें तो अश्रू गाळीत असतो, आणि माझ्या रखवालदारीचा कांहीं उपयोग झाला नाहीं म्हणून वाऱ्याच्या मिषानें तो दुःखाचे दीर्घ श्वास टाकीत असतो.' (पृ. १२४). तसेंच पृ. १४२ वर कृत्तिकांना उद्देशून शिवाजीनें काढलेले उदात्त उद्गार हा Personification चा एक सुंदर नमुना होय.

### भवानी तलवार ही यजमानपत्नी !

शिवरामपंतांची अलंकारमूल वक्रोक्ति, त्यांच्या समाधिगुणमूल वक्रोक्ती- (Personification) प्रमाणेंच त्यांनीं विपुल प्रमाणांत सर्वत्र वापरली आहे. भव्य आणि तेजस्वी रूपकें पुढीलसारख्या ठिकाणीं दिसतातः—

"शिवाजीनें आरंभिलेला (स्वराज्यस्थापनेचा उपक्रम हाहि) एक रणयज्ञच होता. शिवाजी हा त्या रणयज्ञांतील यजमान, आणि त्याची भवानी तलवार ही यजमानपत्नी होय. सर्व महाराष्ट्र त्या रणयज्ञाचें स्थंडिल. श्रीसमर्थ रामदास आणि श्रीसाधुवर्य तुकारामबुवा हे त्या रणयज्ञाचे उपदेशक. (पृ. ८१)."

खोंचक आणि दाहक हेतूत्प्रेक्षा त्यांनीं सुरुंगासारख्या सर्वत्र पेरून

ठेवल्या आहेत—' शिवाजीला वाटू लागले कीं माझ्या परतंत्र देशातील प्रत्येक गोष्ट, जणों काय, शत्रूंच्या उपयोगासाठीं तयार करून ठेविली आहे. "ह्या गायी परकीयांच्या क्षुधाशमनासाठीं पुष्ट आणि मांसल होत आहेत! आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंगांतील तल्लखपणा शिकारीच्या योगानें वृद्धिंगत करण्यासाठीं हीं हरिणें चपळपणाची संवय करीत आहेत! [illegible] आपलें मस्तक नेऊन भिडवावयाचें अशी उच्चत्वा-विषयीं ज्यांची [illegible] अशा या मोठमोठ्या विस्तीर्ण वृक्षांच्या पोटांमध्यें दुसऱ्यांच्या चैनीचे पलंग, खुर्च्या, आणि त्यांच्या वैभवशाली इमारतींचे खांब! आपल्या देशबांधवांच्या रक्ताच्या दुर्गंधानें ज्यांना पीडा होत आहे अशा परकीय लोकाच्या घ्राणेंद्रियांच्या तर्पणासाठीं हीं सुवासिक पुष्पें! हिंदुस्थानातील देवांचीं देवळें पाडण्याच्या कामीं झालेल्या श्रमांमुळें उत्पन्न होणाऱ्या घर्मबिंदूंच्या परिहरणासाठीं हे थंडगार वारे!"

## नारळ फोडणाऱ्यानें तख्त फोडलें!

शिवरामपंतांनीं पुढील विरोध किती सुंदर तऱ्हेनें मांडला आहे तो पहा—

"सदाशिवरावभाऊ आदिकरून कोंकणांतील खेडेगांवांत राहणाऱ्या भट घराण्यांतील मुलांबद्दल, त्यांची तेव्हांची व पेशवे झाल्यानंतरची स्थिति ध्यानांत आणून, पंत काय म्हणतात तें ऐका :

"'दैवाच्या मनांत नसतें तर विश्वनाथ भटाचीं मुलें श्रीवर्धनच्या वाळवंटामध्यें नाचत-बागडतच पडलीं असतीं. फार तर माडाच्या झाडावर चढलीं असतीं. पंचक्रोशींतील अगदी शेवटच्या गांवाला गेलीं असतीं, आणि त्यांनीं एखादा भाऊबंदकीचा वाद जिंकला असता; परंतु परमेश्वराची इच्छा कांहीं निराळीच होती! माडावर चढणारीं तीं मुलें राज्यपदावर चढलीं. पचक्रोशींत भटकणारीं तीं मुलें अटकेपर्यंत भटकलीं. वाद जिंकणाऱ्या त्या मुलांनीं हिंदुस्थान जिंकला, आणि ज्या सदाशिवरावभाऊनें माडावरील ताजा नारळ कदाचित् बुक्कीनें फोडला असता, त्यानें बादशाही तख्त फोडलें!'" 'विषासाठीं कण्ठशोष' (भाग ८) या मथळ्यांतील वक्रोक्ति अशीच विरोधमूल आहे.

## अर्जुन वेडा का शहाणा?

वक्रोक्ति म्हटलें कीं जो अर्थ आजच्या मराठी वाचकांच्या मनांत येतो

तो अर्थ व्यक्त करणारी पंतांची अलंकारमूल वक्रोक्ति आतां सांगतों. पंतांचा भर त्यांतल्या त्यांत व्याजस्तुति ह्या अलंकारावर फार आहे. या अलंकारांत वर निंदा व आंत स्तुति, किंवा वर स्तुति व आंत निंदा असा वर्णनाचा प्रकार केलेला असतो. ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे 'अर्जुनाचा वेडेपणा' हा सबंध निबंध होय. अर्जुनाला स्वकीयांचा वध करून त्यांच्या रक्तानें माखलेले या पृथ्वीवरील भोग नकोसे झाले होते. वास्तविक पाहिलें असतां अर्जुनाचें हें वर्तन अत्यंत धर्म्य होतें; परंतु पंतांनीं मुद्दाम अर्जुनाची वरवर निंदा केली आहे, आणि जे जुलमी राजे लोक निरुपद्रवी प्रजेचा वध करून परक्यांवर राज्य करतात आणि धर्माधर्माकडे न पाहतां पृथ्वीवरील सर्व सुखोपभोग निःसंकोचपणें घेतात त्यांची वरवर स्तुति केली आहे. पण पतांचा खरा अभिप्राय अर्थात् याउलट आहे; म्हणजे अर्जुनाची स्तुति व जुलमी राजांची निंदा त्यांना अभिप्रेत आहे.

ते लिहितात: "अर्जुनाचा हा केवढा खुळचटपणा आहे! रक्ताचे डाग कायम राहतात काय? रक्ताचे डाग पाण्यानें, फार झालें तर साबण लावून धुतले म्हणजे जातात! एवढी साधी रसायनशास्त्रांतील गोष्ट अर्जुनाला माहीत नसावी हें अतिशय लज्जास्पद आहे! वेडाच्या भरामध्यें अर्जुन जीं धर्माचीं कित्येक तत्त्वे बरळला आहे तीं फार विलक्षण आहेत! कोणताहि समंजस मनुष्य इतका धर्मवेडा होणार नाहीं! जर कोणी कोणाला मारावयाचें नाहीं व दुसऱ्यापासून कोणी काहीं लुबाडून घ्यावयाचें नाहीं असें ठरलें, तर या जगांत लोक श्रीमंत होणार कसे? आणि श्रीमतांचे राजे होणार कसे? आणि कोणी राजे झाले नाहींत तर मग अनाथ प्रजेपासून कर कोण घेईल?"

## विपरीत लक्षणा आणि अन्योक्ति

याप्रमाणें निष्ठुराला दयाळू वांकड्याला सरळ, लहानाला मोठा, दुःखाला सुख, गैरसोईला सोय असें मोठ्या सूचकपद्धतीनें म्हणणें, व निष्ठुरता वक्रता, लहानपणा, दुःख व गैरसोय या गोष्टी अधिक भडकपणें मांडणें हा पंतांचा लेखनप्रकार व्याजस्तुतींतच जमा होतो. वाक्यार्थांत किंवा सबंध प्रकरणांत ही पद्धति असल्यास तो अलंकार होतो. निव्वळ शब्दांतच तो असल्यास तेथें विपरीत लक्षणा होते, एवढेंच काय तें.

'ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे' (साहित्य-संग्रह, भाग ३ ), व 'एका खडी फोडणाराची गोष्ट' ( भाग ८ ), यांत वरील-प्रकारची वक्रोक्ति आहे.

अलंकारमूल वक्रोक्तीचें दुसरें उदाहरण 'अप्रस्तुत प्रशंसा' किंवा अन्योक्ति. 'पशूंच्या साम्राज्याचा इतिहास' ( भाग ७ ), 'एक जुनी पुराणान्तरींची नवीन सांपडलेली गोष्ट', नवी सृष्टि ( साहित्य-संग्रह, भाग २ ) इत्यादि ठिकाणीं पशूंचा व्यवहार वर्णन करून पंतांनीं माणसांच्या तत्सम व्यवहाराचें वर्णन प्रस्तुत अप्रस्तुत नात्यानें सूचित केलें आहे. 'स्वयंवर व संकुल युद्ध' ही विशिष्ट व्यक्तींची गोष्ट ( कोकिळाबाई व तिच्या स्वयंवरास जमलेले अर्धवट सुधारक ) सामान्य अर्थ व्यक्त करणारी म्हणून याच 'अप्रस्तुतप्रशंसे'त मोडेल. शिवाय हिच्यामध्यें स्वयंवरपद्धतीचें विडंबन केलें असल्यानें तिचा खोंचकपणा अधिक धारदार झाला आहे. शिवरामपंतांच्या निबंधांचे कांहीं मथळेसुद्धां वक्रोक्तिगर्भ असतात. 'ब्लॅक होल' हा विशिष्ट घटनावाचक मथळा 'सबंध हिंदुस्थानच आज एक घातक कोंडमाऱ्याची आकुंचित जागा झाला आहे' या रूपकार्थानें वापरला आहे. 'शरद् ऋतूंतील मेघांनो, तुम्हीं काय केलें आहे म्हणून एवढ्या गर्जना करतां ?' ( भाग ४ ), यामध्यें अन्योक्ति आहे. या लेखांत सुधारक कांहींएक न करतां शतकृत्य केल्याच्या पोकळ गर्जना करतात, हा विषय उघडपणें मांडला आहे. वक्रोक्ति फक्त मथळ्यांतच आहे.

आतां लक्ष्यार्थमूल व व्यङ्गयार्थमूल वक्रोक्ति पहावयाची. 'नेमस्तांनासुद्धां देशासाठीं फार त्रास सोसावे लागतात. लेव्हीसाठीं नवे बूट व नवी प्यांट पैदा करण्यासाठीं चांभार व शिंपी यांजकडे त्यांना हेलपाटे घालावे लागतात !' यासारख्या वाक्यांत पंतांनीं 'त्रास' हा शब्द लक्ष्यार्थानें ( म्हणजे विपरीत लक्षणेनें ) 'सुख' या अर्थी वापरलेला आहे. अशा विशिष्ट शब्दयोजनेच्या स्थलीं लक्ष्यार्थमूल वक्रोक्ति असते असें वर सांगितलेंच आहे.

**व्यङ्गयार्थाची देवघेव**

व्यंग्यार्थ हा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांपैकीं कोणा तरी एकावरच आधारलेला असतो. पण वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांच्या शक्ति तो तो अर्थ व्यक्त करून थांबल्यावर त्यांतूनच एक नवा अर्थ संदर्भादीमुळें मार्मिक वाचकांच्या मनांत उत्पन्न होतो, त्याला व्यंग्यार्थ म्हणतात. 'गंगेवर माझें घर आहे'

या वाक्यांत गंगा म्हणजे ' एक पाण्याचा प्रवाह ' व फार तर गंगा म्हणजे ' गंगातीर ' हे दोन अर्थ – पहिला वाच्यार्थ व दुसरा लक्ष्यार्थ – प्रतीत झाल्यावर ' गंगा ' शब्दाची शक्ति सपते, पण ती थांबल्यावरहि घराचें पावित्र्य व शीतलता आपल्या ध्यानांत आल्यावांचून राहात नाहीं. हा जो नवा अर्थ त्यालाच व्यंजना, ध्वनि किंवा व्यंग्यार्थ म्हणतात. हा अर्थ लेखक व वाचक यांच्या मनामध्यें असलेल्या त्या त्या शब्दांच्या किंवा वस्तूंच्या इतर अनेक सबंधांच्या ( Associations ) समान ज्ञानामुळेंच उत्पन्न होतो. कुशल लेखक ते संबंध ध्यानांत घेऊनच ती शब्दयोजना करतात, व मार्मिक वाचक किंवा श्रोते तो निराळा अर्थ बरोबर हेरतात. शिवरामपंत या व्यक्तीची माहिती महाराष्ट्रांतील वाचकांना व श्रोत्यांना होती. त्यामुळें त्यांच्या शब्दयोजनेचा कोणता अर्थ आपण घ्यावयाचा हें त्यांना माहीत असे ! आणि तें त्यांना माहीत आहे, हें शिवरामपंतांना माहीत असे ! त्यामुळें संदर्भाच्या आधारावर लेखक–वाचक किंवा वक्ता–श्रोता यांमध्यें व्यंग्यार्थाची देव-घेव सुलभतेनें चाले

**सरकारासाठींच वाच्यार्थ !**

शिवरामपंत मुळांतच मोठे मिष्किल, सूचक व लाक्षणिक बोलणारे, आपल्या अतरगाचा थांग लागूं न देणारे, मोठे चतुर, सावध आणि चाणाक्ष गृहस्थ होते. त्यांतच इंग्रजी नोकरशाहीच्या मुस्कटदाबी करणाऱ्या कडक कायद्यांची तटबंदी चौफेर पडलेली त्यामुळें सरळ आणि साधें बोलणें, सत्य स्पष्ट शब्दांत वाच्यार्थानें सांगणें मोठें कठिण होऊन बसलें होतें. पंतांच्या मूळ स्वभावाला या परिस्थितीची जोड मिळाल्याने त्यांचें लिहिणें-बोलणें अधिक मिष्किल, अधिक सूचक, अधिक सावध, अधिक छन्नी, अधिक व्याजपूर्ण, आणि अधिक ध्वनिगर्भ झालें. त्यामुळें लिहिण्या-बोलण्यांतला वाच्यार्थ सरकारासाठीं व व्यंग्यार्थ मात्र वाचक व श्रोते यांसाठीं अशी वांटणी त्यांनीं मनाशीं कल्पिली होती ! कोणतेंहि उत्तम काव्य ध्वनिगर्भ असतेंच; पण पंतांचें हें राजकीय महाकाव्य विशेष ध्वनिगर्भ होण्याचें हें एक दुसरें आगंतुक कारण आहे. त्यांची वक्रोक्ति ही जशी स्वभावसहज होती तशी ती तत्कालीन जाचक परिस्थितीनें त्यांच्यावर लादलेलीहि होती. या जमान्यामुळें त्यांच्या ठायीं दृढमूल होऊन

बसलेली आणि त्यांच्या रोमारोमांत भिनलेली ही वक्रोक्ति त्यांच्या आवाजांतून, त्यांच्या शब्दांतून, त्यांच्या बोलण्यांतून, त्यांच्या न बोलण्यांतून, त्यांच्या श्वासोच्छ्वासांतून, लेखांतून, मथळ्यांतून, फार काय – जेथून वाट सांपडेल आणि वाट न सांपडेल तेथूनहि व्यक्त होत असे.

**त्यांचे अलंकार व ध्वन्यर्थ प्रबंधव्यापी**

शिवरामपंतांच्या वक्रोक्तीच्या सर्वच प्रकारांचा विशेष असा आहे कीं तिच्यामधील चेतनधर्मारोप ( Personification ), अलंकार किंवा लक्ष्यार्थ प्रायः सबंध निबंधभर विस्तारलेले असतात. आपल्या निबंधांत सांगावयाची मुख्य कल्पना ते प्रथम निश्चित करीत; व ती कल्पना ( Idea ) त्यांच्या कविमनांत घोळविली जात असतां तिच्यावर त्यांच्या भावनेचे, कल्पनेचे व प्रज्ञेचे संस्कार होऊन ती नवीन असें एकसंध रूप घेऊन बाहेर पडे. त्यामुळें त्यांनीं योजलेले अलंकारहि मूळ कल्पनेइतके भव्य व व्यापक असत. त्यामुळें यांचे अलंकार हे बहुधा ‘ प्रकरणालंकार ’ असतात, प्रबंधव्यापी असतात. त्यांच्या पोटांत इतर अलंकार आले तरी ते मुख्य अलंकाराला पोषक म्हणूनच आलेले असतात. हाच विशेष त्यांच्या व्यङ्ग्यार्थमूल वक्रोक्तीचाहि आहे. ‘ डेक्कन कॉलेजला पाहून केशवरावांच्या मनांत आलेले विचार ’ हा निबंध घ्या. यांत केशवरावांच्या ज्ञानी मनाची तळमळ व गोवाऱ्याच्या अज्ञानी मनाची समाधानी वृत्ति याची तुलना करून ‘ जेथें अज्ञानातच सुख आहे, तेथें सज्ञान होणें म्हणजे मूर्खपणाच होय ’ असा निष्कर्ष पंतांनीं वाच्यार्थानें काढला आहे. परंतु या निबंधांतील शब्दांच्या शक्ती वाच्यार्थ किंवा लक्ष्यार्थ व्यक्त करूनच थांबल्या आहेत असें जो वाचक मानील तो त्या गोवाऱ्याइतकाच अडाणी आहे असें खुशाल समजावें !! या निबंधांतील अनेक वाच्यार्थ, आणि ‘ या कॉलेजानें माझ्या सुखांत माती कालविली ’ व ‘ हा भाग्यवान् गोवारी सुखी आहे ’ यांतील लक्ष्यार्थ ( म्हणजे ‘ मला सज्ञान करून त्यानें उच्च असमाधान दिलें, व ‘ ह्या गोवाऱ्याच्या समाधानाला कांहींच किंमत नाहीं. ’ ) हे आपापले व्यापार करून विराम पावल्यावरहि शिवरामपंतांच्या मूळ शब्दांची शक्ति कायम राहते. किंवा वाच्य व लक्ष्य हे अर्थ थांबल्याजागींच शिवरामपंतांचा ध्वन्यर्थ किंवा व्यंग्यार्थ सुरू होतो.

### शिवरामपंतांचें मन केशवरावांच्या शरीरांत !

आणि तो असा आहे कीं, 'आपल्या वैभवशाली देशाची पारतंत्र्यांतील अवहेलना व अधोगति तुम्हां सुशिक्षित आणि सज्ञान प्रजाजनांना उघड्या डोळ्यांनीं पाहवते तरी कशी ? इतर देशांचे स्वातंत्र्यसंग्राम वाचा. आपल्या पूर्वजांच्या पराक्रमांची स्मृति ठेवा, आणि जुलमी राज्यसत्ता निर्मूल करून स्वातंत्र्यसुखाचे धनी व्हा.' केशवरावांचें असमाधानी आणि बंडखोर मन हें शिवरामपंतांचेंच मन होय. त्यांनीं तें लेखनाच्या सोईसाठीं आणि गैरसोईमुळें केशवरावांच्या शरीरांत घातलें आहे येवढेंच काय तें. 'काळ' या तत्त्वाच्या शास्त्रीय व वाच्यार्थी विवेचनाचा व्यंग्यार्थहि असाच आहे. 'काळानें साम्राज्यें घडलेलीं आणि मोडलेलीं पाहिलीं आहेत.' 'द्रौपदीच्या अपमानाच्या वेळीं भीमाआधीं काळच 'सूड ! सूड !' म्हणून ओरडला' हें लक्ष्यार्थी बोलणें संपल्यावर जो ध्वन्यर्थ स्फुरतो तो हा कीं, 'काळानें हिंदुस्थानावरील इंग्रजी राज्याची उत्तरक्रिया योजून ठेविली आहे; तुम्ही निराश न होतां प्रयत्न करा' 'ईश्वरी लीला अगाध आहे' यांतला हाच व्यापक ध्वनि. 'शिवाजीचें पुण्याहवाचन', 'शिवाजीची एक रात्र' वगैरे शिवाजीविषयक लेखांत शिवाजीची योजना शिवरामपंतांनीं ध्वन्यात्मकच केली आहे.

### तुम्हीच आजचे शिवाजी

तत्कालीन यावनी सत्ता, तिनें केलेले जुलूम, उध्वस्त केलेला धर्म, विस्कळित केलेली संस्कृतीची घडी, फोडलेलीं देवळें, व भंगविलेल्या मूर्ती यांचें हृदयद्रावक वर्णन करून, व शिवाजीच्या गुणांची तारीफ करून शिवरामपंतांना त्यांच्या काळांत काय लाभ होणार होता ? तो एक केवळ गतेतिहासाचा भाग होता. तसेंच भाऊसाहेबांनीं दिल्लीचें तख्त घणांनीं फोडलें याहि घटनेच्या चर्वितचर्वणानें त्यांना काय मिळणार होतें ? *मुसलमानांविरुद्ध हिंदूंच्या भावना चेतविणें हाहि त्यांचा हेतु असणें* संभवनीय नाहीं. कारण त्या वेळीं 'राज्यकर्त्यांविरुद्ध एकसंध हिंदुस्थान' असें राजकारण होतें. या लेखांचा नुसता वाच्यार्थच पाहिला तर खरोखर हा शिवरामपंतांचा प्रयत्न निष्फळ होता. फार झालें तर त्यानें वाचकांस आपल्या ऐतिहासिक पूर्वजांबद्दल अभिमान वाटला असता. पण यांतील

ध्वन्यर्थच महत्त्वाचा होता. यावनी सत्तेखालीं चिरडलेला आपला देश आणि इंग्रजांच्या जुलुमानें हैराण झालेली तीच आपली मायभूमि या एकच होत. त्या वेळचे शत्रु यवन, आजचे आंग्ल – एवढाच फरक. त्या वेळीं शिवाजीनें व भाऊनीं पराक्रमानें यावनी सत्ता नेस्तनाबूद केली. तुम्ही आजचे शिवाजी व सदाशिवरावभाऊ व्हा. इंग्रजांशीं सामना द्या. देशस्वातंत्र्य तुमचेंच आहे. हें पंतांना सुचवावयाचें होतें. म्हणून त्यांनीं शिवरायाला आळविलें, परमेश्वराची करुणा भाकली, संतांना ते शरण गेले. सह्याद्रीला आणि मंगळाला ' स्वातंत्र्याचा पर्वत ' आणि ' स्वतंत्रतेचा तारा ' म्हणून त्यांचा अपार गौरव केला. शिवरामपंतांच्या निराशा, दुःखें, तळमळ, संताप, आशा, समाधान, कौतुकें, निंदा आणि स्तुति या सर्वांचा ध्वनि ' राजकीय स्वातंत्र्यप्राप्ति ', ' तदर्थ प्रयत्न ' आणि तदर्थ उद्दीपन हाच असे.

**' सैतानी राज्य ' म्हणणारे पहिले कोण ?**

वाच्यार्थी व लक्ष्यार्थी लिखाण मोठ्या खुबीनें लिहून झाल्यावर शेवटीं शिवरामपंतांची भव्य व मिष्किल मूर्ति वाचकांच्यापुढें, जणों काय, उभी राहून ' माझा व्यंग्यार्थ ध्यानीं आला ना ? ' असा सवाल टाकीत असे. ' आपलें सुख काय झालें ? ' ( भाग ६ ) या लेखांत शिवरामपंतांनीं वाचकांना हा प्रश्न टाकला आहे. आपण एके काळीं सुखी होतों. आधुनिक सुधारणा – पोस्टें, रेल्वे, तारायंत्रें आणि इंग्रजी भाषा – नसतांनाहि समाधानी होतों. आज त्या असतांनाहि आपण दुःखी आहों हें आश्चर्य आहे. ' मानस-सरोवरामध्यें आकंठ बुडलेले असून आपण तृषाक्रान्त झालेले आहों, कल्प-वृक्षाच्या झाडाखालीं बसलेले असतांहि आपण प्रत्यहीं हताश होत आहों, अन्नपूर्णेच्या संनिध असून उपाशी मरत आहों...आणि अमृताच्या डोहांत पोहत असतांनाहि आपण मरणोन्मुख झालों आहों.' अशी आपली स्थिति कां झाली ? असे सूचक प्रश्न विचारून पंत टॉल्स्टॉयची एक गोष्ट शेवटीं सांगतात. त्या गोष्टीमध्यें सैतानानें आणि सैतानाच्या हस्तकांनीं आधुनिक सुधारणांच्या मिषानेंच पृथ्वीवर दुःखाचें साम्राज्य कसें स्थापन केलें याचें वर्णन आहे. वर शिवरामपंतांचे सूचक प्रश्न व त्याखालीं ही नुस्ती गोष्ट. यांच्या साहाय्यानें वाचकांनींच आतां आपल्या सुखनाशाचें उत्तर द्यावयाचें !

आणि तें ध्वनित उत्तर म्हणजे 'सैतानी इंग्रजी राज्यानें आमचें सुख हिरावून नेलें' हें होय. इंग्रजी राज्याला 'सैतानी राज्य' असें उघडपणें महात्मा गांधींनीं म्हटलेलें आपल्याला माहीत आहे. पण त्यापूर्वी किती तरी वर्षें शिवरामपंतांनीं आपल्या ध्वनिगर्भ व प्रच्छन्न पद्धतीनें तेंच शेलकें विशेषण त्या राज्याला त्या भयंकर काळीं लाविलें होतें, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. प्रच्छन्नाला प्रकटता आणणारें माहात्म्य केवळ 'काळा'-चेंच असें येथें म्हटलें पाहिजे.

**सतारीवरील 'स्वातंत्र्याचा' झंकार !**

शिवरामपंतांचे 'काळां'तील निबंध म्हणजे एक सतारच होती. त्या निबंधांतले राजकीय, सामाजिक, ऐतिहासिक, धार्मिक, आणि तत्त्वज्ञानात्मक किंवा वाङ्मयीन विषय व ते विषय मांडण्याचे विविध प्रकार हे त्या सतारीचे पडदे होते. त्या पडद्यावरील निरनिराळ्या तारा म्हणजे त्यांच्या विविध भावना होत्या. त्यांवर त्यांचीं कलात्मक बोटें सारखीं फिरत होतीं. वक्रोक्तीच्या नखीनें ते मुख्य तार छेडीत होते. पण या सर्व संचांतून एकच सुरेल गत — विविध पडद्यांतील कोमल आणि तीव्र स्वरांच्या संमेलनानें — श्रोत्यांस ऐकूं येत होती. तीच त्यांच्या कानांत पुढें पुष्कळ काळ झंकारत राहात होती. आणि ती म्हणजे 'स्वातंत्र्य, स्वातंत्र्य, स्वातंत्र्य'. हाच त्यांचा अखंड ध्वन्यर्थ, व हाच त्यांच्या कवित्वाचा आणि रसिकत्वाचा 'परतत्त्वस्पर्श' !

**Humorist का Satirist ?**

परांजप्यांच्या या वक्रोक्तिगर्भ शैलीला कोणी उपरोधिक, उपहासात्मक, किंवा व्याजोक्तिपूर्ण अशीं विशेषणें देतात. हीं विशेषणें विनोदाच्या प्रकारांना दिलेल्या इंग्रजी संज्ञांचीं (म्हणजे Satire, sarcasm, irony, cutting invectives यांचीं) भाषान्तरें आहेत. विशिष्ट प्रकारच्या विनोदाचे जनक म्हणून पंतांना मराठी वाङ्मयांत निश्चित स्थान आहे. पण त्यांचा विनोद खेळकर, सौम्य आणि सहानुभूतीचा नाहीं. तो तीव्र, बोचकारे घेणारा, आणि मनाच्या अढींतून उत्पन्न झालेला आहे. विनोदाचे दोन प्रकार मानतात; एक तोडणारा व दुसरा जोडणारा. (Humour either to kill or to cure). त्यांतील पंतांचा विनोद

पहिल्या प्रकारचा होता. म्हणून त्यांना Humorist म्हणण्यापेक्षां Satirist म्हणणेंच रास्त होईल. तीव्र भावनांच्या आचीनें मन व्याप्त असतांनाहि आपल्या भावनाकडे तटस्थतेनें पाहणें शिवरामपंतांना जमत नसे. त्यांचें मन फार अभिनिवेशी, आत्ममग्न, आणि अहंवादी होतें. त्यांच्याजवळ तडजोडीची आणि देवघेवीची भाषा नव्हती. त्यामुळें प्रतिपक्षाची बाजू समजून घेऊन त्यांच्यावर बरोबरीच्या नात्यानें वागण्या-ऐवजीं ते त्यांस क्षुद्र लेखून, दूर ठेवून, आणि तिरस्कारून पुरे हास्यास्पद करीत. म्हणून त्यांचा विनोद तिखट, लागट, आणि मर्मभेदी झाला. तीक्ष्ण कट्यार ही भोसकण्यासाठीं असते, डिवचण्यासाठीं किंवा गुदगुल्या करण्यासाठीं नव्हे, हेंच खरें.

## शंकराचार्यांचा नवा अवतार

शिवरामपंतांच्या वक्रोक्तीचा व त्यांच्या आत्मनिष्ठ आणि काव्यमय शैलीचा एवढा विचार झाल्यावर त्यांच्या कांहीं निबंधांत आढळणाऱ्या वस्तुनिष्ठ व शास्त्रीय लेखनपद्धतीबद्दलहि दोन शब्द सांगितले पाहिजेत. प्रस्तुत संग्रहांतील ‘ ईश्वर विभु आणि नित्य आहे ’ या निबंधांतील लेखन-पद्धति अशी संपूर्ण शास्त्रीय आहे. काव्यमय पद्धतींत शिवरामपतांवर जशी बाणाच्या गद्याची छाप दिसते तशी त्यांच्या शास्त्रीय शैलीवर संस्कृतांतील शंकराचार्यादींच्या भाष्यसरणीचा ठसा संपूर्ण उमटलेला दिसतो. वरील निबंध वाचताना त्यांतील आपलीं प्रमाणें मांडण्याची पंतांची पद्धति, प्रतिपक्षाचें खंडण करण्याची त्यांची रीति, व ‘ अभ्युपगम ’, ‘ गौरव ’, ‘ लाघव ’ हे त्यांचे पारिभाषिक शब्द इत्यादि प्रकार पाहून आद्यशंकराचार्य पतांच्या मिषानें सांख्य–वैशेषिक अ णि बौद्ध–जैन या मतांच्या खंडणाप्रमाणें ख्रिस्तदर्शनखंडणासाठीं अवतरले आहेत कीं काय असा भास होतो.

## तर्काच्या पकडींत

भाष्यसरणींतील परमत-खंडणाची तार्किक किंवा न्यायघटित पद्धति अशी आहे कीं —प्रथम प्रतिपक्षालाहि मान्य असणारें एखादें सर्वसंमत प्रमेय मांडावयाचें. त्या प्रमेयाशीं प्रतिपक्षाच्या मताचा विरोध दाखवा-वयाचा. तो ‘ विरोध नाहीं ’ असें सिद्ध करण्यास प्रतिपक्षी जीं जीं कारणें दाखवील तीं तीं लटकीं पाडावयाचीं, कोणत्याहि वाटेनें तो पळून जाऊं

लागला तरी त्याची वाट रोखावयाची, व शेवटीं ‘ ज्या अर्थीं तुझींच मतें सर्व बाजूंनीं तुझ्याच गळ्यांत येतात त्या अर्थीं तूं पहिलें गृहीत धरलेलें मत तरी सोड, नाहीं तर आपलीं धर्ममतें असमंजस आहेत हें तरी कबूल कर.’ अशा तर्कांच्या चिमट्यांत त्याला धरून त्याचा पराभव करावयाचा. या पद्धतीचा अवलंब पंतांनीं कसा केला आहे पहा.

‘ ईश्वर विभु ( म्हणजे सर्व ठिकाणीं सदैव असणारा, विश्वव्यापक ) आहे, हें तत्त्व सर्व धर्मांना व ख्रिस्त धर्मालाहि मान्य आहे. हें तत्त्व मान्य करूनहि ख्रिस्ती लोक म्हणतात कीं, ‘ आम्ही सांगूं त्याच वाटेनें गेलांत तर तुम्हांस ईश्वर भेटेल.’ पण ईश्वर जर सर्वव्यापक आहे तर तुमच्या बाप्तिस्माच्या वाटेनेंच त्यांच्याकडे कशास जावयास पाहिजे ? त्याला कोठल्याहि धर्माच्या गोटांतून हांक मारली तरी चाललीच पाहिजे. पण तुमचा तसा आग्रह आहे, याचें कारण तुम्हांला कांहीं ऐहिक लाभासाठीं इतर धर्मांतील माणसें आपल्या धर्मांत ओढावयाचीं आहेत. पण यामुळें तुम्हीं पेंचांत पडत आहां. तुम्हांला धर्मान्तराचें हें वेड तरी सोडलें पाहिजे, नाहीं तर आमचा ईश्वर अविभु, अव्यापक व संकुचित आहे हें तरी कबूल केलें पाहिजे. देवाला अव्यापक समजत असाल तर तो मुंबई, अमेरिका इत्यादि ठिकाणीं भक्तांना तारण्याच्या कामांत गुंतला असतां, त्याच वेळीं आणखी इतर ठिकाणीं मरणाऱ्या आपल्या भक्तांना कसा तारणार ? म्हणून कोठूनहि गेलांत तरी तुमच्या गळ्यांत धोंगडें येतें.

**तर्कांत कर्कश पण काव्यांत कोमल ! !**

या भाष्यसरणींतहि पंत चांगलेच सराईत आहेत, हें पाहिलें म्हणजे कांहीं प्राचीन पंडितकवींनीं आपल्या पांडित्य व कवित्व या दोन्हीहि गुणांतील सव्यसाचित्वाविषयीं जी यथार्थ दर्पोक्ति प्रकट केली आहे तिची आठवण होते. ते म्हणतात, ‘ तर्केषु कर्कशधियो वयमेव नान्ये। काव्येषु कोमलधियो वयमेव नान्ये ’ ( शास्त्रीय चर्चेंत कर्कश आणि कठोर असणारी आमची बुद्धि काव्यरचनेंत कमालीची कोमल बनते. हा चमत्कार आमच्याशिवाय दुसऱ्या कोणास साधणार आहे ? ) पंतांचा न्याय, वेदान्त, मीमांसा, निरुक्त, अलंकार, आणि व्याकरण या संस्कृत शास्त्रांचा व्यासंग फार गाढा होता. स्वकीयांच्या व ग्रीक, रोमन व युरोपियन

यांच्या इतिहासाचा त्यांनीं सूक्ष्म अभ्यास केला होता. इंग्लिश, मराठी व संस्कृत या भाषांतील ललित व ललितेतर वाङ्मयाचें अवगाहन त्यांनीं केलें होतें. युनिव्हर्सिटीच्या परीक्षांमधील संस्कृतचीं पारितोषिकें आणि शिष्यवृत्त्या त्यांनीं पटकाविल्या होत्या. त्यामुळें ते आधुनिक व प्राचीन अशा दोन्हीहि काळांतील कल्पनांप्रमाणें खरे 'पंडित' होते. निसर्गानें त्यांना प्रतिभेचें देणें भरपूर दिलें होतें. त्यांची प्रज्ञा जिवंत आणि जातिवंत होती. आणि त्यांचें ज्ञानपरिशीलन अचाट होतें. याप्रमाणें काव्यसंपदेची सर्व सामग्री 'नैसर्गिकी च प्रतिभा, श्रुतं च बहुनिर्मलं । अमन्दश्चाभियोगश्च' त्याच्याजवळ गडगंज होती. म्हणूनच ते आधुनिक काळाचे पंडित-कवि झाले. मात्र ते गद्य काव्यकर्ते होते. ज्ञानेश्वर, तुकोबा, एकनाथ इत्यादींचा विषय जसा परमार्थ, रस जसा भक्ति किंवा शान्त, आणि उद्देश मोक्षप्राप्ति, तसा पंतांचाहि देशस्वातंत्र्य हा एकच विषय, देशभक्ति हा एकच रस, आणि राजकीय मोक्ष हा एकच प्रेरक उद्देश होता.

**तंत्र नसेल, पण महामंत्र आहे !**

अशा या राजकीय आणि सांस्कृतिक ध्येयवादानें भारलेल्या पंडित-कवीनें लिहिलेलें गद्यकाव्य म्हणजे त्यांचे बहुतेक निबंध आहेत. त्यांत भाष्यसरणीचे किंवा विचारप्रवर्तक गद्यसरणीचे ('धर्मकल्पनांचा परिणाम', 'जसे लोक तसे त्यांचे देव', 'जोसेफ मॅझिनी') असे लेख असले तरी बहुसंख्य लेख काव्यमय शैलीचे आहेत. व तदितर लेखांतूनहि त्यांची काव्यशैली मधून मधून डोकावतांना दिसते. कांहीं निबंध कथेचें रूप घेऊन, तर कांहीं आत्मनिवेदनाचे वा दुसऱ्यास उद्देशून केलेल्या भाषणाचें प्रावरण घेऊन प्रकट झालेले आहेत. प्रायः आत्मलक्षी आणि बहुरूपी असे हे पंतांचे निबंध तत्पूर्व गंभीर व ज्ञानप्रधान निबंध व तदुत्तर ललित निबंध (लघुनिबंध) यांमधील दुवा साधणारे आहेत. पूर्वींच्या निबंधांत आत्मनिष्ठा व लालित्य नव्हतें, तर नंतरच्या फडके, काणेकर, खांडेकरादींच्या निबंधांत पंतांचा भव्य व उदात्त ध्येयवाद नाहीं. लघुनिबंधांत कलाकुसर आहे, तंत्रबद्धता आहे, बहुविधता आहे, आणि स्वैर आत्माविष्कारहि आहे. पण त्यांत आविष्कार पावणारा या निबंधकारांचा आत्मा – विषयांच्या क्षुद्रत्वामुळें, लघुत्वामुळें किंवा मनोरंजनाच्या ध्येयामुळें

— त्यांच्या निबंधाप्रमाणेंच ‘ लघु ’ वाटतो. शिवरामपंतांचे निबंध स्थलविशेषीं तंत्रदृष्टीनें सदोष, प्रमाणशून्य, पुनरुक्तिमय व पाल्हाळीकहि आहेत. त्यांत विविधता नाहीं, भावनेची एकच तार सारखी खेंचलेली आहे, कल्पनेच्या भराऱ्यांचा मार्ग ठरीव आहे, ओढा पौराणिक व जुन्या काव्यशास्त्रीय संकेतांकडे आहे; आणि पतांच्या मनोवृत्तीचे इतरहि कांहीं दोष त्यांत प्रतिबिंबित झाले आहेत. हें सर्व मान्य करूनसुद्धां असें म्हणावेंसें वाटतें कीं, त्यामध्यें प्रकट झालेली पंतांची विशालता, भव्यता, ध्येयाचें पावित्र्य, आणि समाजाला भारून टाकणारें अचाट मंत्रसामर्थ्य दुसऱ्या कोणाहि [illegible] प्रकट झालेलें नाहीं. त्यांत आधुनिक तंत्र नसेल, पण सार्वकालिक स्फूर्ति देणारे महामंत्र आहेत.

## शिवरामपंत आणि सावरकर

बऱ्याच बाबतींत शिवरामपतांच्या समीप येणारे निबंधकार म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकर हे होत. दोघांतहि सारखाच ध्येयवाद, दोघांचीहि सारखीच काव्यात्मता, आणि दोघांचीहि सारखीच उत्कट स्वातंत्र्यप्रीति आहे. एके काळीं शिवरामपत हे [illegible] सुप्त शक्तीला स्फूर्ति देणारे त्यांचे गुरुहि होते. पण सावरकरांचा पंतांनीं उपेक्षिलेला सामाजिक-सुधारणाविषयक ध्येयवाद त्यांच्या राजकीय [illegible] उत्कट व भव्य आहे. ते शिवरामपंताइतपत काव्यात्म असले तरी त्यांची काव्यकल्पना अंतरिक्षांतच संचारत न राहतां व्यवहाराच्या भूमीवर स्थिरावते आपल्या कल्पनारम्य ध्येयांना प्रत्यक्ष व्यवहारांत सगुण आणि साकार करण्याची कृतिशीलता त्यांच्यामध्यें आहे. ते ध्येयवादाच्या काव्यमय उन्मादांत रंगतात, पण त्या उन्मादाला व्यावहारिक रूप देण्याच्या प्रयत्नाकडे त्यांची योजकता त्याच वेळीं जागरूकतेनें वळलेली असते.

## ध्येयवादांतून वास्तवाकडे

शिवरामपंतांना [illegible], हिंदुत्वाचें, स्वभाषेचें, आणि प्राचीन आर्यसंस्कृतीचें एक जबरदस्त, मादक आणि विलक्षण आकर्षण होतें. त्यानें स्वतः भारून जाऊन त्यांनीं आपल्या सामर्थ्यशाली लेखणीनें आणि वणीनें इतरांसहि भारून टाकलें. आपल्याविषयीं प्रेम व परकयांबद्दल तिरस्कार निर्माण केला. हें त्यांचें सर्व कार्य थोरच आहे.

पण या आपल्या प्रेमाच्या विषयांना नेमकें कोणतें व्यावहारिक रूप दिलें असतां सद्यःकालांत ते उपदेशनीय आणि आचरणीय होतील याचा सूक्ष्म आणि स्पष्ट विचार त्यांनीं फारसा कोठें सांगितला नाहीं. सावरकरांनीं मात्र अशाच भारतीयत्वाला हिंदुराष्ट्रवादाचें व्यावहारिक रूप दिलें. आत्मप्रेम व परद्वेष या भावनांना सशस्त्र क्रान्तिवादांतून स्वतःच्या कृतीनें मोकळी वाट करून दिली. धर्मान्तराला शुद्धिसंघटन-चळवळीनें व स्वभाषा-भ्रष्टतेला भाषाशुद्धिवादानें प्रत्यक्ष आळा घातला. स्वसंस्कृतिप्रेमामुळेंच तिच्यामधील विषमताजन्य विघटना काढून टाकण्यासाठीं अस्पृश्यतेविरुद्ध मोहीम केली. धर्मशास्त्रांना शुद्धता यावी म्हणून रूढीवर हत्यार चालविलें. आणि याच पद्धतीनें, पंतांसारख्याच काव्यप्रवण वृत्तीच्या सावरकरांनीं केवळ आपल्या कार्यप्रवणतेमुळें आणखी अनेक कार्यें प्रत्यक्ष केलीं. त्यामुळें संपूर्ण सावरकरांच्या प्रेरणांचें एखादें गुरुस्थान मानावयाचें झालेंच तर तें सामाजिक बाबतींत रानडे-आगरकर, आणि राजकीय बाबतींत लोकमान्य टिळक असें मानावें लागेल. सावरकर आणि परांजपे यांच्या मनोरचनेंतील हे मूलभूत साम्यभेद त्यांच्या निबंध-शैलींतील सारखेपणाला आणि [illegible] कारण झालेले आहेत.

## भावना आणि विवेक

पंतांच्या निबंधांतील काव्य हें कल्पनारम्य ध्येयवादाचें चित्रण करताना त्याची व्यावहारिक व वास्तव बाजू विचारास घेत नाहीं. तें तारे आणि नक्षत्रें यांच्याशी संलाप करतें, उच्च पर्वताशीं एकरूप होतें, वृक्षांना बोलवितें, आणि महासागर व महानद्या यांत अवगाहन करतें. सावरकरांचें काव्य व्यावहारिक योजनाबुद्धीच्या हुकुमतीखालीं वावरत असल्यानें वरील काव्यविषयांच्या संगतींत राहूनसुद्धां आपला वास्तव भूमीवरील पाय चळूं देत नाहीं. तें त्या नक्षत्र-तारकांच्या, त्या उच्च पर्वतांच्या, त्या वृक्षांच्या, आणि त्या जलाशयांच्या – प्रकाश, उंची, पालवी आणि आर्द्रता या गुणांचा आपल्या कार्याच्या योजनेशीं संलग्न करूं पाहतें. त्यांच्या चलनी नाण्यांवर एका बाजूस व्यवहार व वास्तवता आणि दुसऱ्या बाजूस ध्येयवाद कोरलेला आहे. आपल्या प्राचीन अध्यात्म-शास्त्रावरील आदराबरोबरच त्यांनीं पाश्चात्य विज्ञानशास्त्राची प्रीति

चाळगिली आहे. डोळस धर्मश्रद्धेच्या जोडीला त्यांनीं बुद्धिप्रामाण्य बसविलें आहे; आणि पारलौकिक कल्याणाची योग्य ती बूज राखून ते ऐहिकतेचे पुरस्कर्ते झाले आहेत. त्यामुळें निर्भेळ कल्पनारम्य ध्येयवादामुळें शिवरामपंतांचें काव्य अधिक मोहक आणि सरस वठलें असलें तरी सावरकरांच्या साक्षात् कार्यप्रेरकत्वाची तीक्ष्ण धार त्याला नाहीं. हे दोघेहि राजकारणी असल्यानें त्यांच्या ललित वाङ्मयाला 'कार्यप्रेरकता' ही कसोटी लावणें गैर होणार नाहीं. निदान पंतांच्या ठायीं ती कमी असल्यानें व सावरकरांच्या ठायीं ती जास्त असल्यानें दोघांच्या वाङ्मयाची घटना थोडी वेगळी वेगळी झाली आहे एवढें मात्र नमूद करून ठेवणें क्षम्य होईलसें वाटतें. सावरकरांचे निबंध बांधेसूद, शब्दयोजना निश्चितार्थी आणि मोजकी, भावना तर्काच्या बंदिस्त पाटांतूनच वाहणारी, कल्पना प्रज्ञेच्या कह्यांत आणि निश्चित उद्देशाला पोषक, भाषा ओघवती असली तरी सुटसुटीत, आणि शब्द खुद्द सावरकरी घडणीचे. संयम आणि प्रेकरता सर्वत्र. आवाहन वाचकांच्या भावनेबरोबर त्यांच्या व्यवसायात्मक बुद्धीलाहि. असा त्यांचा थाट आहे.

**तिटकारा शास्त्रांचा नव्हे तर—**

नमुना म्हणून सावरकरांचे खालील उतारे पाहावेः—

"श्रुति व श्रौत संस्कृति त्या काळच्या जगांत त्यांच्या शत्रूशीं लढतांना दिग्विजय गाजवूं शकलीं म्हणून आजच्या विज्ञानयुगांतहि तसा टिकाव तीं धरूं शकतील ही आशा व्यर्थ आहे. 'इन्द्रा, धांव! चंद्रा, अग्ने, आमचे शत्रू निर्दाळ!' अशा वैदिक प्रार्थनांनीं देव साहाय्यास धांवत नसून वैज्ञानिक सूक्तांनींच त्यांना दासांसारखें राबवून घेतां येतें. हें पुष्कळ अंशीं अनुभवसिद्ध ठरलें आहे. महाभारतांतील गांडीव धनुष्य भंगलें! आतां मशीनगन्सशीं गांठ आहे." (सा. सा, भाग २ रा).

"किती वर्षांपूर्वी बाटलेल्यांना शुद्ध करावें याचा शास्त्राधार धुंडण्यांत जी शतकेंच्या शतकें घालवीत आहे, जागतिक व्यापारानें नी आक्रमणानें जें तें प्रबळ राष्ट्र प्रबळतर होत असतां परदेशगमन वा समुद्रगमन करावें कीं नाहीं याचा शास्त्रार्थ चघळीत आज पंधराशें वर्षें जी प्रवृत्ति पंचगव्याच्या हौदांत डुंबत राहिलेली आहे, फार काय, परधर्मी हरिद्वेष्टे

म्लेंच्छ हे स्पृश्य आहेत पण स्वधर्मी हरिभक्त हिंदु महार हे अस्पृश्य, असा निर्लज्ज निर्णय जी प्रवृत्ति देऊं शकते, त्या शब्दनिष्ठ, श्रुतिस्मृतिपुराणोक्त 'सनातनी' प्रवृत्तीपायींच आपलीं जागतिक साम्राज्यें बुडविणें आपल्या राष्ट्रशत्रूंस त्या प्रवृत्तीच्या अभावीं जातें त्याहून दसपटीनें सुलभतर गेलें. आपलें राष्ट्रीय स्वातंत्र्यहि संरक्षिणें अधिक कठिण झालें; नवीन राज्य संपादिण्याच्या कार्यीं तर पदोपदीं तिची नाठाळ 'अटक' आडवी येत आहे अशी आमची इतिहासावरून नी अनुभवावरून ठाम निश्चिती झाल्यामुळें त्या 'सनातनी' शास्त्राच्या एरंडाच्या गुऱ्हाळाच्या आणि त्या 'वचनात्प्रवृत्तिर्वचनान्निवृत्ती' चा आम्हांस अगदीं तिटकारा आला आहे. श्रुतिस्मृतिप्रभृति परमवंदनीय शास्त्रांचा नव्हे !" (क्षित्ता).

## दुःखाच्या गळ्यांत किंकाळीचा ढोल

अंदमानांतील आपला कष्टमय आणि दारुण वृत्तान्त लोकांस सांगावा कीं न सांगावा याविषयीं सावरकरांची भावना व विवेक यांमध्यें चाललेलें पुढील तुंबळ युद्ध पाहाः—

"ह्या जीवनकलहाच्या नगाऱ्याच्या घाईत आपण काय ही आपली येवढीशीशी टिमकी वाजवीत बसावें ? परंतु दुःखाच्या गळ्यांत किंकाळीचा ढोल हा निसर्गानेंच बांधलेला आहे कीं तो वाजवून त्यानें आपली शक्य ती करमणूक करून घ्यावी. ससाण्यानें झेंप घालताच विवश होऊन त्याच्या चोंचींत सांपडलेला पक्षी साहाय्याची लेशमात्र आशा नसतां जो स्वाभाविक चीत्कार करतो, त्या चीत्कारापासून तों नेपोलियनचें प्रेत सेंट हेलिनामधून पॅरिसला ज्या दिवशीं परत आणलें त्या दिवशीं एक राष्ट्रचें राष्ट्र आपले ध्वज नमवून आपल्या सहस्र वाद्यांतून सहस्र शोकस्वर व बिरहगीतें गात जो दुःखाचा हंबरडा फोडतें झालें त्या हबरड्यापर्यंत, त्या राष्ट्रीय उद्गीतापर्यंत, जितका प्राणिमात्राचा आक्रोश आहे तितका आप-आपल्या दुःखांची प्रसिद्धि करण्यांत चूर झालेला असतो. आक्रोश हा दुःखाचा स्वभावच आहे; तेव्हां या अनंत आकाशांत जे अनेक चीत्कार उसासे टाकून आपआपल्या दुःखांचा भार कमी करीत हिंडत आहेत त्यांत माझ्या दुःखानें प्रसिद्धीचा उसासा कां टाकूं नये ! या अनंत आकाशांत माझ्याहि आक्रोशाला अवकाश असेल ! असें वाटून प्रवृत्ति,

केव्हां केव्हां दुःख एकदांचें ओकून टाकण्यास अगदीं सज्ज होई; पण तोंच परिस्थिति तिचा पाय हिसडून तिला मागें खेंची.''

—( 'माझी जन्मठेप ' प्रस्तावना. )

## अरुणोदयाची गूढरम्यता कायमचीच

निबंधकार म्हणून शिवरामपंत आणि सावरकर यांच्यामधील साम्य-भेद येथें थोड्या विस्तारानें दर्शविला याचें कारण सावरकरच दुसऱ्या कोणाहि निबंधकारापेक्षां शिवरामपंतांच्या अधिक जवळ येतात, त्यांचें गुरुशिष्याचेंहि थोडें नातें आहे, आणि याच संग्रहांतील ' जोसेफ मॅझिनी-आत्मचरित्र आणि राजकारण ' या २६ व्या लेखांत पंतांनीं तरुण व होतकरू सावरकरांचें सप्रेम आणि सानन्द कौतुक केलेलें आहे. प्रत्यक्ष कर्तृत्वाच्या दृष्टीनें सावरकरांच्या विचारसरणीचीं पावलें पंतांच्याहून थोडीं पुढें पडलेलीं असलीं तरी शिवरामपतांच्या प्रथम पावलाचें महत्त्व त्यामुळें कमी होत नाहीं. विष्णुशास्त्र्यांच्या पुढें पंत गेले. पंतांपुढें सावरकर गेले, व सावरकरांच्या पुढें आणखी कोणी गले तरी त्यांत मागीलाना कमी-पणा नसून तो यांचा गौरवच आहे. राष्ट्रीय भावना चेतविण्यापासून तों प्रत्यक्ष राष्ट्रस्वातंत्र्य संपादण्यापर्यंतचा एक दीर्घ प्रवास आहे. यांतील पुढचीं पुढचीं पावलें मुक्कामाच्या जवळ जवळ जात असलीं तरी त्यामुळें ज्यांनीं त्या प्रवासाला आरंभ केला तीं पावलें कमी महत्त्वाचीं ठरत नाहींत. अरुणोदयानंतर सूर्योदय होतो, व सूर्योदयानंतरच्या प्रकाशांत मार्ग स्पष्ट दिसूं लागतात; आणि माध्यान्हापर्यंत मुक्कामासहि पोंचतां येतें. म्हणून अरुणोदयाची प्रेरकता आणि गूढरम्य सौंदर्य कोणी रसिक कमी मानील काय ? शिवरामपंतांचीं ' स्वातंत्र्य-सूक्तें ' अरुणोदयासारखीं सुंदर, गूढरम्य, आणि प्रेरक आहेत; आणि तीं भारतीय भाग्योदयाच्या परममंगल अरुणोदयकालींच गायिलीं आहेत; म्हणून त्यांना कृतज्ञ भारतीयांनीं वंदनच केलें पाहिजे.

## उरलेलें काम

आतां शेवटीं एकच काम उरलें आहे. सदर निबंधांच्या संग्राहकांनीं ज्या विशिष्ट दृष्टीनें येथील निबंधांची निवड केली आहे त्या त्यांच्या वैयक्तिक दृष्टीला सदर निबंध कसे पोषक आहेत हें दाखविणें हें तें काम

आहे. प्रस्तावनालेखक म्हणून हें काम करणें मला आवश्यक असून अभ्यासकांच्या दृष्टीनें तें इष्ट आहे. स्वातंत्र्याचें उत्कट प्रेम आणि पारतंत्र्याची पराकाष्ठेची चीड, या दोन परम पवित्र भावना आहेत. माणूस म्हणून जिवंत राहणाऱ्या कोणत्याहि देशांतील आणि कोणत्याहि काळां-तील देशभक्तांच्या मनःकोशांत त्या सदैव व सहजपणें स्फुरत राहिलेल्या शाश्वत भावना आहेत. त्या भावनांची आळवणी स्वातंत्र्याच्या उषःकालांत पंतांनीं मोठ्या काव्यमय पद्धतीनें या निबंधांत केली आहे; म्हणून त्यांस 'स्वातंत्र्य-सूक्तें' हें यथार्थ नांव संग्राहकांनीं दिलें आहे. तसाच या 'सूक्तां'च्या अक्षराअक्षरात पंतांच्या व्यक्तिमत्त्वाचा मनोहर आविष्कार झाला आहे. तो कसा झाला आहे हें दाखविण्याचा 'शिवरामपंतांची वाङ्मयी मूर्ति' या नांवाच्या माझ्या प्रास्ताविक निवेदनांत मीं यथामति प्रयत्न केला आहे. आतां या निबंधांपैकीं प्रत्येक निबंध किंवा त्यांचा एकेक गट स्वातंत्र्याच्या प्रेमाशीं कसा निगडित झाला आहे हे दाखवितों.

**बाह्यांग भिन्न पण अंतरंग एकच**

या निबंधांचें विषयदृष्ट्या वर्गीकरण केल्यास पहिला 'काळ' हा प्रास्ताविक, व शेवटचा 'भासाची भवितव्यता' हा निबंध वाङ्मयीन आहे. 'ईश्वराची लीला अगाध आहे' (४), 'ईश्वर विभु आणि नित्य आहे (२), 'जसे लोक तसे त्याचे देव' (११), आणि 'धर्मकल्पनांचा परिणाम' (५), हे निबंध ईश्वर व धर्म एतद्विषयक आहेत. निबंध-क्रमांक ९, १२, १३ आणि १७ हे सह्याद्रि पर्वत इतर पर्वत, व मंगळ ग्रह यांसंबंधीं असल्यानें ते निसर्गपर मानता येतील. निबंध-क्रमांक ९ आणि १५ शिवाजीविषयीं, क्रमांक ६ हा सदाशिवरावभाऊ पेशवे यांविषयीं, आणि क. १६ हा इटलीचा देशभक्त मॅझिनी याविषयीं असल्यानें यांस 'ऐतिहासिक' या सदरांत घालतां येईल. 'केशवरावांचे विचार' (३), 'ब्लॅक होल' (१०), व 'अर्जुनाचा वेडेपणा' (१४), हे शिवरामपंतकालीन राजकीय असंतोष व्यक्त करणारे, व इंग्रजांच्या जुलमी, अन्यायी व अधर्म्य राजवटीचें छद्मी वर्णन करणारे निबंध राजकीय या वर्गांत मोडतील; आणि 'स्वयंवर व संकुल युद्ध' (७), हा लेख सामाजिक म्हणावा लागेल. म्हणजे केवळ बाह्य दृष्टीच्या विषयवार वर्गीकरणाप्रमाणें सदर निबंध

१ वाङ्मयीन, २ धर्मविषयक, ३ निसर्गवर्णनपर, ४ ऐतिहासिक, ५ राजकीय आणि ६ सामाजिक आहेत असें दिसेल पण अंतरंग-दृष्ट्या ते सर्वच व्यापक राजकारण-विषयक, किंवा सांस्कृतिक, आणि राजकीय स्वातंत्र्य-प्रेममूलक आहेत असें दिसेल.

**‘ काळ ’ व ‘ भास ’**

‘ काळ ’ हा प्रास्ताविक लेख पंतांच्या स्वातंत्र्ययुद्धाची नांदी आहे. नांदी ही नाट्यार्थसूचक असते तसा हा लेख आहे. म. म. पोतदार म्हणतात त्याप्रमाणें ‘ काळ ’ या शब्दांतच मुळीं एक भव्य ध्वनि आहे. इंग्रजांचें पक्षपाती जें ‘ टाइम्स ’ ( काळ ) पत्र त्याला तोडीला तोड म्हणून लोकांचें पक्षपाती व तितकेंच वजनदार आणि सामर्थ्यशाली माझें ‘ काळ ’ पत्र आहे, हा पंतांच्या मनांतला पहिला ध्वन्यर्थ. ‘ काळ ’ म्हणजेच ‘ यम ’ किंवा ‘ संहारक देवता ’ या अर्थी ‘ काळ ’ पत्र म्हणजे ‘ इंग्रज राज्य-कर्त्यांचा काळच ’ असा दुसराहि ध्वन्यर्थ पंतांच्या खोल मनात नसेल असें कोणीं म्हणावें ? शिवाय ‘ काल ’ नामक तत्त्वाच्या शास्त्रीय विवरणाच्या शेवटीं ‘ हिंदुस्थाननें निराश होऊं नये, काल हा इंग्रजांचें उच्चाटण व भारताचें स्वातंत्र्यसंस्थापनहि करील. एवढेंच नव्हे तर तें त्यानें योजूनहि ठेवलें आहे ’ असा आशादायक ध्वनि पंतानीं उमटवून दिला आहे, हें मागें सांगण्यात आलेंच आहे. आपाततः वरून भासकवीबद्दल वाटणारा पण अन्तर्यामीं स्वतःबद्दलच असणारा ‘ भासाची भवितव्यता ’ हा वाङ्मयीन लेख स्वातंत्र्यसंबद्धच आहे हेंहि मागें सविस्तर दाखविलेंच आहे.

**ईश्वर, धर्म, व धर्मान्तर**

मागें सांगितल्याप्रमाणें पंतांची ईश्वरविषयक दृष्टि नैयायिक, वेदान्ती, किंवा मीमांसक यांच्याप्रमाणें होती. ईश्वराच्या सगुण रूपापेक्षां त्याच्या उत्पत्ति–स्थिति–लय-कारक, कर्मफलप्रद, व स्फुरद्रूप चैतन्यशक्तीकडेच त्यांचा अधिक कल होता. रामकृष्णादींच्या अवतारांकडे व धर्माच्या अभ्युदय–निःश्रेयस कल्पनांकडे ते राजकीय बाबतींत तरी ‘ मानवांच्या पराक्रमाचें एक प्रेरणासाधन ’ याच उपयुक्तता दृष्टीनें ( Pragmatic attitude ) पहात. म्हणूनच बुद्धाचा अहिंसाप्रधान धर्म क्षात्रपराक्रमाची खच्ची करणारा म्हणून त्यास अयोग्य, आणि क्षत्रिय वर्णाला उत्तेजित

करणारा म्हणून वैदिक धर्म त्यांना अधिक ग्राह्य वाटतो. गुलामगिरींतील लोक गुलामी देवाची व स्वतंत्र आणि पराक्रमी लोक स्वतंत्र आणि पराक्रमी देवांची उपासना करतात. हें सिद्ध करण्यासाठीं 'लोक आपल्या कल्पनेप्रमाणें देव निर्माण करतात' (जसे लोक तसे त्यांचे देव) हा सिद्धान्त धार्मिक इतिहासाच्या साक्षीनें पंतांनीं मांडला आहे. 'ईश्वरी लीला अगाध आहे' असें म्हणण्यांत 'माणसानें प्रतिकूल सद्यःस्थितीमुळें खचून जाऊं नये. परमेश्वरी कृपेनें ती स्थिति पालटून अनुकूल परिस्थिति अचानकपणें निर्माण होते' असा पंतांचा अभिप्राय आहे. ईश्वरावर हवाला ठेवून धैर्यानें गुलामगिरी नष्ट करण्याचा प्रयत्न करा. ईश्वर सिद्धि देईल; हा राजकीय आशावाद येथें त्यांनीं ध्वनित केला आहे. पंतांना स्वधर्माबद्दल आदर व परधर्माबद्दल — निदान ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांतील आक्रमक धर्मान्तराबद्दल अनादर होता. म्हणून 'ईश्वर विभु व नित्य आहे' या तत्त्वाच्या कसावर त्यांच्या धर्मकल्पनांना, तार्किक पद्धतीनें घासून त्यांनीं धर्मान्तराचा पायाच उखडून टाकला आहे. विशेषतः वरील दोन धर्मांच्या अनुयायांच्या धर्मान्तरांतील त्यांचा गुप्त राजकीय हेतु ध्यानांत घेतला म्हणजे राजकीय स्वातंत्र्यवादी शिवरामपंत या बाबतींत इतके कडवे कां होते हें ध्यानीं येईल.

### निसर्गांतहि स्वातंत्र्य-साक्षात्कार

पर्वत, नद्या आणि समुद्र यांच्याच प्रदेशांत पंत बालपणीं राहात असल्यामुळें त्यांच्या कविमनाला पर्वतादि नैसर्गिक सृष्टीची विलक्षण मोहिनी पडली होती. पण निसर्गाच्या केवळ बाह्य रंगरूपांनीं वेडें होणें असलें वस्तुनिष्ठ निसर्ग-प्रेम हें गौण होय. तें प्रथम प्रथम प्रत्येकांत असतेंच. पण नैसर्गिक दृश्यांतून आपल्याच अंतरंगांचा साक्षात्कार होणें यालाच परिणत निसर्गप्रेम म्हणतात. वर्ड्स्वर्थला निसर्गात स्थिर-चरसृष्टींत आणि मानवांत समानत्वानें स्फुरत राहणाऱ्या चैतन्याचा साक्षात्कार होई. कालिदासाला निसर्गांत मादक स्त्रीसौंदर्य आढळे, बालकवीला विश्व-सौंदर्य प्रतीत होई, तर शिवरामपंतांना निसर्गदृश्यांत सर्वत्र स्वातंत्र्याच्या प्रेरणा अंकुरित झालेल्या दिसत. 'रमणीय आणि उच्च अशा पर्वतादि स्थलांच्या सान्निध्यानें जेथें मनुष्याचें मन ईश्वराशीं सारूप्य पावून

अद्वितीय स्वतंत्रतेचा अनुभव घेतें तेथें ही ऐहिक स्वतंत्रता प्राप्त होण्याबद्दल अशक्यता ती काय आहे ? ' ( पृ. १२४ ). अशा विचारानें ते निसर्ग, ईश्वर, व स्वातंत्र्य एकत्र निगडित करतात; ते सह्याद्रीला देवानें घडविलेला, स्वतंत्रतेचा पर्वत म्हणतात, आकाशांतील कृत्तिका तारांजवळ स्वातंत्र्य मिळविणाऱ्या वीरांसाठीं कार्तिकेयाला त्यांनीं दिलेल्या दुधाचा उरलेला अंश मागतात. ( पृ. १४२ ) मंगळालाहि स्वतंत्रतेचा तारा मानतात, तर कधीं साऱ्याच ताऱ्यांना, जुलमी राजवटींत गुप्त कटवाले कल्पितात. ( पृ. १३९ ); स्वातंत्र्यसंपादनाची तीव्र इच्छा धारण करणाऱ्या शिवरायाच्या पुण्याहवाचनाच्या वेळीं देवतांनीं दिलेला ' फलसमृद्धिरस्तु ' हा आशीर्वाद ते सह्यादि पर्वताकडून प्रतिध्वनित करतात. ( पृ. ९३ ); पर्वताशीं हितगुज करतांना ते तदात्म होतात व उद्गारतात, ' माझे विचार हे सगळे तुझे विचार. तूं माझे उत्कृष्ट ग्रंथ, आणि माझ्या स्वतंत्रतेच्या कल्पना त्या साऱ्या तुझ्या कल्पना ! ( पृ. १५८ ). तसेंच गुलामगिरीची बेडी पायीं पडलेल्या एका गोव्यातील प्रवाशाला केवळ सह्याद्रीच्या सान्निध्यानें किती सुख झालें, व त्याच्या मनात ' मी आकाशासारखा सर्वव्यापी होईन, वायूसारखा सर्वत्र संचारी होईन, सूर्यासारखा प्रकाशमान् होईन, आणि पृथ्वीसारखा सर्वांना आधारभूत होईन ' असे विचार कसे आले तें ते सांगतात. ( पृ. ७६ ). यावरून त्यांच्या स्वातंत्र्यभक्तीनें भारलेल्या अंतरंगाला निसर्गांतहि तीच स्वतंत्रता दिसत होती यांत नवल नाहीं.

**इतिहास : काल्पनिक आणि खरा**

सदाशिवराव भाऊ यांच्या पराक्रमाची ऐतिहासिक मीमांसा करणारा ( क्र. ६ ), व मॅझिनीच्या तेजस्वी कर्तृत्वाचें विवेचन करणारा ( क्र. १६ ) असे हे दोन लेख दोन ध्वनिगर्भ ऐतिहासिक भाष्यें ( Historical interpretations ) होत. या खऱ्या ऐतिहासिक घटना असून त्याचें फलित मात्र स्वकालीन परतंत्र हिंदुस्थानासाठीं शिवरामपंतांनीं कल्पिलें आहे. मात्र ही गोष्ट शिवाजीविषयक क्र. ९ आणि १५ या लेखांबद्दल आहे असें म्हणतां येत नाहीं. या दोन लेखांत शिवाजीचें नांव वगळल्यास खरें ऐतिहासिक असें कांहीं नाहीं. येथून तेथून सारें कल्पनेचें साम्राज्य. पण

त्या कल्पनासम्राज्ञीच्या भ्रमणालासुद्धां कांहीं शिस्त आहे. ‘ शिवाजीचें पुण्याहवाचन ’ यांतील शिवाजी हा भारतवर्षांतील सनातन आर्यसंस्कृतीचें आणि भारतीय स्वातंत्र्याचें एक मंगल प्रताक आहे, हें मागें सांगितलेंच आहे. या प्रतीकरूप शिवाजीमध्यें शिवरामपंतांना भारतवर्षीय राजकीय परंपराच दिसते. “ब्रह्मदेवानें सोमराजा, वरुण, यम आणि मनु यांना ज्या जलानें अभिषेक केला त्याच जलानें आम्ही तुला अभिषेक करीत आहोंत” असा उद्गार देवतांच्या तोंडीं घालण्यांत आणि राज्याभिषेकाच्या वेळचे तेच मंत्र उद्धृत करण्यांत पंतांचा हाच अभिप्राय व्यक्त होतो. पंतांच्या वेळच्या राजकीय उत्थानाला हाच प्रतीकरूप शिवाजी — ऐतिहासिक शिवाजीपेक्षां — जास्त उपयोगी होता. म्हणून पंतांनीं गागाभट्टाच्या अभिषेकानंतर आपण स्वतः पौरोहित्य स्वीकारून आपल्या प्रतीकरूप शिवाजीचा पुनरपि राज्याभिषेकसमारंभ साजरा केला ! ‘ शिवाजीची एक रात्र ’ हा लेख तर केवळ शिवाजीच्या नांवाचें निमित्त करून स्वातंत्र्यासाठीं तळमळणाऱ्या आपल्या मनाचे उत्तुंग मनोरे उभाविण्यासाठींच पंतांनीं लिहिलेला आहे हें सहज कळण्यासारखें आहे.

## सद्यःस्थितीची तीव्र जाणीव

‘ ब्लॅक होल ’मध्यें आपणच नादान बनून, इंग्रजांपेक्षां आपल्याच हातानें आपली विटंबना कशी करून घेत आहों याचें जळजळीत आत्मपरीक्षण आहे. केशवरावाच्या विचारांत सुशिक्षित तरुणांचा तीव्र असंतोष आहे, तर ‘ अर्जुनाच्या वेडेपणां ’त इंग्रजी राज्यनीतीच्या दांभिकपणावरील बुरखा नाजूक हातांनीं दूर केला आहे. ‘ स्वयंवरां ’त ‘ परस्पर ’ सुधारकांची काव्यमय निर्भर्त्सना आहे. याप्रमाणें आपलें प्रेम व द्वेष याचा आविष्कार करून पंतानीं स्वातंत्र्यकल्पनेचा एकसंध परिपोष सर्व बाजूंनीं आणि सर्व साधनांनीं केला आहे. शिवरामपंतांच्या काळचे प्रश्न आज नाहींत. त्यामुळें त्यांच्या लेखांचें सर्व स्वारस्य आजच्या वाचकांना तितक्या प्रमाणात प्रतीत होणार नाहीं हें खरें आहे. तथापि, स्वातंत्र्याची भावना व ती व्यक्त करणारी प्रतिभा हीं शाश्वत आहेत. पंतांनीं ज्या स्वातंत्र्यभावनेचा स्वराज्य मिळविण्याकडे विनियोग केला तिचाच विनियोग पंतांच्या आजच्या अभ्यासकांना तें टिकविण्याकडे करतां येण्यासारखा

नाहीं काय ? आणि ज्या थोर प्रतिभेनें परकीय राज्याचा विध्वंस करण्याचा चंग बांधला त्या प्रतिभेला स्वराज्यांतील विधायक कार्य करणें अशक्य नाहीं. या गोष्टी ध्यानांत ठेवूनच हे निबंध सध्याच्या तरुण पिढीनें अभ्यासावे अशी त्यांना प्रार्थना करून हें निवेदन पुरें करतों.

माझे शिष्य-मित्र आणि या निबंधांचे संग्राहक व प्रकाशक श्री. अनंत-राव कुलकर्णी यांनीं माझ्यामागें लकडा लावून शिवरामपंतांच्या या ' स्वातंत्र्य-सूक्तां 'चें भाष्य मजकडून करून घेतलें, व मला पंतांच्या तेजस्वी वाङ्मयांत पुनः पुन्हा आणि खोल निमज्जन करण्याची संधि दिली, याबद्दल त्यांचे आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे.

बुधवार, कार्तिकी एकादशी, शके १८७४
योगकुंज, चिमणबाग, पुणें २ — के. ना. वाटवे
२९-१०-५२

# १. काळ

( काळ : अग्रलेख : ता. २५-३-१८९८ )

**सा रम्या नगरी महान्स नृपतिः सामन्तचक्रं च तत् ।**
**पार्श्वे तस्य च सा विदग्धपरिषत्ताश्चंद्रबिम्बाननाः ॥**
**उन्मत्तः स च राजपुत्रनिवहस्ते बन्दिनस्ताः कथाः ।**
**सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥ १ ॥**

एखादें कार्य झालेलें असतें, होणार असतें, किंवा होत असतें. झालेलें असतें तें पूर्वीं, होणार असतें तें मग, आणि होत असतें तें हल्लीं. ह्यापैकीं कार्य होत असतें त्यांतील कांहीं भाग झालेला असतो व कांहीं भाग होणार असतो. उदाहरणार्थ, एखाद्या पुस्तकाचीं कांहीं पानें छापून तयार झालेलीं असतात व काहीं छापून तयार व्हावयाचीं असतात. अशा स्थितीत जें पुस्तक असतें तें ‘ छापून होत आहे ’ असें म्हणण्याचा परिपाठ आहे. परंतु जें कार्य पूर्ण होण्याला अवश्य लागणाऱ्या गोष्टींपैकीं अगदीं शेवटची गोष्ट-देखील घडून गेलेली असते, तें कार्य झालेलें आहे; आणि जें कार्य पूर्ण होण्याला अवश्य [illegible] गोष्टींपैकीं अगदीं प्रथमच्या गोष्टी[illegible]देखील सुरुवात झालेली नसते, तें कार्य होणार आहे, असें म्हणण्याचा परिपाठ आहे. ह्याच विस्तृत रीतीनें स्पष्ट करून सांगितलेल्या वरील कल्पना भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तीन शब्दांनीं आपण नेहमीं व्यक्त करून दाखवीत असतों. पण जितके अशा रीतीनें आपल्या कल्पना व्यक्त करतात तितक्या सर्वांनाच त्यांचा अर्थ काय, त्या कशा अस्तित्वांत आल्या, त्या कोणत्या मुख्य मूळ कल्पनेवर अवलंबून आहेत, इत्यादि प्रश्नांची माहिती असते असें नाहीं. धूर पाहिला म्हणजे तेथें आग आहे हें पुष्कळांना समजतें; पण ह्यावरून त्यांनीं [illegible]शास्त्रांतील प्रमेयांचें अध्ययन केलेलें असतें असें नाहीं. त्यांतलाच वरील प्रकार आहे. पण ह्या गोष्टी थोड्यांना माहीत असतात, म्हणून त्यांचा त्या मानानें जास्तीच ऊहापोह झाला पाहिजे. पूर्वीं, पुढें, हल्लीं इत्यादि व्यवहार जे आपण नेहमीं करतों त्या सर्वांना

आधारभूत जी कल्पना तिलाच आपण ' काळ ' असें म्हणतों. काळ हा पदार्थ डोळ्यानें दिसण्यासारखा नाहीं, किंवा स्पर्शानें जाणतां येण्यासारखा नाहीं. तरी पण तो डोळ्याला दिसत नाहीं किंवा हाताला लागत नाहीं,–म्हणून त्याचें अस्तित्वच नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण ज्ञानाचीं द्वारें अनेक आहेत. जें प्रत्यक्ष दिसत नाहीं तें कदाचित् अनुमानानें सिद्ध होत असतें; आणि प्रस्तुत विषयाची स्थिति अशीच आहे. काल, आज, उद्यां, पूर्वीं, हल्लीं, पुढें इत्यादि व्यवहार काळ म्हणून कांहीं पदार्थ नसता तर आपणाला करतांच आला नसता. आंब्याचें झाड नसलें तर त्याजवरील फळ खायला मिळणें जसें अशक्य, तसेंच काळ हा पदार्थ अस्तित्वांत नसता तर पूर्वींचा काळ, हल्लींचा काळ, पुढचा काळ असले प्रयोग जे आपण पावलोपावलीं करतों ते करतां आले नसते. पण ज्या अर्थीं ते करतां येतात, त्या अर्थीं काळाचें अस्तित्व कबूल करणें भाग आहे. ह्या काळाला आदि आणि अन्त हे मुळींच नाहींत. ज्याप्रमाणें सूर्य पूर्वेकडील क्षितिजावर आल्यापासून पश्चिमेकडील क्षितिजाच्या खालीं जाईपर्यंतच काय तो आपल्याला दिसतो. त्याच्या आधींच्या आणि नंतरच्या स्थितीबद्दल आपल्याला कांहींच कळत नाहीं, त्याप्रमाणें काळाचादेखील कांहीं भाग मात्र जाणतां येतो; आणि त्याच्या आधींचा भाग आणि नंतरचा भाग ह्याविषयीं मनुष्याचें पूर्ण अज्ञान असतें. पृथ्वीच्या पृष्ठभागावर उभ्या राहिलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें आपल्या पायांखालील जमिनीच्या पोटांत काय आहे आणि आपल्या डोक्यावरील आकाशाच्या पोकळींत काय आहे हें समजत नाहीं, त्याप्रमाणेंच काळाच्या आद्य आणि अन्त्य स्थितीचा विचार करूं लागलें म्हणजे मनाची अवस्था होऊन जाते. होकायंत्र बिघडून जाऊन वादळांत सांपडलेलें गलबत, चोहोंकडून धुक्यानें वेढून गेल्यामुळें वाट चुकलेला वाटसरू, आणि काळाच्या आनंत्याचें मोजमाप काढणारा तत्त्ववेत्ता – ह्यांना फार झालें तर आपल्यापुढली चार हात जागा एवढेंच काय तें दिसत असतें. इतिहासाच्या साधनानें काळाच्या उगमाकडे आणि ज्योतिःशास्त्राच्या साधनानें काळाच्या मुखाकडे जाण्याविषयीं मनुष्याचे सतत प्रयत्न चालले आहेत, पण त्यांना कितीसें यश आलें आहे? उपलब्ध साधनांपैकीं अतिशय प्राचीन असे जे वेद त्यांच्या कालमानाविषयींच्या

वादाच्या भानगडींत न पडतां स्थूल मानानें वेद सहा हजार वर्षांचे जुने आहेत असें कांहींच्या मताप्रमाणें घटकाभर मानलें – तरी काय ? सहा हजार वर्षांपासूनच काळाला सुरुवात झाली असें त्यावरून कोणाला म्हणतां येणार आहे ? किंवा आजपासून पुढें सहा हजार वर्षांनीं ग्रहांची स्थिति अमुक अमुक होईल, त्यांचीं अमुक अमुक फळें येतील, हें जरी कळलें तरी काय ! त्या मुदतीच्या पुढें काळाची गति खुंटणार असें कोणा ज्योतिष्याला सांगतां येणार आहे ? सारांश, परमेश्वराप्रमाणेंच काळ हा आद्यंतरहित आहे, आणि आदि व अन्त ह्यांनीं विरहित हा काळ असल्यामुळें परंपरेनें ह्याच्याहि अंगांत पुष्कळ विलक्षण शक्तींचा समावेश झालेला आहे. परमेश्वर हें सगळ्यांचें मुख्य कारण आहे, आणि काळ उपाधीभूत आहे. काळ हा जसा अनादि आणि अनंत आहे तसाच तो सर्व ठिकाणीं आणि सर्व वेळीं असतो. म्हणून जगांत आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या त्या सर्व काळानें पाहिल्या आहेत, व ह्यापुढें ज्या ज्या गोष्टी घडून येणार असतील त्याहि सर्व काळाला पाहावयाला सापडतील. अशा प्रकारचें काळाचें भव्य, उदात्त, गंभीर आणि अतर्क्य स्वरूप लक्षांत आणलें म्हणजे कांहीं कांहीं तत्त्ववेत्ते काळ हें निराळें द्रव्य न मानता त्याचें परमेश्वराशीं तादात्म्य मानितात तें किती यथार्थ आहे, हें चांगलें लक्षांत येईल. आणि त्याच तत्त्वाला अनुसरून थोड्याशा लाक्षणिक रीतीनें बोलावयाचें म्हटलें, तर आजपर्यंतच्या सर्व अनंत गोष्टी काळानें केलेल्या आणि पाहिलेल्या आहेत असें म्हणण्याला हरकत नाहीं. मध्य आफ्रिकेंत आणि र [illegible] हत्तींच्या अंगाएवढाल्या समुद्राच्या लाटा उसळतांना आणि त्यावरून हत्तीच्यापेक्षां दसपटीनें मोठीं अशीं गलबतें फिरतांना यानें पाहिलीं असलीं पाहिजेत. हिमालय पर्वताच्या जागीं डोळे फिरून जातील इतके खोल खळगे आणि अटलांटिक महासागराच्या जागीं मेघमंडळांत घुसणारीं पर्वतशिखरें कदाचित् यानें पाहिलीं असतील. ईजिप्त देशांतील उंच उंच मनोरे बांधलेले आणि जमीनदोस्त झालेले यानें पाहिले आहेत. बॅबिलोनच्या कळसाचें काम चाललें असतां दररोज वाढत वाढत तो अगदीं स्वर्गलोकाजवळ जाऊन ठेपलेला यानें पाहिला आहे, व त्याच्या पूर्वींचे सारे लोक एक भाषा बोलत होते ती यानें ऐकिली आहे. निनेव्ही, कैरो, सिरिया, पॅलेस्टाइन इत्यादि शहरांचा आणि

देशांचा उत्कर्ष आणि अपकर्ष दोन्ही यानें पाहिलेले आहेत. रोमचें राज्य उभारलेलें आणि मोडलेलें दोन्ही यानें पाहिलीं आहेत. यानें घोड्यांना आणि पर्वतांना पंख असलेले पाहिले आहेत. यानें समुद्राचें गोडें पाणी प्राशन केलें आहे. अर्जुनाच्या एका बाणापासून हजारों बाण उत्पन्न होत, आणि रावणाला दहा तोंडें होतीं – ह्या सर्व गोष्टी याला थोतांड वाटत नाहींत. ह्यानें ऋषींना ऋग्वेदांतील सूक्तें रचीत बसलेले असतांना पाहिलें आहे. यानें विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या भांडणाला काय काय कारणें झालीं तीं लक्षांत ठेवलीं आहेत. यानें आजपर्यंत कैक राजांचीं राज्यें, गर्विष्ठांचा गर्व, धनाढ्यांचें धन, बलाढ्यांचें बल, आणि मस्तवालांची मस्ती हीं लयाला गेलेलीं पाहिलीं आहेत, आणि यापुढें पाहील. एजिस्, टार्क्विनस्, नीरो यांनीं गरीबांवर पुष्कळ जुलूम केला. पण अखेरीस याच्यापुढें त्यांचा जुलूम चालेनासा झाला. अलेक्झँडर आणि ज्युलिअस सीझर यांनीं आपल्या सैन्यानें साऱ्या शत्रूंना जेरीस आणलें. पण जेव्हां याच्याशीं लढाई करण्याचा प्रसंग आला तेव्हां तेच उलटे जेरीस आले. सालोमन आणि मार्कस् ऑरेलिअस हे राजे मोठे शहाणे होऊन गेले, पण ह्याच्यापुढें त्यांचें शहाणपण चालेना. गरीब लोक जुलमानें गाजून, भुकेनें व्याकुळ होऊन, उन्हानें करपून, किंवा थंडीनें गारठून गुडघ्यांत डोकें घालून डोळ्यांतून टिपें ढाळीत बसत,–तेव्हा खऱ्या मित्राप्रमाणें चार युक्तीच्या गोष्टी सांगून हाच त्यांच्या मनाला धीर देत असे. लढाईत पराभव पावून शत्रूच्या हातीं सांपडलेल्या जिवंत राजांकडून रोमन बादशहा रोम शहरांतून आपले विजयरथ ओढवीत असत,–त्या वेळीं त्या गुलाम राजांना किंवा राजकीय गुलामांना शत्रूचें वैभव आणि आपली विपत्ति सहन करण्याचें सामर्थ्य खऱ्या शूराप्रमाणें हाच त्यांच्या डोळ्यांपुढें येऊन देत असे. ल्युक्रेशिआवर टार्क्विनसनें जुलूम केला, रावणानें सीतेला चोरून नेलें, आणि दुःशासनानें द्रौपदीला भर सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न केला, त्या वेळीं ब्रूटसच्या, रामाच्या आणि भीमाच्याहि आधीं मोठ्यानें गर्जना करून 'सूड ! सूड !' हे शब्द हाच ओरडला. दैत्यांनीं रसातळाला पोंचविलेल्या वेदांचा प्रचार यानेंच फिरून सुरू केला. हिरण्यकशिपूचें पोट यानेंच फोडिलें. बळीचें डोकें यानेंच ठेचलें, आणि रावणाचे गळेहि यानेंच कापले.

जेव्हां जगात अनाचार अतिशय वाढला तेव्हां लोकानुग्रहासाठीं शुक्राचार्य, नारदमुनि, सॉक्रेतीस, गौतमबुद्ध, जीजस ख्राइस्ट इत्यादि महात्म्यांना यानेंच लोकांपुढें आणून ठेविलें. असे मोटमोठे उपकार यानेंच जगावर केले आहेत, व पुढेंहि याचे हातून होतील. वास्तविक पाहतां उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या तिन्हीला हाच कारणीभूत आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां ब्रह्मा, विष्णु आणि शिव ह्या तिन्ही देवतांचा हा एकवटलेला अवतार आहे. वास्तविक हा त्रिमूर्तिमय असून कधीं कधीं फक्त शिवाची आणि त्याची एकरूपता आहे असें वर्णन करण्यात येतें. पण हें भ्रममूलक आहे दूरदर्शी राजकारणी पुरुषा-प्रमाणें यानें पुढें काय काय गोष्टी करावयाच्या तेंसुद्धां सर्व ठरवून टाकलें आहे. कोणतें निरुपयोगी म्हणून पाडून टाकायचें आणि कोणतें नवीन बांधावयाचें, कोणत्या भरभराट सपलेल्या शहराची जागा रानें लावण्यासाठीं मोकळी करून द्यावयाची आणि कोणत्या रानांतील जागा साफ करवून नवीन शहरें वसवावयाचीं, कोणत्या राजाना तक्तावरून खालीं [illegible] आणि कोणाला नेऊन तेथें वसवावयाचें, कोणत्या लोकांच्या गळ्यांत विजयश्री-कडून माळा घालावयाच्या आणि कोणाच्या पायांत गुलामगिरीच्या बेड्या अडकवावयाच्या, हें सर्व यानें कायम करून ठेविलें आहे. आणखी हजारों वर्षांनंतरच्याहि पृथ्वीच्या पृष्ठभागावरील राष्ट्राचा नकाशा यानें कुशल चितार्‍याप्रमाणें सर्व रंगवून तयार केला आहे. हिरवा, पिवळा, तांबडा, निळा, पांढरा हे निरनिराळे रंग कोठे कोठें कसे भरायचे याचा यानें कधींच निकाल लावून टाकिलेला आहे. अशा प्रकारची व्यापक कल्पना काळ हा शब्द उच्चारला म्हणजे मनांत येते,—आणि हाच काळ शब्दाचा मूळचा अर्थ. पण शब्दाच्या अर्थाची मर्यादा प्रसंगविशेषीं कमी किंवा जास्ती होत असते. इंग्रजींत ‘ टाइम्स ’ हा शब्द कांही विवक्षित पत्राचें नांव म्हणून उपयोगात आणलेला आढळतो. मूळचा ‘ काळ ’ आणि ‘ टाइम्स ’ या दोन्ही शब्दांचा अर्थ जवळ जवळ एकच आहे. परंतु ‘ टाइम्स ’ या शब्दाच्या अर्थविस्ताराला मर्यादित करून ज्याप्रमाणें वर्तमानपत्राच्या नांवासाठीं त्याचा उपयोग इंग्रजींत केलेला आहे, त्याचप्रमाणें ‘ काळ ’ या शब्दाचा अर्थ संकुचित करून वर्तमानपत्राच्या नांवासाठीं त्याचा मराठींत उपयोग करण्यास कांहीं हरकत आहे असें नाहीं.

● ● ●

# २. ईश्वर विभु आणि नित्य आहे

( काळ : ता. ११-४-१८९९ )

हें जें वाक्य आम्हीं वर दिलें आहे ह्यांतील तत्त्व सर्व लोकांना मान्य आहे. एवढेंच वाक्य कोणापुढें ठेवलें तर तो याला हरकत घेणार नाहीं. सर्व धर्मांना हें तत्त्व संमत आहे. इतकेंच नव्हे तर सर्व धर्मांची इमारत याच तत्त्वाच्या पायावर उभारलेली असते. महंमदी धर्म घ्या, खिस्ती धर्म घ्या, बौद्ध धर्म घ्या, हिंदु धर्म घ्या, किंवा दुसरा कोणताहि धर्म घ्या, त्यामध्यें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें ह्या मताचा अंगीकार केलेला आपल्याला कोठें ना कोठें तरी आढळून येतोच. आपण एका घरांत बसलेलों असलों, तर त्याच वेळीं आपल्याला दुसऱ्या घरांत असतां येणार नाहीं. आपण एका वेळीं एका गांवांत असूं, एका शहरांत असूं, एका देशांत असूं, पण ईश्वराला एकाच वेळीं सर्व गांवात, सर्व शहरांत व सर्व देशांत असतां येतें. जरी ईश्वराचें नांव कोणत्याहि ठिकाणच्या खाने-सुमारीच्या यादींत दाखल झालेलें नसलें तरी खानेसुमारीच्या रात्रीं तो त्या ठिकाणीं राहात नव्हता असें एकहि ठिकाण कोणाला दाखवितां येणार नाहीं. हीं शास्त्रीय आणि गहन तत्त्वें लोकांच्या मनात भरवून देण्या-सारख्या आपल्या पुराणामध्यें एक-दोन गोष्टी फारच उत्तम आहेत. कृष्णाच्या सोळा सहस्र स्त्रिया होत्या. त्यांच्यापैकीं जिच्या जिच्या घरीं नारद जाई तिच्या तिच्या घरीं त्याला कृष्ण परमात्म्याची मूर्ति दृष्टीस पडे. या लौकिक गोष्टीवरून ईश्वराचें सर्वव्यापकत्व चांगलें व्यक्त होतें. ह्याच मुद्द्यासंबधींची दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे प्रह्लादाची होय. तूं नेहमीं 'नारायण नारायण' म्हणून म्हणत असतोस, तर तुझा नारायण आहे कोठें? असा प्रह्लादाच्या बापानें जेव्हां प्रश्न विचारला तेव्हां अप्रत्यक्ष रीतीनें ईश्वराचें विभुत्व तो कबूल करीत नव्हता असाच त्याच्या प्रश्नाचा अर्थ होय. प्रह्लादानें उत्तर दिलें कीं, तो नारायण जळीं, तळीं, काष्ठीं, पाषाणीं, सर्व ठिकाणीं भरलेला आहे. परंतु ह्या त्याच्या नुसत्या शाब्दिक उत्तरानें त्याचें समाधान होईना. 'चक्षुर्वैसत्यम्' ह्या मताचा तो होता. अंधपरंपरेनें जाऊन खड्ड्यांत पडणारा तो नव्हता. ऑक्सिजन आणि हायड्रोजन

यांच्या मिश्रणापासून पाणी उत्पन्न होतें याचा जसा एक्स्पेरिमेंट करून दाखविला जातो तसा ह्या विभुत्वाच्या तत्त्वाचा त्याला प्रत्यक्ष एक्स्पेरिमेंट दिसावयाला पाहिजे होता. म्हणून त्यानें विचारलें, ' जळीं, तळीं, काष्ठीं, पाषाणीं,—नारायण आहे म्हणतोस; तर तो माझ्या समोरच्या लांकडाच्या खांबांत आहे काय ? ' त्यावर प्रह्लाद म्हणाला, ' होय. जो सर्वत्र आहे तो ह्या खांबांतहि असला पाहिजे.' पण त्याचा बाप पडला प्रत्यक्षवादी. त्याच्या मनाची खात्री कीं, या लांकडाच्या ओंडक्यांत नारायणाला बसावयाला किंवा उभें रहावयाला जागा कोठून असणार ? माझ्यासारख्याच्या घराला वाळवीनें पोखरलेला पोकळ ढोलीचा खांब कसा असेल ? शिवाय त्यानें खांबाच्या सभोंवार फिरून अगदीं बारकाईनें तो खांब तपासला, तेव्हां त्या खांबाला कोठें चीर, भोंक – कांहींसुद्धां त्याला दिसलें नाहीं. मग त्यानें तर्क केला कीं, तर मग ह्यांत नारायण शिरला असेल कोठून ? त्याला आंत शिरण्याला वाट कोठें आहे ? शिवाय माझ्या राजवाड्यांत इतके चौकी पहारे असतांना नारायण आंत आला असेल कसा, आणि ह्या खांबांत शिरला असेल कोठून ? तर्कशास्त्राच्या नियमांप्रमाणें नारायण तेथें असूं शकणार नाहीं असें सिद्ध झालें, व त्या तर्कशास्त्राच्या जोरावर त्यानें त्या खांबावर लाथ मारली. पण तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, आपलें तर्कशास्त्र चुकलेलें आहे. तर्कशास्त्रानें आपल्याला आयत्या वेळीं दगा दिला ! मीं या तर्कशास्त्रावर किंवा प्रत्यक्षवादावर भरंवसा न ठेवतां जरा आजूबाजूला काय आहे हें पाहिलें असतें तर बरें झालें असतें. सर्व शास्त्राची नजर चुकवून हा नारायण येथें केव्हां दडून बसला होता कोण जाणे ! पण या विचाराचा तेव्हां काय उपयोग ? मी विभु आहें, असें नारायणानें एक्स्पेरिमेंटनें सिद्ध करून दिलें. मग काय उरलें ? सारांश, परमेश्वर विश्वव्यापक, विभु आहे, ही गोष्ट सर्वांनीं मान्य केली पाहिजे, व ती करतातहि. आतां ईश्वर जसा विभु आहे, तसाच तो नित्यहि आहे. तो सतराव्या शतकांत होता, एकोणिसाव्यांत नाहीं, वीस-एकविसाव्या शतकांत तर त्याचें नांवसुद्धां कोणाला माहीत असणार नाहीं असें कधींहि म्हणतां यावयाचें नाहीं. तो सर्व शतकांत आहेच. तो काल होता, आज आहे, व उद्यां असणार याबद्दल बिलकुल शंका नाहीं.

आतां ईश्वराचें विभुत्व आणि नित्यत्व या दोन गोष्टी सर्व धर्मांना संमत आहेत म्हणून वर सांगितलें आहे; परंतु कित्येक धर्मांतील दुसरीं कांहीं तत्त्वें अशीं आहेत कीं, त्या तत्त्वांची विभुत्व आणि नित्यत्व ह्या दोन तत्त्वांशीं एकवाक्यता होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ, आपण ख्रिस्ती धर्म घेऊं. या धर्मांत असें तत्त्व आहे कीं, आपल्या धर्माचा प्रसार करावा; व या तत्त्वाप्रमाणें वागतांना मुमुक्षु जनांना असा उपदेश करतात कीं, 'बाबांनो, तुम्ही आमच्या धर्मांत याल तर तराल, नाहीं तर बुडाल.' 'पोटासाठीं केलें ढोंग, तेथें कैचा पांडुरंग ॥' याप्रमाणें एक आण्याला एक लेक्चर, या दराप्रमाणें सांठा सांपडला कीं झोडलें लेक्चर! या रीतीनें उपदेश करणाऱ्या प्रचाऱ्यांना धर्म, धर्मांतील तत्त्वें, आणि एका तत्त्वाचा दुसऱ्याशीं विरोध – या गोष्टी काय माहीत असणार? पण त्यांच्यापेक्षां अधिक योग्यतेचे म्हणून जे कोणी ख्रिस्ती धर्माभिमानी असतील त्यांच्या लक्षांत ही चूक यावयाला पाहिजे होती. हे उपदेशक देवाविषयीं अशी कल्पना धरून चालतात कीं, देव हा कोठें तरी एका खोलींत खुर्चीवर बसलेला आहे, आणि ती खोली कोठें आहे हें आम्हांलाच काय तें माहीत आहे. त्या खोलींत जाण्याची वाट जणूं काय एकच आहे,–आणि ती वाट बातिस्मा घेणें ही होय. पण परमेश्वर जर विश्वव्यापक आहे तर मग त्याचे-कडे जाण्यासाठीं तुमच्याच वाटेनें कशाला गेलें पाहिजे? ज्या वाटेनें जावें त्या वाटेच्या शेवटीं परमेश्वर आहेच, असें असून 'आमच्याकडे आलास तर दूधभात खाशील, तिकडे गेलास तर विहिरींत पडशील', अशांसारख्या पोरकट वल्गना धर्माच्या बाबतींत ऐकूं याव्या, याच्यासारखी लज्जास्पद गोष्ट दुसरी कोणतीहि नाहीं. हिंदु धर्मांत धर्मान्तराचें तत्त्व नाहीं; याचें कारण तरी हेंच आहे कीं, परमेश्वर सर्वव्यापक आहे, तेव्हां त्याला कोठूनहि हांक मारली तरी ऐकूं जाईल. त्याला अमक्याच धर्माच्या गोटांतून हांक मारली पाहिजे असें असण्याचें मुळींच कारण नाहीं. तेव्हां कोणी मनुष्य कोणत्याहि धर्माच्या एका गोटात असेना, त्यानें भक्तिपुरःसर देवाला हांक मारली कीं देव त्याच्यासाठीं धांवत येतो; अशी हिंदु धर्मसंस्थापकांची पूर्ण खात्री असल्यामुळें आपल्या धर्माची स्तुति आणि दुसऱ्याची निंदा हीं नीच कामें त्यांनीं कधीं केलीं नाहींत,

व आपल्या धर्माच्या प्रौढीसाठीं आपल्या परमेश्वराच्या विभुत्वाला त्यांनीं कधीं कमीपणा आणला नाहीं. पण इतर धर्मांची स्थिति कशी आहे ती पाहा. बाजारांत भाजी घ्यावयाला आपण गेलों म्हणजे तेथें असें होत असतें कीं, एक एकीकडे ओढतो तर दुसरा दुसरीकडे ओढतो. एक भाजीवाला दुसऱ्यास शिव्या देत असतो; त्याच्या मालाला शिळा, कुजका-नासका वगैरे अनेक नांवें ठेवीत असतो; व आपल्या मालाची तारीफ करीत असतो. आणि दुसरा भाजीवाला त्याला उलट शिवीगाळ करून ओरडत असतो. एखाद्या ठिकाणीं परस्पर विरुद्ध अशा धर्मांचे उपदेशक आत्मस्तुति व परनिंदा हीं धार्मिक कृत्यें करीत असतांना पाहिलें म्हणजे वरील भाजीच्या बाजाराची कोणाला आठवण होणार नाहीं? किंवा अलीकडे आपल्याला लोकल सेल्फ गव्हर्नमेंटचा हक्क मिळाल्यापासून मोठमोठ्या शहरांतील इलेक्शनें आपण पाहिलीं आहेत. त्यांत कोणी मतदार आला की प्रत्येक उमेदवार त्याला ओढण्यासाठीं अतिशय खटपट करीत असतो. त्याप्रमाणें या धर्मान्तराचा उपदेश करणाऱ्यांची स्थिति आहे. ज्याच्या देवाला अधिक मतें मिळतील तो देव चांगला, व बाकीचे देव नापास, असें यांचें मत आहे कीं काय न कळे! आपला मोठेपणा बाटणाऱ्या लोकांच्या मतानें मोजला जाईल व आपलें वर्चस्व बाटग्या लोकांच्या मर्जीवर अवलंबून राहील, ही कल्पना देवानें मनुष्य उत्पन्न केला तेव्हां त्याच्या डोक्यांत आली असेल काय? ख्रिस्ती, मुसलमान, बौद्ध किंवा दुसरे जे कोणी धर्मान्तराचे अभिमानी असतील, त्यांनीं आपल्या कृतीनें आपण कोणत्या पेंचांत पडत आहोंत याचा विचार केला पाहिजे. एक धर्मान्तराचें वेड सोडलें पाहिजे, किंवा आमचा आपला ईश्वर अविभु, अव्यापक आहे, असें तरी म्हणायला तयार झालें पाहिजे. पण ईश्वराची व्यापकता संकुचित आणि मर्यादित करण्यापेक्षां धर्मान्तराचें वेड सोडून दिलें तर काय वाईट? पण इतका सुविचार आणावयाचा कोठून? परंतु त्या त्या धर्मांच्या पूर्वींच्या आणि हल्लींच्या प्रवर्तकांना इतका विचार नाहीं असेंहि मानतां येत नाहीं. तेव्हां यांत कांहीं तरी ऐहिक हेतु असावा हें उघड दिसतें. ख्रिस्ती धर्म वगैरे नवीन असल्यामुळें त्यांत धर्मान्तराचें तत्त्व असणें अगदी उघड आहे. कारण दुसऱ्या धर्मांतील

लोक आपल्या धर्मांत ओढण्याचें तत्त्व यांनीं स्वीकारलें नसतें व हिंदु धर्माप्रमाणें ते तटस्थ राहिले असते, तर नवीन धर्मांत कोण गेले असते? नवीन दुकान काढलें म्हणजे गिऱ्हाइकांनीं आपल्याकडे यावें अशी खटपट त्या नवीन दुकानाबरोबर सुरू करावीच लागते. जुन्या स्थाईक दुकानदाराची गोष्ट तशी नसते. तो म्हणतो, माझ्या सचोटीबद्दल जर गिऱ्हाइकाची खात्री असेल तर तो इकडे येईल. तो कोठें का जाईना. त्याला पाहिजे तो माल मिळाला म्हणजे झालें. परंतु नवीन संस्थांत असला स्थिरपणा आणि उदासीनपणा कधींहि असावयाचा नाहीं. असा उदासीनपणा धरला असता तर ख्रिस्ती धर्मांत एकटा ख्रिस्तच आणि महंमदी धर्मांत एकटा महंमदच होऊन राहिला असता. १९०० वर्षांपूर्वी ख्रिस्तानुयायी कोण होता? आणि १३०० वर्षांपूर्वी महंमदानुयायी कोण होता? व हल्लीं जे इतके प्रत्येकाचे अनुयायी दिसत आहेत ते निःपक्षपाती उदासीनपणा धरून कसे जमले असते? सारांश, नवीन धर्मांना मतान्तर, धर्मान्तर वगैरेची जोड आणि साथ पाहिजेच असते; व तशी ती हिंदु धर्माला नाहीं, हें त्याच्या पुरातनत्वाचें आणि अनादिसिद्धत्वाचें लक्षण आहे सारांश, ह्या नवीन धर्मांतून विशेष आग्रह, धर्मान्तराची विशेष हांव, व ऐहिक दृष्टीकडे विचारांचा विशेष कल, हें फार दिसून येतें. ह्या धर्मांची भिस्त निःपक्षपाती औदासीन्यावर नसून, असमत किंवा संमत – कशा तरी धर्मान्तरावर आहे असें दिसतें, हा त्यांच्यांतील एक मोठा दोष आहे. असो. धर्मान्तर करविण्याला ज्या ज्या धर्मांत प्राधान्य आहे त्या त्या धर्मांवर बारीकसारीक आतां दाखविलेले आक्षेप येतातच; पण मुख्य आक्षेप हा कीं, आम्ही दाखवूं त्या वाटेनें गेल्याशिवाय तुम्हाला देव भेटावयाचा नाहीं, असें म्हणणें म्हणजे परमेश्वराच्या विभुत्वाचा निषेध करण्यासारखें आहे. तेव्हां धर्मान्तर करविण्याचा कारखाना बंद ठेवा, नाहीं तर देव विश्वव्यापक नाहीं असें तरी कबूल करा, अशा प्रकारच्या अडचणींत हे लोक येऊन पडतात. आतां ते कदाचित् असें म्हणतील कीं, आमचा देव अव्यापकच आहे. असें जर त्यांनीं म्हटलें, तर मग तो लोकांना तारतो कसा? एका भक्ताला तारण्याच्या कामांत तो मुंबईला गुंतला असतां इतक्यांत दुसरा

भक्त यॉर्क टाउनमध्ये मरण पावला तर त्याला हा तारणार कसा? एकच पोहणारा हिंदी महासागरांत बुडत असलेल्या मनुष्याला बाहेर काढीत असतां, अटलांटिक महासागरांतल्या माणसाला कसा बाहेर काढूं शकेल? तेव्हां असें म्हणणें असमंजसपणाचें होणार आहे. याकरितां देव विभु आहे हें नाकारतां येणार नाहीं, व तें नाकारतां येत नाहीं; तर मग धर्मान्तर करण्याचें काम आपल्या स्वीकृत मताला बाधक आहे असें कबूल केल्या-वांचून दुसरा मार्ग नाहीं. असो. येथपर्यंत ईश्वराच्या विभुत्वाच्या दृष्टीनें धर्मान्तराचा उपदेश अप्रशस्त आहे हें दाखविलें. पुढील लेखांत ईश्वराच्या नित्यत्वाच्या दृष्टीनें तसला उपदेश अप्रयोजक व गळ्यांत धोंगडें आणणारा आहे, हें आम्ही सिद्ध करून दाखवू.

## ईश्वर विभु आणि नित्य आहे ( २ )

मागील लेखात ईश्वराच्या विभुत्वाविषयीं विचार झाला, व विभुत्वाच्या दृष्टीनें पाहिलें असतां ख्रिस्ती वगैरे धर्मांवर जे दोष उत्पन्न होतात त्यांचें दिग्दर्शन करण्यांत आलें. आतां या लेखांत ईश्वराचें नित्यत्व आणि त्याच्या योगानें इतर धर्मांवर येणारे दोष यांचें विवेचन करावयाचें आहे.

ईश्वर नित्य आहे, ही गोष्ट सर्वांना कबूल आहे. पण ख्रिस्ती, मुसलमान, वगैरे लोकांचें आचरण पाहिलें तर ईश्वराच्या नित्यत्वाची कल्पना ते अगदीं विसरून गेले असले पाहिजेत असें वाटतें. हे लोक फसवून किंवा बळजबरीनें दुसऱ्यांना बाटवून आपल्या धर्मांत ओढून घेतात. व कित्येक ख्रिस्ती मिशनऱ्याचे दीर्घ प्रयत्न पाहून हे खरोखर पारमार्थिक बुद्धीनेंच इतकी मेहनत करीत असले पाहिजेत, व म्हणून यांच्या देवाकडे आपण गेलों तर कदाचित् हा भवसागर तरून जाऊं, असें पुष्कळांना वाटतें. पण यांच्या धर्माचा जरा दूरवर विचार केला तर तेव्हांच असें आढळून येईल कीं, त्या त्या धर्मांतून धर्मान्तर करविण्याचें जें तत्त्व आहे त्यांत पारमार्थिकत्वाचा अंश फार थोडा आहे. सर्व धडपड ऐहिक सुखासाठीं आहे, व त्या ऐहिक सुखाच्या भरारींत आपलीं मूळ तत्त्वें काय व आपली कृति काय, इकडे त्यांचें पूर्ण दुर्लक्ष झालेलें आहे. पण जेथें त्यांचें दुर्लक्ष झालेलें असेल तेथें बाकीच्यांचेंहि झालेलें असतें असें नाहीं. म्हणून आपल्या दृष्टीनें त्यांची जी चूक होत आहे

ती उजेडांत आणली पाहिजे, व धर्मान्तराच्या बाबतींत फसविणारांना आणि फसणारांना – दोघांनाहि त्याच्या कृत्याचें निष्फलत्व दाखवून दिलें पाहिजे.

ख्रिस्ती लोक असा उपदेश करतात कीं, ‘ तुम्ही आमच्या येशूकडे या, म्हणजे तो तुमच्या पापासाठीं देवाजवळ रदबदली करील, व त्याच्या मध्यस्थीनें तुम्ही मुक्त व्हाल.’ ह्या त्यांच्या मतावर नित्यत्वाच्या दृष्टीनें जे दोष येतात ते आतां दाखवावयाचे. परंतु त्यांच्याकडे वळण्याच्या आधीं जातां जातां जो एक लहानसा मुद्दा मध्यंतरीं उपस्थित होत आहे त्याजविषयीं थोडासा विचार करूं. असा प्रश्न उद्भवतो कीं, मुमुक्षु लोक आणि त्यांना मोक्ष देणारा देव यांच्यामध्यें रदबदली करण्यासाठीं येशूची कल्पना जी ख्रिस्ती धर्मांत केलेली आढळते ती कशाला ? मोक्ष देणारा आणि घेणारा हे दोघे असले म्हणजे कार्यभाग होत असतांना आणखी मध्यें तिसऱ्या एका येशूची योजना करणें यांत गौरव आहे. पूर्वीं इंग्रज लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांची भाषा नेटिवांना समजत नव्हती, म्हणून नेटिव त्यांच्यापाशीं पृथ्वीवरील मोक्ष म्हणजे थोड्या पगाराची आणि पुष्कळ त्रासाची चाकरी मागण्यासाठीं गेले असतां कोणी दुभाष्या मनुष्य लागत असे. परंतु देवाला सर्व भाषा समजतात. ज्या ज्या भाषेंत मनुष्य किंवा जनावर बोलूं शकेल त्या त्या सर्व भाषा देवाला समजतात, याबद्दल [illegible] मतभेद नाहीं. पण देवाला निरनिराळ्या भाषा समजत नाहींत व म्हणून त्याला कोणी दुभाष्या लागतो, अशीहि क्षणभर आपण कल्पना करूं तरी पण दुभाष्याचें काम येशूला कसें करतां येईल ? कारण त्याला पेहलवी, व फार झालें तर लॅटिन आणि ग्रीक या भाषा येत असतील. पण मद्रासेंतल्या परियाची, मुंबईतल्या महाराची, किंवा चीनांतल्या शेतकऱ्याची भाषा त्याला येत असेल अशी कल्पना कशी करतां येईल ? पण कोणी म्हणेल कीं, देवाच्या मुलाला देवाप्रमाणेंच अनेक भाषा येत असणें संभवनीय आहे. यावर आमचें उत्तर असें आहे कीं, देवाला जर अनेक भाषा येत असतील तर त्याला कोणी दुभाष्या नको, व जर येत नसतील तर विहिरींत नाहीं तर – पोहऱ्यांत कोठून येणार – या न्यायानें त्याच्या मुलालाहि अनेक भाषा येत नसल्या पाहिजेत. शिवाय देव आणि त्याचा मुलगा यांचें सामर्थ्य एकच आहे असें मानलें, तर एकाच सामर्थ्याच्या दोन व्यक्ती मानण्यांत गौरव आहे. शिवाय येशूच्या अंगीं

देवांचें सामर्थ्य होतें असें मानतां न येण्याला आणखी एक कारण असें आहे कीं, येशू हा मनुष्य म्हणून मानलेला आहे. सारांश, कसेंहि म्हटलें तरी ही दुभाष्याची कल्पना अगदीं विसंगत ठरते. परंतु आपण असें पाहतों कीं, आपल्याला एखाद्या दुकानांत कांहीं जिन्नस घ्यावयाचा असला तर तो दुकानदार आपल्याला फसवील म्हणून आपण कोणी माहितगार असा अडत्या पाहत असतों. पण दुकानदार आणि गिऱ्हाईक यांच्यामधील अडत्याची कल्पना येशूच्या ठिकाणीं जुळेल असें दिसत नाहीं. कारण दुकानदार फसवील म्हणून अडत्या पाहिजे. व ह्या कल्पनेचा अंगीकार केला तर देवाचाहि आपल्याला फसविण्याचा उद्देश असतो,-व तो सिद्धीस जाऊं नये म्हणून आपण कोणी तरी अडत्या पाहतों, असा त्याचा अर्थ होतो. पण देव कधीं कोणाला फसविणार नाहीं. मनुष्य – मग तो कितीहि सभ्य, सुधारलेला व सुशिक्षित असो, दुसऱ्या मनुष्याला फसवील. पण देव माणसाला फसवील ही कल्पना ख्रिस्ती धर्मालासुद्धां पसंत पडणार नाहीं; मग इतरांचें नांव कशाला पाहिजे! तेव्हां अडत्या या नात्यानेंहि देव आणि मुमुक्षु यांच्यांत तिसऱ्याची गरज असण्याचें कारण नाहीं. पण कोणी म्हणेल कीं, वरील दोन्ही कल्पना जुळत असल्या तरी व्यवहारांत आपल्या दृष्टीस असे पडतें कीं, न्यायाधीशापुढें आपला खटला नीट रीतीनें समजावून मांडण्यासाठीं आरोपीला वकील लागत असतो. तसा वकील, देव आणि मुमुक्षु यांच्या दरम्यान कोणी तरी पाहिजे असतो, अशी कल्पना केली तर ती जुळण्याचा संभव आहे. पण आम्ही म्हणतों कीं, ही कल्पनासुद्धां जुळण्यासारखी नाहीं. कारण वकील हा कोणाला लागतो? तर अल्पज्ञ न्यायाधीशाला. सर्वज्ञ परमेश्वराला पापपुण्याचे निवाडे करतांना वकील लागत नाहीं; व इंग्लिश बॅरिस्टरचें त्याच्यावर अधिक वजन पडत नाहीं. त्याला साक्षीदार लागत नाहींत, किंवा दस्तऐवजी पुराव्याची त्याला अपेक्षा नसते. तेव्हां मूर्तिमंत न्यायरूपी परमेश्वराला पगारी न्यायाधीशाप्रमाणें कोणाहि वकिलाची गरज असेल असें दिसत नाहीं. पण ईश्वराला वकिलाची गरज आहे, असा पूर्वपक्षाच्या समाधानासाठीं क्षणभर अभ्युपगम केला, तरी दोषापासून त्याची सुटका होऊं शकत नाहीं. कारण आम्ही असा प्रश्न विचारतों कीं, देवाच्या दरबारीं येशू हा वकील दिला

म्हणजे ज्या ख्रिस्ती लोकांनीं पातक केलें असेल त्यांना शिक्षा होते कीं नाहीं ? शिक्षा होते असें म्हटलें तर मग वकील दिल्यापासून काय फायदा ? व मग वकील देणारे ख्रिस्ती लोक आणि न देणारे परधर्मी लोक यांच्यांत काय फरक राहिला ? आणि जर कांहीं फरक नाहीं, तर मग ख्रिस्ती धर्मांतच येण्यांत काय हंशील आहे ? पण कोणी म्हणेल कीं, अपराधाबद्दल प्राण्यानें शासन भोगल्यानंतर त्याजवर दया दाखवावी, अशी शिफारस करण्याच्या कामीं वकिलाचा उपयोग होणार नाहीं काय ? पण आम्ही म्हणतों होणार नाहीं. कारण अपराधाच्या मानानें ठरलेली शिक्षा भोगल्यानंतरहि जर देव त्याला आणखी जास्त शिक्षा भोगूं लावील, तर ख्रिस्ती धर्मांतील देवाच्या ठिकाणीं अन्याय, निष्ठुरपणा, वगैरे दोषांचा आरोप केल्यासारखें होईल; व जास्त शिक्षा भोगूं देणारच नसला तर मग त्या शिफारशी तरी पाहिजेत कशाला ? आता येशू हा वकील दिला म्हणजे पातक करणारांना मरणानंतर शिक्षा भोगावी लागत नाहीं, असा दुसरा पक्ष घेतला तरीहि दोष अपरिहार्यच आहे. कारण असें मानणें म्हणजे ख्रिस्ती धर्म हा अन्याय करणाऱ्याला मुभा देणाराच एक आहे असा अर्थ होईल. कारण आपण कांहीं गुन्हे केले तरी आपण जो वकील देऊन ठेविला आहे, तो आपल्या रदबदलीनें आपणाला बिलकुल शिक्षा होऊं देणार नाहीं, अशी समज ख्रिस्ती धर्मानुयायांची झाली, तर मग त्यांना पारलौकिक शासनाची भीति नसल्यामुळें, व सर्वच अपराध या लोकीं उघडकीस येतात असें नसल्यामुळें ते पाहिजे तें अनन्वित करण्याला तयार होतील. तेव्हां कोणत्याहि बाजूनें विचार करून पाहिले तर वकिलाची कल्पना विसंगतच आहे असें सिद्ध होतें. शिवाय, एखादा अधिकारलुब्ध व पक्षपाती राजा आपल्या काकाला, मामाला बिनकामाच्या पण मोठ्या हुद्द्याच्या जागा देतो, तद्वांतलीच एक मध्यस्थाची जागा देवानें आपल्या मुलाला दिली, अशीहि कल्पना करतां येत नाहीं. कारण असें करणें म्हणजे मानवी मनोधर्मांचे आरोप त्या निष्काम, निष्क्रिय, आणि निरहंकार परमेश्वरावर लादण्यासारखें होणार आहे. तेव्हा येशू ख्रिस्त आणि त्याची मध्यस्थी हीं जीं तत्त्वें ख्रिस्ती धर्मांत आहेत तीं युक्तीच्या दृष्टीनें योग्य आहेत असें दिसत नाहीं. पण आमच्या धर्मशास्त्रांत

तर तीं सांगितलेलीं आहेत; तेव्हां आतां तिची वाट काय लावावयाची? ज्या अर्थीं दुसरी कांहीं वाट लावतां येत नाहीं, त्या अर्थीं ती कल्पना बायबलांत सांगितली आहे तशीच खरी मानल्यावांचून दुसरें गत्यंतरच नाहीं. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण येशूची गोष्ट जी सांगितली आहे तीमध्येंच सर्व बायबलाचें तात्पर्य आहे असें नाहीं. ती गोष्ट म्हणजे एक अर्थवाद आहे, व अर्थवादवाक्यांचें पर्यवसान तीं ज्यांना अनुलक्षून अर्थवादात्मक असतील त्यांच्या स्तुतींत होत असतें. अनेक प्रकारच्या अर्थवादात्मक गोष्टी सांगून लोकांच्या मनांत परमेश्वराबद्दल भक्ति उत्पन्न करण्याचा शास्त्राचा उद्देश असतो. तो न समजून त्या गोष्टी करणें म्हणजे शास्त्रांतील सर्वस्व होय अशी कल्पना करणें, हें अगदीं चुकीचें आहे 'परमेश्वर इतका मोठा दयाळु आणि भक्तजनांवर कृपा करणारा आहे कीं, भक्ततारणासाठीं तो आपल्या मुलालादेखील मृत्यूच्या तावडींत देण्याला तयार झाला; तेव्हा अशा परमेश्वराला तुम्ही भजा', असें मनावर ठसविण्यासाठीं ही येशूची गोष्ट लिहिली आहे. येशूच्या मध्यस्थी-( mediation ) वांचून गति नाहीं, हें या गोष्टींतील तात्पर्य नव्हे. आपल्या हातांत कोणी श्रीफळ दिलें तर तें देणाराचा हेतु वरवर जें दिसतें तें आपण खावें असा नसतो, तर त्या देणगीचें तात्पर्य आणि खरें स्वारस्य बाहेरच्या अर्थवादाच्या आंत असतें, हें मनुष्याला समजलें पाहिजे. पण फिरून कोणी ख्रिस्ती धर्माभिमानी असा पूर्वपक्ष पुढें आणील कीं, हें तुमचें अर्थवादाविषयींचें म्हणणें खरें असेल; पण यथाश्रुत अर्थाप्रमाणें येशू हा मोक्षदाता आणि मुमुक्षु याच्या दरम्यानचा मध्यस्थ, असेंच मानण्याला काय प्रतिबंध आहे? कारण तुम्हीहि साधुसमागमानें मुमुक्षूला परमेश्वर भेटतो, असें प्रतिपादन करीत असतां. श्रीशुकाचार्यांच्या समागमानें परीक्षित राजा तरला; वसिष्ठाच्या अनुग्रहानें कल्माषपाद राजा उद्धरला, इत्यादि अनेक गोष्टी तुमच्यामध्येंहि नाहींत काय? यावर आमचें असें उत्तर आहे कीं, तुम्ही म्हणता येथवर तुमची–आमची एकवाक्यता आहे; व साधुपुरुषांच्या समागमानें मुक्ति प्राप्त होते एवढेंच जर तुमचें मत असेल तर मग तुमच्या-आमच्यांत मुळींच विरोध नाहीं, पण तुम्ही तसें मानीत नाहीं. फक्त येशूच्या समागमानें मोक्षप्राप्ति होऊं शकते, दुसऱ्या कशानेंहि होऊं शकत

नाहीं, दुसरीं द्वारें म्हणजे नरकाचीं साधनें आहेत, असें तुम्ही प्रतिपादन करतां. जर साधुसमागमानें मोक्ष आहे, तर मग तो कोणत्याहि साधूच्या समागमानें लब्ध होऊं शकेल. त्याला अमुकच साधु लागतो असा तुमचा आग्रह कां असावा? साधूंना पूज्य मानण्याचा जेव्हां प्रश्न येतो, तेव्हां इतरांप्रमाणें तुमच्या येशूलाहि आम्ही एक साधुपुरुष म्हणून पूज्य मानतों. परतु त्याच्याच जोडीच्या इतर साधुपुरुषांना तुम्ही मात्र मुळींच पूज्य मानीत नाहीं, हा तुमचा अनुदारपणा नव्हे काय? व येशू हा एक साधुपुरुष आहे म्हणून त्याच्या समागमानें मोक्षप्राप्ति होते, एवढेंच जर तुमचें मत असेल तर मग दुसऱ्या साधुपुरुषांचा उपमर्द करून एखाद्या दुकानदाराप्रमाणें सारीं गिऱ्हाइकें तुम्ही आपल्याकडेच ओढण्याचा प्रयत्न कां करतां? उदरंभरी वैद्याप्रमाणें 'त्याच्या औषधानें गुण येणार नाहीं, तुम्ही माझ्या दवाखान्यांत या.' अशा प्रकारच्या वल्गना तुम्हीं कां कराव्या? ज्या साधुपुरुषाच्या नांवानें तुम्ही हें कर्म करतां त्याला या तुमच्या कृत्यानें बरें वाटत असेल काय? ही तुमची कृति त्याच्या साधुत्वाला कमीपणा आणणारी नाहीं काय? जॉइंट स्टॉक कंपनीला आपलें भांडवल [illegible] एजंट लागतात, तसें साधुपुरुषांची प्रतिष्ठा वाढविण्याला तुमच्यासारखे एजंट लागतात अशी तुमची कल्पना आहे काय? असेल तर ती चुकीची आहे, हें तुम्हांला कबूल केलें पाहिजे. तेव्हां इतरांप्रमाणें येशू हा एक साधुपुरुष आहे ही कल्पना आम्हांलाहि मान्य आहे. पण तुम्हीं असें मानलें तर तुमच्या धर्माचा सिद्धान्त सुटतो; व न मानलें तर असमंजसपणा पदरीं घ्यावा लागतो. याप्रमाणें तुमच्या मताला दोहोंकडून अडचण येते. आणखी एक असा दोष येतो कीं, तुम्ही येशूला देवाचा मुलगा म्हणतां, पण हें म्हणणेंहि युक्तिबाह्य आहे. आम्हां मूर्तिपूजकांना नांवें ठेवून तुम्ही आपला देव निराकार, निर्गुण आहे असें स्थापन करतां, आणि त्याच वेळीं तुम्ही असें म्हणतां कीं, आमच्या देवाला मुलगा आहे. हें जमावें कसें? पुत्रोत्पादनाला साकारत्व, सगुणत्व हे धर्म अवश्य पाहिजेत. ते धर्म जर तुमच्या देवांत नसतील, तर पुत्रोत्पत्ति असंभाव्य आहे; व असतील तर आम्हां मूर्तिपूजकांना हसण्याचें तुम्हांला कारण नाहीं. व ईश्वर साकार व सगुण तुम्हीं मानला म्हणजे त्याबरोबर नश्वरत्व हा धर्महि त्या तुमच्या ईश्वरावर येऊन बसूं लागेल.

अशा प्रकारच्या या अनेक दोषपरंपरा तुमच्या त्या येशूच्या कल्पनेमुळें तुमच्या मतावर येऊं लागतात. यासाठीं देव आणि मुमुक्षु यांच्यामध्यें कोणी तिऱ्हाईत अवश्य लागतो, या मतावर कोणाचाहि विश्वास बसणें शक्य नाहीं; व हें मत कोणत्याहि विचारी परधर्मीय माणसाच्या आदराला पात्र होण्यासारखें नाहीं, हें सिद्ध झालें. आतां नित्यत्वाच्या दृष्टीनें उत्पन्न होणाऱ्या दोषांचें स्पष्टीकरण पुढील लेखांत करूं.

## ईश्वर विभु आणि नित्य आहे ( ३ )

या विषयाचा विचार करीत असतांना ख्रिस्ती धर्मावर उद्भवणाऱ्या कांहीं दोषांचें दिग्दर्शन मागील दोन लेखांत केलें आहे. आतां ईश्वर नित्य आहे असें मानलें म्हणजे ख्रिस्ती धर्मावर कोणकोणते आक्षेप येऊं शकतात याचा आपण विचार करूं. ख्रिस्ती धर्मांत असा एक सिद्धान्त आहे कीं, येशू ख्रिस्त हा एक मनुष्यच होता, हें ख्रिस्ती लोकहि नाकबूल करीत नाहींत, व या मुद्दयाविषयीं जर उभय पक्षांची एकवाक्यता आहे तर आम्ही असें विचारतों कीं, येशू ख्रिस्ताच्या पूर्वीं दुसरा कोणी मनुष्य जगांत होता किंवा नाहीं ? जर होता असें तुम्ही म्हणाल, तर मग त्यांना भवनदीच्या पार उतरून नेण्याला कोण नावाडी होता ? येशूशिवाय तारण करणारा दुसरा कोणी नाहीं, असा तुमचा सिद्धान्त असल्यामुळें तुम्हांला असेंच म्हटलें पाहिजे कीं, येशूच्या पूर्वींचे सर्व लोक नरकांतच जाणार; व धर्माभिमानाच्या आवेशांत तुम्ही कदाचित् मागच्या त्या सर्व लोकांना नरकांत ढकलण्यालाहि तयार व्हाल. परंतु मग कोणाकोणाला नरकांत जावें लागेल याची तुम्हांला कल्पना आहे काय ? ग्रीस, सीरिया, ईजिप्त येथील जे मोठमोठे साधुपुरुष आणि तत्त्ववेत्ते होऊन गेले त्यांना तुमच्या मताप्रमाणें नरकांतच जावें लागणार. गौतम बुद्ध आणि बौद्ध धर्मांतील इतर सत्पुरुष यांचीहि तुम्ही तीच वाट लावणार; व वेदकालीन ऋषि आणि इतर महात्मे यांनाहि तुमच्या मताप्रमाणें तुम्हांला दुसरी गति देतां येत नाहीं. सॉक्रेतीस, शाक्यमुनि किंवा वामदेव यांच्या अंगीं नरकप्राप्ति करून देणारा असा कोणता बरें दुर्गुण तुम्ही दाखवूं शकाल ? व त्यांच्या अंगीं कोणताहि दुर्गुण

नसेल, तर मग ते नरकांत कोणत्या कारणानें पडूं शकतील? ख्रिस्ताच्या आधीं जन्मास येणें हा त्यांचा गुन्हा होता काय? आणि तुमच्या मताच्या पुष्टयर्थ त्यांना असली भयंकर शिक्षा देण्याला जों देव म्हणून आहे,–मग तो कोणाचाहि असो,–तो कधीं तयार होईल काय? सॉक्रेतीस किंवा बुद्ध नरकांत जाणार, आणि एखाद्या महारानें तुमच्या धर्माची दीक्षा घेतली म्हणजे तो सायुज्य-पदाला जाऊन पोंचणार – अशीं जीं हीं तुमचीं मतें तीं किती वेडगळपणाचीं आणि मूर्खपणाचीं आहेत हें तुमचें तुम्हांला समजत नाहीं काय? सर्व जग आंधळें आणि तुम्हांला मात्र डोळे, अशा समजुतीनें तुम्ही हीं अप्रयोजक मतें बाजारांतील चव्हाट्यावर शिकवीत असतां काय? असल्या अप्रबुद्धांच्या बरोबर स्वर्गास जाण्यापेक्षां सॉक्रेतीससारख्यां-बरोबर नरकांत जाणेंहि बरें, असें कोणालाहि वाटणार नाहीं काय? ह्या सर्व गोष्टींवरून असें सिद्ध होतें कीं, तुमच्या बाजूला 'बाबा वाक्यं प्रमाणम्' याशिवाय दुसरी कांहीं बळकटी नाहीं, व युक्तिवादानें पाहिलें असतां तुमच्या या मतांत कांहींच हशील नाहीं. तेव्हां वर दर्शविल्याप्रमाणें अनेक दोषांनीं टाकाऊ म्हणून ठरलेल्या तुमच्या या मताचा कोण अंगीकार करील? अशा अनेक अडचणी येतात म्हणून तुमचा पक्ष मुळींच ग्राह्य नाहीं, असें म्हणणें प्राप्त होतें. येशूच्या आधीं जगांत लोक होते अशी कल्पना गृहीत धरून वरील दोष दाखविलेले आहेत. आता या सर्व अडचणींतून निसटून जाण्यासाठीं तुम्ही कदाचित् असें म्हणण्याला तयार व्हाल कीं, येशू ख्रिस्ताच्या पूर्वीं या जगांत कोणाहि मनुष्याचें अस्तित्वच नव्हतें. परंतु तसें म्हणूनहि चालणार नाहीं. कारण अनादि काला-पासून चालत आलेला आणि अनंत कालापर्यंत चालू राहणारा इतिहास हा तुमच्या म्हणण्यांतील असत्यपणा बाहेर काढण्याला तयार आहे. येशू ख्रिस्ताच्या पूर्वीं माणसें या जगांत निर्माण झालेलीं होतीं, हें इतिहासावरून स्पष्ट होत आहे; व तें खोटें म्हणून तुम्हांला कधींहि ठरवितां येणार नाहीं. तेव्हां येशूच्या पूर्वीं माणसें होतीं असें तुम्हांला म्हणतां येत नाहीं, आणि नव्हतीं असेंहि म्हणतां येत नाहीं. अशा विलक्षण अडचणींत तुमच्या धर्मानें तुम्हांला आणून कोंडलें आहे. यावरून तुमच्या धर्मांत किती असमंजसपणा भरलेला आहे हें व्यक्त होत आहे.

तुमच्या मतानें मोक्षाचें सर्टिफिकेट देण्याचें ऑफिस केव्हांपासून सुरू झालें, याच्याबद्दलचा हा विचार झाला. आतां त्या ऑफिसचे पांच केव्हां वाजतात ह्याविषयीं आपण विचार करूं. तुमच्या धर्मांत असें तत्त्व आहे कीं, कालगतीनें केव्हां तरी एकदां न्यायाचा दिवस येणार आहे; त्या दिवशीं देव एक तुतारी वाजवील; त्या तुतारीचा आवाज थडग्यांत पुरून ठेवलेले मेलेले लोक ऐकतील; तो आवाज ऐकून ते उठतील; व सर्वजण देवाच्या पुढें जाऊन उभे राहतील; नतर देव त्यांचे न्याय-अन्याय पाहील, आणि कृतकर्मानुरोधानें ज्याला त्याला बक्षीस किंवा शिक्षा देऊन देव आपल्या ऑफिसचा दरवाजा बंद करून टाकील. या सिद्धान्तांत परधर्मीयांना हास्यास्पद वाटण्यासारख्या बऱ्याच गोष्टी आहेत. देवानें [illegible] तुतारी मेलेलीं माणसें कशीं ऐकूं शकतील? हल्लीं आपण असें पाहतों कीं, कित्येक थडग्यांवर मोठमोठे दगड घातलेले असतात, त्यांजवर माती ढकललेली असते, कित्येक ठिकाणीं झाडें उगवलेलीं असतात. हे सर्व आपल्या अंगावरचें वजन दूर काढून टाकून थडग्यातील माणसांना बाहेर कसें येतां येईल? सूक्ष्म लिंगदेह अशा रीतीचीं स्थलान्तरें करूं शकतात, असें आमच्या वेदान्ताचेंहि मत आहे. परतु हीं सर्व कृत्यें स्थूल देहांनींच होतात, व निर्जीव झालेला स्थूल देहच फिरून सजीव होतो, असा तुमचा सिद्धान्त आहे. त्यामुळें तुमच्या मताला वरील विरोध उत्पन्न होतो. शिवाय, न्यायाच्या अखेरच्या दिवशीं एकदां शिक्षा दिली म्हणजे ती त्यानें अनंत कालपर्यंत भोगीत बसावयाचें कीं काय? गुन्ह्याच्या मानानें शिक्षेच्या अवधींत कमीजास्तपणा असणें हें जें न्यायीपणाचें पहिलें लक्षण तें तुमच्या देवाच्या ठिकाणीं मुळींच दिसत नाहीं. असो. हे बारीकसारीक दोष झाले. परतु तुमच्या या सिद्धान्तावर मुख्य दोष येतो तो असा कीं, ईश्वर जर नित्य आहे असें तुम्ही मानतां, तर त्याच्या अंगांतील गुणधर्म एकदम मध्येंच बंद कसे पडतील? एखादा अम्मलदार पांच वाजले म्हणजे आपली कचेरी बंद करून घरीं जावयास निघतो, व एक मिनिट उशीरानें कोणी अर्जदार आल्यास "बस बस, आतां नाहीं; आतां कचेरी बंद झाली," असें म्हणतो. तशासारखी देवाची गोष्ट नाहीं. देवाच्या अंगांत सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति आहे असें जर तुम्ही मानतां, व देव नित्य आहे असें जर तुम्ही मानतां, तर मग

त्याच्या ठिकाणची ती नित्य शक्ति ' जजमेंट डे 'च्या नंतर कां बंद पडावी? शिवाय ती शक्ति नित्य आहे, तर देवानें अमुक एका विवक्षित काळीं सृष्टि उत्पन्न केली, किंवा ॲडामला आणि ईव्हला उत्पन्न कलें हें जें तुमचें म्हणणें आहे तें जुळत नाहीं. कारण ती शक्ति जर नित्य आहे, तर तुम्ही म्हणतां त्या काळाच्या पूर्वीहि आणि ' जजमेंट डे 'च्या नंतरहि देवाच्या हातून सृष्टि होत असली पाहिजे. नाहीं तर देवाची शक्ति अनित्य आहे, आणि त्यामुळें देवहि अनित्य आहे, असें तरी तुम्हाला कबूल केलें पाहिजे. पण देव अनित्य आहे असें म्हणणें म्हणजेहि ईश्वराच्या नित्यत्वाविषयींच्या आपल्या सिद्धान्ताविरुद्ध जाण्याचा अनिष्ट प्रसंग आपल्यावर ओढून घेण्यासारखें आहे. तेव्हां कोणत्याहि बाजूनें या खिस्ती धर्मांतील तत्त्वांचा विचार करून पाहिला तरी तत्त्वें अगदींच लटपटीत, युक्तिबाह्य, आणि विसंगत आहेत असें ठरतें. आतां याजवर कोणी खिस्त-धर्माभिमानी असें म्हणेल कीं, हीं तत्त्वें ईश्वरानें आपल्या पुस्तकांत सांगितलीं आहेत, म्हणून तीं पूज्य मानलीं पाहिजेत, व त्यांजवर श्रद्धा ठेविली पाहिजे. याजवर आमचें एवढेंच उत्तर आहे कीं, ज्या लोकांचें जें धर्मपुस्तक असेल त्यांतील वचनांवर त्या धर्मांतील लोकांनीं श्रद्धा ठेविली पाहिजे, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. पण तुम्ही दुसऱ्याला बाटविण्या-साठीं म्हणून जेव्हां आपला धर्म पुढें करतां, तेव्हां त्याजवर त्याची एकाकी श्रद्धा कशी बसेल ? प्रथमतः तो तुमच्या धर्माचें निरीक्षण तर्कदृष्ट्याच करणार, व त्यांत जर कांहीं निष्पन्न झालें तर मग तो पुढें तुमच्या धर्म-पुस्तकांवर श्रद्धा ठेवणार. विचार केल्यावांचून कोठें तरी श्रद्धा ठेवावयाची असेलच असेल तर त्याला त्याचा स्वतःचा धर्म नाहीं काय ? नुसती श्रद्धा ठेवण्यालाच त्याला तुमचा धर्म कशाला पाहिजे ? व युक्तीच्या आणि तर्काच्या मार्गानें आपल्याकडे वळवून घेण्यासारखें तत्त्व तर तुमच्या धर्मांत कांहीं दिसत नाहीं; तेव्हां असल्या धर्माकडे स्वतः मूर्ख असल्या-शिवाय कोणत्या परधर्मीयाची प्रवृत्ति होणार आहे !

• • •

# ३. डेक्कन कॉलेजला पाहून केशवरावांच्या मनांत आलेले विचार

" Where ignorance is bliss, 'tis folly to be wise."

डेक्कन कॉलेज सोडून केशवरावांना पंचवीस वर्षें झालीं होतीं. डेक्कन कॉलेजांतून बी. ए. चा अभ्यास संपवून पुढें केशवराव एल्‌एल्‌. बी चा अभ्यास करण्याकरितां तीन चार वर्षें मुंबईस होते. ती परीक्षा पास झाल्यानंतर त्यानीं खानदेशांत बरींच वर्षें वकिलीचें काम केलें. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचा मुनसफीचा नंबर आल्यावर त्यांनीं मुनसफीची नोकरी पतकरली. केशवरावांनीं जरी सरकारी चाकरी धरली होती, तरी त्या चाकरीमुळें त्यांची स्वदेशभक्ति तिळभरहि कमी झाली नव्हती. ते नेहमीं इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रें वाचीत असत. त्यामुळें आपल्या देशाचे व देशबांधवांचे कसकसे हाल होत आहेत ह्याबद्दलची साद्यंत हकीकत त्यांना नेहमीं अवगत असे; व आपल्या देशाच्या अत्यंत कष्टमय स्थितीचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें रात्रंदिवस दिसत असे. स्वदेशाच्या सद्यःस्थितीचे विचार त्यांच्या मनांत नाहींत असा एक क्षणहि गेला नाहीं. ते सुग्रास अन्न जेवीत असतांना, दुष्काळानें उपाशी मरणारे लोक त्यांच्या डोळ्यापुढें दिसत, व त्यामुळें त्याना जेवण गोड लागत नसे. ते मऊ बिछान्यावर निजले असतांना घरांदारांवांचून आणि वस्त्रांवांचून उघड्या हवेंत थंडीनें कुडकुडणाऱ्या लोकांची त्यांना आठवण होई, व त्यामुळें त्यांना साऱ्या रात्रभर झोंप येत नसे. ते कोर्टांतील आपल्या न्यायाधीशाच्या खुर्चीवर अकरा वाजतां येऊन बसले, म्हणजे त्या दुपारच्या वेळीं उन्हातान्हांतून काबाडकष्ट करणारे लोक, आणि भाकरीच्या तुकड्यासाठीं दारोदार हिंडणारे भिक्षेकरी, हे त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागत, व त्यामुळें त्यांना बराच वेळपर्यंत कांहीं कामकाज सुचत नसे. आपल्या पगाराचे रुपये मोजून घेताना, आपल्या निकालानें जे गरीब ऋणको दिवाणी तुरुंगांत पडलेले असत, व ज्यांचीं घरेंदारें जप्त झालेलीं असत, त्यांची

त्यांना आठवण येई, व दिवाणी तुरुंगांतील कैदी आणि जप्त झालेलीं घरें हीं महिन्याच्या कांठीं दहा.पांच तरी मोकळीं होत. पण ते कैदी आणि तीं घरें – त्यांना कोण मोकळें करतें हें वादीला आणि प्रतिवादीला दोघांनाहि क्वचितच माहीत असे. अशा रीतीनें केशवराव सरकारची आणि देशाची दोघांचीहि चाकरी बजावीत असतां कांहीं वर्षें लोटलीं. परंतु पुढें एकदां असा कांहीं प्रसंग आला कीं, त्यामुळें केशवरावांच्या मनाला उपरति होऊन, त्यांनीं आपल्या चाकरीचा राजीनामा दिला, व ते पुण्यांत सुखवस्तु येऊन राहिले. केशवरावांची स्वदेशभक्ति दिवसेंदिवस दृढ होत चालली होती. पण त्यांची प्रकृति मात्र उलट अगदीं क्षीण होत चालली होती. म्हणून ते व्यायामाकरितां दररोज फिरावयास जात असत. नित्यक्रमा-प्रमाणें एके दिवशीं पहांटेस फिरावयास गेले असतां, मध्येंच दमल्यामुळें ते एका स्वच्छ कातळावर विसांवा घेण्यासाठीं बसले. त्यांच्या पलीकडून एक लहानसा ओढा वाहात होता, व त्याच्या पलीकडे कांहीं गाई आणि वांसरें चरावयास लावून एक गोवारी आपलें अलगूज वाजवीत एका झाडाखालीं बसला होता. समोरून डेक्कन कॉलेजचीं उंच शिखरें धुक्यामधून अंधुक अंधुक दिसत होतीं. त्यांजकडे केशवरावांचें लक्ष गेलें. तीं शिखरें पाहून केशवरावांना पूर्वीची आठवण झाली. त्यांची राहण्याची खोली त्यांना दिसूं लागली. त्यांचे कॉलेजमधील सोबती त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहिले; व त्या वेळची स्थिति आपण आतां अनुभवीत आहों असा त्यांना क्षणभर भास झाला. तरी पण ती स्थिति त्यांच्या डोळ्यांपुढें फार वेळ राहिली नाहीं. त्या वेळच्या स्थितीवरून हल्लींच्या स्थितीची त्यांना आठवण झाली. हल्लीं आपल्या लोकांचे होत असलेले हाल त्यांच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष दिसूं लागले आपल्या लोकांची हल्लींची दीन, हीन आणि परावलंबी अवस्था त्यांच्या मनाला विंचवासारखी चावूं लागली, व आपल्या लोकांच्या हल्लींच्या दारिद्र्यामुळें त्यांना दाही दिशा उदास भासूं लागल्या. असे विचार मनांत येऊन त्यांचा कंठ दाटून आला व डोळे पाण्यानें भरून आले. व अशा स्थितींत त्यांच्या मनांत पुढील विचार आले—

"माझ्या लोकांच्या दुःस्थितीबद्दल मलाच इतकें वाईट कां वाटतें आहे? तो पलीकडच्या झाडाखालीं बसलेला गोवारी आपल्या गाई

खडकावर चरावयाला सोडून देऊन आपली व आपल्या गाईची करमणूक करण्याकरितां आपलें अलगूज वाजवीत आहे. तो माझ्या देशांतीलच नव्हे काय? त्याचा आणि माझा — आमचा दोघांचाहि जन्म या हिंदुस्थान देशांतच झालेला नाहीं काय? आणि मी ज्यांना आपले देशबांधव म्हणून समजतों ते याचेहि देशबांधव नाहींत काय? पण हे हिंदुस्थानांतील लोक जितके माझे देशबांधव आहेत तितकेच ते याचेहि आहेत. तर मग या देशबांधवांच्या दैन्यावस्थेकरितां मी दुःखानें रडत बसावें, आणि यानें मजेनें अलगूज वाजवीत बसावें,- असें कां? असें कां होतें? याचें कारण काय?"

असें म्हणून केशवरावांनीं आपली शून्य दृष्टि चोहोंकडे फिरविली. इतक्यांत धुक्यामधून अंधुक अंधुक दिसणाऱ्या डेक्कन कॉलेजच्या शिखराकडे त्यांची दृष्टि गेली. त्याबरोबर त्यांच्या तोंडांतून पुढील उद्गार निघाले—

"याचें कारण हें कॉलेज! माझ्या देशांतील लोकांच्या दुःस्थितीबद्दल मी कष्टी कां — आणि हा निष्काळजी कां, याचें कारण हें कॉलेज! माझ्या देशांतील लोकांच्या पेट्यांतून पैसे नसले म्हणजे माझ्या पेटींत असलेले पैसे नाहींसे होतात असें नाहीं; मग मीं त्यांच्या दारिद्र्यासाठीं कां रडावें? आणि माझ्या देशांतील लोक अन्नावांचून उपाशी मरत असले, म्हणजे माझ्यापुढें वाढून येणाऱ्या ताटांतील पक्वान्नें कांहीं कमी होतात असें नाहीं. मग मीं त्यांच्या उपासमारीसाठीं कां कळवळावें? अशी वास्तविक स्थिति असतां मी मात्र त्यांच्यासाठीं रडतों आणि कळवळतों, आणि हा खुशाल मजेनें अलगूज वाजवीत बसतो हा काय न्याय झाला! पण हा सगळा फरक ह्या कॉलेजानें उत्पन्न केला आहे. मीं जर २५ वर्षांच्या पूर्वीं या कॉलेजांत पाऊल ठेवलें नसतें तर आज मीहि याच्याचसारखा दुसऱ्या एखाद्या झाडाखालीं गाई चारीत आणि अलगूज वाजवीत सुखानें बसलों असतों; व तेथील गवत सरलें असतें तर मी आपल्या गाई घेऊन दुसरीकडे गेलों असतों. ज्या दिवशीं मी या कॉलेजांत प्रथम गेलों तो दिवसच जर उगवला नसता, तर आजचा हा दिवस उगवण्याच्या वेळीं मला माझ्या दुःखमय स्थितीबद्दल पश्चात्ताप- आणि या गोवाऱ्याच्या आनंदमय जीवनयात्रेबद्दल हेवा कधींहि वाटला नसता! मला लहानपणीं फारसें समजत नसे, त्यामुळें माझी मॅट्रिक्यु- लेशनची परीक्षा होण्याच्या आधींपासूनच मी कॉलेजबद्दल मनोराज्य करीत

असें. व मी कॉलेजमध्यें आलों तेव्हांहि माझ्या मनांत फार आशा होत्या. पण आतां त्या आशांत कांहीं अर्थ नाहीं अशी माझी खात्री होऊन गेलेली आहे. ह्या कॉलेजमधून शिकून बाहेर पडलों म्हणजे मी अमुक करीन आणि तमुक करीन, असें मला वाटत होतें. मी आपल्या देशाच्या कांहीं तरी कामीं येईन, मी आपल्या देशांतील लोकांची दैन्यावस्था दूर करीन, मी आपला धर्म उत्कृष्टावस्थेला नेईन, अशा एक ना दोन, लक्षावधि महत्त्वाकांक्षा माझ्या मनांत घोळत होत्या. पण या महत्त्वाकांक्षा कॉलेजमधल्या! कॉलेजमधल्या महत्त्वाकांक्षा आणि कॉलेजच्या बाहेरील जगामधील वस्तुस्थिति यांच्यांत किती अंतर? पण या अंतराची त्या वेळीं किंचितहि कल्पना नसते. मी कॉलेजमधून बाहेर आलों, आणि जगाचा अनुभव घेऊं लागलों, तेव्हां मला असें दिसून आलें कीं, मला फारच थोडी स्वतंत्रता आहे; व मला माझ्या देशाकरितां आणि देशबांधवांकरितां फारच थोड्या गोष्टी करतां येण्यासारख्या आहेत. मी पाहिजे तर शाळेंत पोरें हांकलूं शकेन, एखादा बिनकिफायतीचा धंदा चालवूं शकेन, किंवा काँग्रेसमध्यें शब्दापुढें शब्द ठेवून कांहीं वाक्यें बोलूं शकेन; पण याच्या पलीकडे आपलें ज्यांत खरें हित आहे अशी कोणतीहि गोष्ट आज आपल्यापैकीं कोणालाहि करतां येण्यासारखी नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री होऊन चुकली. कॉलेजांत असतांना माझ्या पुष्कळ आशा होत्या. पण कॉलेजमधून बाहेर पडल्यावर मीं काय केलें? वकिलीचा धंदा करून मी गरीबगुरिबांना नाडलें, आणि न्यायाधीश झाल्यावर मीं सरकारचा तोंडपुजेपणा केला. याच्यापेक्षां आणखी मीं काय केलें? माझ्या वडिलांना फार वाटत होतें कीं, आपल्या मुलानें कॉलेजमध्यें जाऊन वरिष्ठ प्रतीचें शिक्षण संपादन करावें. बाबा, तुमच्या इच्छेप्रमाणें मी कॉलेजमध्यें जाऊन शिकलों, व कांहीं दिवस तीनतीनशें रुपये पगारदेखील मिळविला; पण त्याचा काय उपयोग? स्वार्थ साधण्यासाठीं मीं कॉलेजमध्यें जाऊन शिकावें अशी — बाबा, तुमची कधींहि इच्छा नसेल. पण कॉलेजमध्यें शिकून मीं दुसऱ्याचा अर्थ काय साधला आहे? माझ्या हातून कोणतें देशकार्य झालें आहे? किंवा कोणत्या देशबंधूचें दुःख माझ्या हातून निवारण झालेलें आहे? पण या गोष्टी कॉलेजांतील शिक्षणानें सध्यांच्या काळीं होऊं शकतील अशी कल्पनाच

मुळीं चुकीची आहे. सध्यांचा प्रसंग असा आहे कीं, कोणी कोठेंहि शिकलेला असो, सर्वांचे हातपाय सारख्याच रीतीनें बांधले गेलेले आहेत, व ते त्यांना कांहीं नियमित मर्यादेपर्यंतच हालवितां येतात. त्याच्या पलीकडे त्यांना कांहींएक करतां येत नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें या कॉलेजच्या शिक्षणापासून कांहीं तादृश फायदा होणें तर लांबच राहिलें,— पण उलट एक मोठा थोरला तोटा मात्र होतो.

आपल्या देशस्थितीबद्दल मला वाईट वाटतें, आणि हा गोवारी निष्काळजी आहे, याचें मुख्य कारण हेंच कीं,—आपली, आपल्या देशाची, आपल्या लोकांची, व आपल्या धर्माची काय दुर्दशा झाली आहे हें मला कळतें; आणि याला कळत नाहीं. याला सांप्रतच्या आपल्या वस्तुस्थितीचे ज्ञान नाहीं, आणि मला आहे; यामुळें हा सुखी व मी दुःखी – असा आमच्यांत फरक पडला आहे. त्याच्या चार गाई हेंच याचें राज्य, रानांतलें कुरण हाच याचा देश, याचें झोंपडें हाच याचा राजवाडा, आणि या गाई व वांसरें हीच याची संपत्ति! याची दृष्टि फार आकुंचित आहे, आणि याचें क्षितिज अतिशय मर्यादित आहे. म्हणून हा भाग्यवान् गोवारी सुखी आहे. परंतु माझी तशी स्थिति नाहीं. ह्या कॉलेजने माझी दृष्टि विस्तृत केली, आणि माझें क्षितिज अमर्याद केलें. मींहि या गोवाऱ्याप्रमाणें माझें कुरण हाच माझा देश, आणि माझीं गाईवांसरें हीच माझी संपत्ति असें मानलें असतें; पण हें कॉलेजानें माझ्या ठिकाणीं आतां अशक्य करून ठेविलें आहे. तें सुख कॉलेजानें माझ्यापासून हिरावून घेतलें. ह्यानें मला शिकविलें कीं, गंगोत्रीपासून कन्याकुमारीपर्यंतचा सर्व हिंदुस्थान देश हा तुझा देश आहे. ह्यानें मला सांगितलें कीं, या हिंदुस्थान देशांत अपार संपत्ति पूर्वीं होती व अजूनहि आहे,–व ती सर्व तुझी आहे. या गोष्टी यानें मला सांगितल्या नसत्या, तर आज मला जे सूर्यप्रकाशाचे दिवस मेघाच्छादित वाटत आहेत, आणि ज्या चांदण्याच्या रात्री अंधः-कारमय वाटत आहेत, त्या तशा कां बरें वाटल्या असत्या! मी आपला वेळ अज्ञानाच्या सुखांत मोठ्या आनदानें घालविला असता! पण या कॉलेजानें आणि कॉलेजांतील ज्ञानानें माझ्या सुखांत माती कालविली. ह्यानें मला ह्या जगांत कोठेंहि विश्रान्तीचें ठिकाण म्हणून ठेविलें नाहीं. तो गोवारी

दिवसा पाहिजे त्या झाडाखालीं आपलें अलगूज वाजवीत बसूं शकेल, आणि रात्रीं पाहिजे त्या कातळावर झोंप घेऊं शकेल; पण मला हें शक्य नाहीं. ज्या मैदानांत मी हल्लीं आहें त्याचीच गोष्ट घेतली तरी – जेथें तो गोवारी स्वस्थ बसला आहे तेथील जागा पाहून माझ्या मनांत वादळांवर वादळें उत्पन्न होत आहेत. तेथेंच पूर्वीं पेशवाई होती. तेव्हां पेशव्यांनीं कांहीं कामगिरी-साठीं होळकरांना बोलाविलें म्हणजे त्यांच्या सैन्याचा तळ त्या ठिकाणीं पडत असे ! ज्या लढाईनें पेशव्यांची पेशवाई बहुतेक नामशेष झाली ती लढाई – खडकीची लढाई—याच्याच आसपास कोठें तरी लढली गेली असली पाहिजे ! त्या लढाईत आशा अपरिपूर्ण राहून धारातीर्थीं पडलेले शूर लोक कदाचित् अजूनहि येथें पिशाच्चरूपानें हिंडत असतील. त्यांचीं भयंकर स्वरूपें माझ्या डोळ्यांपुढें दिसतात, तीं या गोवाऱ्याला कोठें दिसत आहेत ? मीं कोठेंहि जाऊन कोणतेंहि ठिकाण पाहिलें तरी तेथील वैभव नाहींसें झालेलें आणि तेथील संपत्ति लयाला गेलेलीच माझ्या दृष्टीस पडते. संपत्ति गेल्यामुळें भिकार झालेलीं शहरें आणि वैभव गेल्यामुळें उजाड झालेलीं गांवें,- हीं सर्व मला ह्या कॉलेजनें दाखवून दिलीं. ह्यानें मला ह्या गोष्टी सांगितल्या नसत्या, तर रायगड, पुणें, सातारा, विजापूर, आग्रा, दिल्ली या ठिकाणांतून पूर्वींचे दगड, विटा, चुना, लांकडें हीं कायम असलीं तरी तेथून कांहीं तरी नाहींसें झालें आहे असें मला कशाला वाटलें असतें ! यानें जर मला ह्या गोष्टी सांगितल्या नसत्या, तर मी या ठिकाणीं गेल्यावर शिवाजीचें थडगें, शनवारवाडा, अजीमताऱ्याचा किल्ला, गोलघुमट किंवा कुतुबमिनार पहावयाला जाऊन तेथें डोळ्यांतून टिपें कां बरें गाळलीं असतीं ? इतर लोकांप्रमाणें मलाहि तेथें जाऊन मजा मारतां आली नसती काय ? पण माझी सर्व मजा या कॉलेजनें नाहींशी केली आहे ! मी या कॉलेजवर एकदां अतिशय प्रीति करीत होतों, पण त्या वेळेला जर मला अशी कल्पना असती कीं, हेंच कॉलेज पुढें माझ्या सर्व सुखांत माती कालविणार आहे, तर मी याच्यावर कधींहि प्रीति केली नसती. या कॉलेजांतून विद्या मिळते, व विद्या ईश्वराचा अंश आहे – हें सर्व खरें. परंतु विद्येची कृति ईश्वराच्या कृतीपेक्षां पुष्कळ कमतरपणाची ! ईश्वर मनुष्याला डोळे आणि हात अशीं दोन्हीहि इंद्रियें देतो. पण विद्या

फक्त मनुष्याला डोळेच देऊं शकते. याच्यापेक्षां जास्त ती देऊं शकत नाहीं. आणि हेंच तर वाईट ! याच्यापेक्षां डोळे नसलेले बरे. टँटॅलस म्हणून लिडियाचा एक राजा होता. याला कांहीं अपराधाबद्दल अशी शिक्षा करण्यांत आली होती कीं त्याच्या हनुवटीपर्यंत त्याला पाण्यांत बुडवून ठेविलें होतें. परंतु तहान लागली तर त्याला तें पाणी पितां येणें शक्य नव्हतें. त्याला तें पाणी डोळ्यांनीं दिसत असे, पण हातानें घेऊन तोंडांत घालतां येत नव्हतें. ह्याच्यापेक्षां तें पाणी डोळ्यांनीं न दिसतें तर टँटॅलसची तहान इतकी प्रक्षुब्ध झाली नसती. या कॉलेजांतील ज्ञानानें, ज्यांनीं तें संपादन केलें आहे त्यांची अशाच प्रकारची स्थिति करून सोडली आहे. त्या ज्ञानानें दृष्टि उघडल्यामुळें सर्व बरें व वाईट, आपलें व लोकांचें, हल्लींचें व पूर्वीचें त्यांना कळतें. परंतु कळण्यापलीकडे दुसऱ्या कांहींच रीतीनें आपली अवस्था सुधारून घेता येत नाहीं,—अशी स्थिति आहे. अशा स्थितींत मला वाटतें, ज्ञानी असण्यापेक्षां अज्ञानी असणेंच अधिक चांगलें ! आपल्याविरुद्ध उठलेल्या देवदूतांना देवानें नरकलोकांत ढकलून दिलें, त्या वेळेला त्या ठिकाणीं थोडासा उजेड होता; पण त्या जागेंतील भयंकरपणा किती आहे हें त्या पतित झालेल्या देवदूताला दिसावें, एवढ्याच-पुरता तो उजेड होता, असें मिल्टननें वर्णन केलेलें आहे. त्या प्रकारचीच आमच्या ज्ञानाची स्थिति आहे. आमच्या देशाची आणि आमच्या देशांतील लोकांची अवस्था किती भयंकर आहे, हें समजण्यासाठींच आमचें ज्ञान आहे. ' दुःखसंवेदनायैव मयि चैतन्यमर्पितम् । ' हें जसें रामानें म्हटलें आहे तसेंच मला वाटतें. मलाहि असें म्हणतां येईल की, ' दुःखसंवेदनायैव मयि विज्ञानमर्पितम् ! ' असलें पंगु ज्ञान ह्या कॉलेजनें मला दिलें, आणि त्यानें धड मला ह्या तीरावरहि स्वस्थ अलगुजें वाजवीत आणि गाई चारीत बसूं दिलें नाहीं, आणि धड पलीकडच्या तीरावरहि ह्या जगांतील स्पृहणीय व उन्नत स्थितीचा अनुभव घेण्यास मला नेलें नाहीं,—तर एखाद्या भोंक पडलेल्या नावेप्रमाणें यानें मला या दुःस्थितीच्या नदींत मध्यावर आणून सोडून दिलें आहे. अशी या कॉलेजनें माझी दुर्दशा करून टाकिली आहे. यानें मला निरनिराळ्या वेळचे आणि निरनिराळ्या लोकांचे इतिहास वाचावयाला दिले. मला ते इतिहास वाचून काय करावयाचें होतें ?

ते इतिहास न वाचलेले लोक जगांत थोडे आहेत काय? त्यांतलाच मी एक झालों असतों. पण निदान रात्रीची मला सुखाची झोंप तरी लागली असती. आणि आतां सगळ्या जगाचा इतिहास माझ्या स्मृतीमध्यें सांठविलेला असूनहि माझ्या मनाला सुख म्हटलें तर काडीइतकेंहि नाहीं. आपल्या देशांतील पूर्वींचे इतिहास वाचून आपले पूर्वज कसे होते, आणि आपण त्यांच्या पोटीं कसे निर्माण झालों – हे विचार मनांत येऊन वाईट मात्र वाटावयाचें; आणि दुसऱ्यांच्या देशांतील हल्लींचे इतिहास वाचून ते लोक आपलें घोडें पुढें ढकलण्यासाठीं किती धडपडत आहेत, आणि आपण आपल्या उन्नतीविषयीं किती उदासीन आहों,–असे विचार मनांत येऊन उद्वेग मात्र उत्पन्न व्हावयाचा. तें इतिहास-ज्ञान आपल्याला कशाला पाहिजे आहे! अरे, गाई चारणाऱ्या गोवाऱ्या! अमेरिका इंग्लिशांच्या अमलापासून स्वतंत्र झाली, जर्मनीनें फ्रान्सला एकदां पादाक्रान्त केलें होतें, किंवा राघोबादादांनीं अटकेवर झेंडे लाविले,–या गोष्टी तुला माहीत नाहींत म्हणून तुझी न्याहरीची भाकरी तुझ्या जिभेला कडसर लागते काय? नाहीं! तर मग तुला हा इतिहास माहीत नाहीं म्हणून तुझें काय वाईट झालें आहे? आणि तो मला माहीत आहे, म्हणून मीं तुझ्यापेक्षां अधिक काय कमाविलें आहे? उलट मी आपल्या मनाची शान्ति मात्र त्याच्या योगानें घालवून बसलों आहें; ती माझी मानसिक शान्ति मला कोणी परत देईल काय? अरे, सुखांत कालक्रमणा करणाऱ्या गोवाऱ्या, तुझ्या–माझ्या स्थितीची आपण अदलाबदल करूं, येतोस काय? पण छे! छे! तुला असें फसवून उपयोगी नाहीं. माझ्या ह्या बाह्यात्कारी डामडौलाला भुलून तूं कदाचित् फसशील. माझे हे बूट, ही पाटलोण, हा कोट, ही पगडी, हीं सर्व बाहेरून तुला मोहक दिसत आहेत. पण त्यांच्या आंत सारें दुःखच भरलेलें आहे. ज्या कॉलेजनें मला हें दुःखोत्पादक ज्ञान दिलें, त्यानेंच हा मला दुःखमय पोषाख दिलेला आहे! ह्यांत सुख नाहीं! तेव्हां तुझी सुखान्त स्थिति तुझ्यापासून घेऊन तुला माझ्या दुःखांत टाकणें मला बरोबर दिसत नाहीं! या गोवाऱ्याची स्थिति मला स्पृहणीय वाटते. पण ती मला प्राप्त व्हावी कशी? ह्या कॉलेजनें मला दिलेलें ज्ञान माझ्यांतून नाहींसें झाल्यावांचून मला त्याच्यासारखें सुख कसें प्राप्त होणार!

हें दुःखजनक ज्ञान मी विसरून जाईन तर बरें! पण मी घोकलेले इतिहास आतां विसरणार कसे? ग्रीक लोकांच्या पुराणांत एक नदी वर्णिलेली आहे. तिचें पाणी प्यालें असतां मागील सर्व स्मृति नष्ट होते म्हणून म्हणतात. तसल्या एखाद्या नदीच्या पाण्यानें जर हें सगळें ज्ञान विसरून जाईन तर किती बरें चांगलें होईल! या कॉलेजच्या ज्ञानानें आम्हांला नास्तिक आणि धर्मभ्रष्ट मात्र केलें आहे. व दुसऱ्यांची उन्नतावस्था आमच्या डोळ्यांपुढें मांडून ती संपादन करण्याच्या अशक्यतेमुळें आमच्या मनांत त्यानें निराशा मात्र उत्पन्न केली आहे. अशा प्रकारचें ज्ञान असण्यापेक्षां नसलेलें बरें! व ज्ञानापेक्षां अज्ञानच बरें! डोळे आहेत पण हात नाहींत, आणि ज्ञान आहे पण कर्तृत्वशक्ति नाहीं, अशा स्थितींतील ते डोळे आणि तें ज्ञान नुसतें घेऊन काय करावयाचें आहे? जेथें अज्ञानांतच सुख आहे, तेथें सज्ञान होणें म्हणजे मूर्खपणाच होय.''

अशा प्रकारचे विचार केशवरावजींच्या मनांत चालले होते,–तों सूर्य बराच वर आला. धुकें पडलेलें हळूहळू कमी होत जाऊन कॉलेजचें शिखर स्पष्ट दिसूं लागलें. त्या मैदानांतील गवतावर पडलेल्या दहिंवराच्या थेंबावर सूर्यकिरण प्रतिबिंबित झाल्याच्या योगानें हा इंद्रनीलमण्याचाच मळा पिकला आहे कीं काय असा भास होऊं लागला होता. तेथें जवळूनच जो ओढा वाहात होता, त्याच्या लहान लहान लाटांवर सूर्यबिंबाचीं अर्धवट प्रतिबिंबें चोहोंकडे पडल्यामुळे हा रत्नखचित जमिनीचा भाग आहे कीं काय अशी शोभा दिसत होती,-व तो गोवारी आपल्या गाई घेऊन अलगूज वाजवीत घराकडे चालला होता. इतका उशीर झालेला पाहून केशवरावहि घरीं जाण्याकरितां उठले. उठल्यानंतर केशवरावांनीं डेक्कन कॉलेजच्या शिखराकडे एकदां फिरून पाहिलें. पण त्यासरशीं त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आले. ते पुसून त्यांनीं आपली दृष्टि त्या गोवाऱ्याकडे आणि त्याच्या गाईकडे लाविली. पण कांहीं वेळानें तो गोवारी आणि त्या गाई दिसेनाशा झाल्या, तरी पण त्या गोवाऱ्याच्या अलगुजाचा शब्द ऐकूं येत होता, तोच ऐकत केशवराव किती तरी वेळ उभे राहिले. पण पुढें तोहि ऐकूं येईनासा झाला. तेव्हां एक दुःखाचा सुस्कारा टाकून केशवरावांनीं हळूहळू आपल्या घराकडे जाण्यास सुरुवात केली.

● ● ●

# ४. ईश्वराची लीला अगाध आहे

( काळ : अग्रलेख, ता. १२-४-१९०१ )

[ वर्षारंभींची प्रार्थना " निराश होण्याचें कारण नाहीं " हा अशाच आशयाचा अग्रलेख ता. २८-६-१९०१ च्या अंकांत आहे. ]

व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥
वृक्षाचियां माथां सोडिला ससाणा । धनुष्यासी बाणा लावियेलें ॥
तयेकाळीं तुला पक्षी आठविती । धांवे गा श्रीपती मायबापा ॥
उडोनियां जातां ससाणा मारीलें । बैसतां विंधील पारधी तो ॥
ऐकोनियां धावा तया पक्षियांचा । धरिला सर्पाचा वेष वेगीं ॥
डंखोनि पारधी भूमिसी पाडिला । बाण तो लागला ससाण्यासी ॥
एक मृगी दोन्ही पाडसांसहित । आनंदें चरत होती वनीं ॥
अवचितां तेथें पारधी पावला । घेऊनियां आला श्वान दोन्ही ॥
एकीकडे त्यानें चिरल्या वाघुरा । ठेविलें श्वानपुत्रां एकीकडे ॥
एकीकडे तेणें वोणवा लाविला । आपण राहिला एकीकडे ॥
चहोंकडूनियां मृगें वेढियलीं । स्मरों ते लागलीं नाम तुझें ॥
रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा । देवाचिया देवा पावे आतां ॥
कोणी रक्षी आतां ऐशिये संकटीं । बापा जगजेठी तुजविण ॥
आइकोनी तुम्ही तयांचीं वचनें । कृपा अंतःकरणें कळवळिलां ॥
आज्ञा तयेवेळीं केली पर्जन्यासी । वेगीं पावकासी विझवावें ॥
ससे एक तेथें उठवूनी पळविले । तयासाठीं गेले श्वान दोन्ही ॥
मृगें चमकोनी सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलीं म्हणोनियां ॥

—तुकाराम

वैशाखाच्या महिन्यांत दोन प्रहराच्या वेळीं एखाद्या राजाच्या सत्ते-प्रमाणें सूर्याच्या उन्हाचा कडक अंमल सर्व भूमंडळावर बसलेला असतो. एखाद्या जुलमी राजाच्या जुलमाप्रमाणें सूर्याच्या प्रखर उन्हानें सर्व मनुष्यांच्या अंगाची लाही लाही होत असते. लढाईत घायाळ झालेल्या शिपायांच्याप्रमाणें सर्व लोकांच्या अंगांतून रक्ताप्रमाणें घामाच्या धारा वाहात असतात. डोळ्याला गार वाटण्यासाठीं किंवा तृषा शान्त करण्या-साठीं एक थेंबभर पाणी पाहिजे असलें, तर तेंहि कंगाल मुलुखांतील द्रव्याप्रमाणें मिळण्याची चोहोंकडे मारामार झालेली असते. निष्ठुर मनुष्यांच्या अंतःकरणांप्रमाणें सर्व जलाशय कोरडे ठाक पडलेले असतात. बेबंदशाहींतील वयोवृद्ध माणसाप्रमाणें झाडांचीं पिकलेलीं पानें सर्वत्र गळून पडलेलीं असतात, व अराजकावस्थेमधील दयेप्रमाणें छायेचें नांवदेखील कोठें उरलेलें नसतें. एखाद्या निर्घृण राजाप्रमाणें सूर्य आपल्या हजारों करांनीं पृथ्वीवरील लोकांचें जीवन आकर्षण करून घेण्याला उद्युक्त झालेला असतो. लोभाविष्ट लोकांच्या धनतृष्णेप्रमाणें सूर्याच्या उष्णतेनें चोहोंकडे कहर करून सोडलेला असतो. अरण्यांतून स्वाभाविक आणि कृत्रिम वणवे पेटून त्यांत दुष्काळांतील गरीब माणसांप्रमाणें शेंकडों मुकीं जनावरें प्राणाला मुकत असतात. भलत्याच नादाला लावून दिलेल्या लोकांप्रमाणें हरणें मृगजळाच्या पाठीमागें धांवत सुटलेलीं असतात. जुलमी अमलांतील अन्यायाप्रमाणें अंगाला करपविणारा कढत वारा चोहोंकडे सुटलेला असतो. हलक्या लोकांप्रमाणें ज्यांची जोड्याशींच असण्याची योग्यता, असले रजःकणसुद्धां आपलें स्थान सोडून वर येऊन डोळ्यास त्रास देऊं लागतात. चोहोंकडे उष्णतेचा पूर्ण अंमल बसतो, व खालीं तळ आणि वर पृष्ठभाग अशा रीतीचे पाण्यानें भरलेले जे अनेक महासागर पृथ्वीच्या पाठीवर आहेत त्यांच्याहून विपरीत, म्हणजे वर तळ आणि खालीं पृष्ठभाग अशा रीतीनें उपडा केलेला हा आकाशांतील उष्णतेचा महासागर ह्या भूमंडळावर ओतून — त्यांत आपणां सर्वांना गाडून टाकण्याचा प्रयत्न हा सूर्य करीत आहे कीं काय, असा पाहणाराला भास होत असतो. अशा स्थितींत गांजलेल्या लोकांप्रमाणें चातक पक्षी वर मान करून आपल्या संतापशमनाची मार्गप्रतीक्षा करीत बसलेले असतात.

परंतु पावसाचें कांहीं एक चिन्ह नसतें, दिशा रखरखीत झालेल्या असतात, व सूर्यमंडळाकडे पाहवतसुद्धां नाहीं,–अशी स्थिति झालेली असते. पावसाबद्दल सर्व लोक निराश झालेले असतात, व त्या निराशेमुळें हतवीर्य होऊन दुःखाचे सुस्कारे टाकीत – व 'आतां पाऊस येत नाहीं' असे दुःखाचे उद्गार काढीत दीनवदन होऊन बसलेले असतात.

परंतु इतक्यांत आकाशांत एक लहानसा ढग दिसूं लागतो. त्याच्याच शेजारीं दुसरा एक ढग उत्पन्न होतो. इकडून एक ढग येतो, तिकडून दुसरा येतो. अशा रीतीनें जमतां जमतां अनेक ढग एकत्र होतात. रखरखीत आकाशांत जो एक ढगाचा लहानसा ठिपका दिसत होता, त्याचेंच थोडक्या वेळांत मोठें थोरलें मेघमंडळ बनतें. वारा सुटूं लागतो. विजा चमकूं लागतात, आणि मेघगर्जना होऊं लागतात. थोड्या वेळापूर्वी ज्या सूर्याकडे डोळ्याचें पातें उचलून पाहण्याचीहि कोणाची छाती नव्हती, तोच सूर्य झांकला जातो व कोठें दृष्टीसहि पडेनासा होतो,–आणि एकाएकीं गारांचा वर्षाव होऊं लागतो, आणि मुसळासारखी पावसाची धार सुरू होते. जिकडे तिकडे पाऊस पडतो, आणि सर्व जीवांना शान्तता मिळते.

वाचकहो, वरतीं वर्णन केलेला हा सृष्टिचमत्कार तुम्हीं अनेक वेळां पाहिला असेल, पण त्यांत जें एक मोठें थोरलें तत्त्व आहे तिकडे तुमचें लक्ष कधीं गेलें आहे काय? हा सृष्टिचमत्कार आपल्याला कांहींच शिकवीत नाहीं काय? कोठें कांहीं नसतांना एकाएकीं हत्तीच्या सोंडेसारखा जो पाऊस येतो, तो आपल्याला कांहींच शिकविण्याला येत नाहीं काय? आणि त्याचें जें पाणी वाहून जातें तें आपल्याला कांहीं शिकविल्यावांचून वाहून जातें काय? आकाशापासून पृथ्वीपर्यंतचा एवढा थोरला लांबचा प्रवास करून जो पर्जन्य आकाशांतून आपल्याकडे येतो, तो आपल्याला आकाशांतील कांहीं तत्त्व सांगत नाहीं काय? असें नाहीं. तो सांगतो. परंतु तो जें सांगतो, तें लक्ष लावून जे ऐकतात त्यांना मात्र तें ऐकूं येतें, व जे आपले डोळे काळजीपूर्वक उघडे ठेवतात त्यांना मात्र तें दिसतें. ज्यांच्या मनाला सूक्ष्म विचार करण्याची शक्ति आहे, त्यांच्या मनावर ह्या सृष्टिचमत्कारानें शिकविलेल्या तत्त्वाचा पूर्ण ठसा उठतो. हा अकस्मात् येणारा पर्जन्य आपल्याला हें तत्त्व शिकवितो कीं, ईश्वराची लीला अगाध आहे. तो

आपल्या मनांत हें बिंबवितो कीं, ईश्वराला कांहीं अशक्य नाहीं. मनुष्याला कांहीं गोष्टी अशक्य वाटोत, परंतु परमेश्वराच्या ठिकाणीं अशक्य अशी गोष्टच नाहीं. चोहोंकडे इतका संताप आणि प्रलय चालला असतां एका घटकेंत किंवा अर्ध्या घटकेंत पाऊस पडेल असें कोणाला वाटत असतें ? विजा कडकडतील, मेघ गडगडतील, आणि पर्जन्यधारा कोसळतील, असें कोणाला वाटत असतें ? अशा गोष्टी होतील असें मनुष्याच्या स्वप्नीं तरी आलेलें असतें काय ? त्याला सर्व अशक्यच वाटत असतें. पण मनुष्याला जें अशक्य वाटतें, तें परमेश्वर एका क्षणांत शक्य करून दाखवितो. अनंत शक्तीच्या परमेश्वराला अशक्य तें काय असणार ? कोत्या दृष्टीच्या मनुष्याला जें तें अशक्य वाटतें, परंतु सर्वशक्तिमान् परमेश्वराला अशक्य हा शब्दच माहीत नाहीं. ईश्वर सर्वज्ञ असूनहि त्याला जर कांहीं माहीत नसलें – तर तो अशक्य हा शब्द मात्र होय. सारांश, ईश्वराची लीला अगाध आहे, ह्यांत कांहीं संशय नाहीं !

आतां हें तत्त्व जर आपल्या मनावर चांगलें बिंबलेलें असेल, तर आपल्याला निराश होण्याचें कधींहि कारण नाहीं. आपल्या देशाची हल्लींची स्थिति फार वाईट झालेली आहे. तिच्यांतून निघून आपण उन्नतावस्थेला येऊं, अशी आशा बाळगण्याला आज तरी निदान कोणाला कांहीं जागा दिसत नाहीं. आपला उत्कर्ष होण्याचीं आज कोठेंच कांहीं चिन्हें दिसत नाहींत. [illegible] दुसऱ्या बाजूच्या लोट्यांप्रमाणें आमच्यांतील पाणी नाहींसें होऊन आम्ही हळूहळू अधोगतीला जात चाललों आहों. आमच्या अभ्युदयासाठीं इंग्रज लोक जिवापाड मेहनत करीत आहेत. तरी पण आमची स्थिति सुधारेल किंवा नाहीं ह्याच्याबद्दल सर्वांना जबरदस्त शंका आहे. असा प्रकार असल्यामुळें आपल्या मनांत निराशा उत्पन्न होणें अगदीं साहजिक आहे. सध्यां जर हिंदुस्थानांतील बहुतेक लोकांच्या मानसिक स्थितीचें पृथक्करण केलें, तर बहुधा सर्व ठिकाणीं नैराश्याचाच अंमल गाजत असलेला आपल्याला दिसून येईल. जेथें तेथें हातपाय मोडलेले, धैर्य खचलेलें, व कंबर बसलेली,–असाच प्रकार आढळून येतो. आपला एकहि उद्योग फलद्रूप होत नाहीं. आपल्या संस्था निर्जीव

होत चाललेल्या आहेत. आपले पुढारी [illegible] अन्नावर आपल्या मोठेपणाचा उदरनिर्वाह करीत आहेत वगैरे स्थिति पाहून आपल्या उन्नतीच्या सर्व आशा आपल्या मनाला सोडून जातात. अशा स्थितींत आपलें मन शून्य आणि भयाण होणें हें मानवी स्वभावाला अनुसरूनच आहे.

ह्या गोष्टी सर्व खऱ्या आहेत. परंतु त्यामुळें आपण आपल्या अभ्युदयाच्या बाबतींत हतवीर्य मात्र होतां कामा नये. आपल्या भावी उत्कर्षाचीं प्रत्यासन्न चिह्नें जरी आपल्याला आज स्पष्ट दिसत नाहींत, तरी त्यामुळें निराश होण्याचें कारण नाहीं. आपण सर्वांनीं या बाबतींत आपलें जें कर्तव्यकर्म आहे तें सदोदित करीत राहावें, म्हणजे आपली इच्छा परमेश्वर शेवटाला नेल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. आपली आशा परिपूर्ण होण्याचीं मानवी डोळ्यांना कांहीं चिह्नें दिसत नाहींत, म्हणून ईश्वराला तो आपला इच्छित हेतु सफल करतां यावयाचा नाहीं असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. मनुष्याच्या तर्काची मर्यादा फार आकुंचित आहे, त्याला फारच थोडें दिसतें; आणि यदाकदाचित् कांहीं दिसलें, तरी जें अगदीं थोड्या अंतरावर असेल तेवढें मात्र दिसतें. परंतु ईश्वराचें सामर्थ्य अपार आहे. मनुष्याच्या कल्पनेला त्याचें पूर्णत्वानें अवगाहन कधींहि करतां येत नाहीं. मनुष्याच्या क्षुद्र, अदूरगामी, आणि अंधप्राय तर्काला परमेश्वराच्या अघटित शक्तींपैकीं काय दिसत असतें, कीं ज्यावर सर्वथैव विश्वास ठेवून आपण आपलें मन निराशेच्या स्वाधीन करण्याला प्रवृत्त व्हावें ? आपल्या तर्काला काय बरें दिसतें आहे ? हिरण्यकशिपु आपल्या मुलाला साधु-संतांचा आणि वैष्णवभक्तांचा उच्छेद करण्याला सांगत होता, आणि तें त्यानें ऐकिलें नाहीं, तेव्हां पर्वताच्या कड्यावरून तो दैत्य आपल्या मुलाला ढकलून देत होता, समुद्रांत बुडवीत होता, हत्तीच्या पायाखालीं चिरडवीत होता, त्याच्या आईकडून त्याला विष पाजवून मृत्यूच्या घरीं पाठवीत होता. त्या वेळीं हिरण्यकशिपूचा नाश करण्यासाठीं परमेश्वर नारसिंहाचें स्वरूप धारण करण्याची तयारी करण्यांत गुंतला होता, तें मानवी तर्काला कोठें दिसलें होतें ? "तुझा देव कोठें आहे तो दाखीव, नाहीं तर या क्षणीं मी तुझा वध करतों" असें हिरण्यकशिपूनें प्रह्लादाला म्हटलें, त्या वेळीं प्रह्लाद आपल्या बापाच्या क्रोधाला बळी पडणार, असेंच सर्वांना वाटलें होतें.

आपल्या भक्ताचें संरक्षण करण्यासाठीं परमेश्वर खांबामध्यें येऊन बसला असेल, असें त्या वेळीं कोणाला तरी वाटले असेल काय? खांबांतून नारसिंहाची मूर्ति निघेल, ही गोष्ट कोणाला तरी त्याच्या पूर्वीं शक्य वाटली असेल काय? परंतु ती गोष्ट माणसांना शक्य वाटली असो किंवा नसो, परमेश्वरानें ती गोष्ट शक्य करून दाखविली. त्याचप्रमाणें द्यूतानें द्रौपदी ही कौरवांची दासी म्हणून ठरली, तेव्हां तिला सभेमध्यें आणून तिच्या अंगावरील वस्त्राचें हरण करण्याविषयीं दुर्योधनानें दुःशासनाला आज्ञा केली, त्या वेळी आतां द्रौपदी भर सभेंत विवस्त्र केली जाणार, असेंच सर्वांना वाटत होतें. मानवी तर्काची धांव ह्याच्या पलीकडे गेली नाहीं. एका वस्त्राच्या आंत दुसरें वस्त्र – अशा रीतीनें सहस्रावधि वस्त्रांचा पुरवठा भगवान् श्रीकृष्ण आपल्या बहिणीसाठीं करील असें, ही गोष्ट घडून येण्याच्या पूर्वी, कोणाच्या स्वप्नात तरी आलें होतें काय? परमेश्वर अशा रीतीनें द्रौपदीची लाज राखील, आणि तिला शत्रूपुढें उघडी पडू देणार नाहीं, ही गोष्ट मनुष्याच्या तर्काला अगम्य होती. परंतु परमेश्वरानें ती प्रत्यक्ष करून दाखविली. रावण इतका प्रबल झाला होता कीं, प्रत्यक्ष सूर्य आणि चंद्र हे त्याच्या घरीं मशालीचें काम करीत होते, आणि वायु हातांत केरसुणी घेऊन त्याच्या घरांतील केर काढीत होता. अशा रीतीनें ज्यानें आपला अंमल बसविला होता, त्याचें तें जुलुमाचें राज्य लयाला जाईल असें कोणाला तरी वाटलें होतें काय? जो रावण सर्व देवांनाहि अजिंक्य झाला होता, त्याला रानांतील माकडें आणि यःकश्चित् माणसें जिंकतील, असें कोणाला तरी वाटलें होतें काय? मनुष्याच्या अंधुक दृष्टीच्या तर्काला असेंच वाटत होतें कीं, रावणाचा हा देवादिकांवरील जुलूम जगाच्या शेवटापर्यंत असाच चालणार, व सर्व पृथ्वी त्याच्या त्रासानें गाईसारखी दीन होऊन जगाच्या शेवटापर्यंत तशाच दीन स्थितींत राहणार. पण परमेश्वराची इच्छा तशी नव्हती. मनुष्यांना ज्या गोष्टी असंभाव्य वाटत होत्या, त्या परमेश्वरानें आपल्या अलौकिक लीलेनें सिद्ध करून दाखविल्या. त्यानें रामाकडून रावणाला मारविलें आणि सर्व पृथ्वीचा भार हलका केला. येशू ख्रिस्तानें एका रक्तपितीच्या माणसाचा रोग बरा करण्याच्या पूर्वीं, किंवा दुसऱ्या दोघां आंधळ्यांची दृष्टि परत आणून देण्याच्या

पूर्वी ह्या गोष्टी शक्य आहेत असें कोणाला वाटलें होतें? जीझस् ख्राइस्टला ज्यू लोकांनीं दिलेल्या शिक्षेप्रमाणें त्याचा देहान्त झाल्यानंतर त्याचें मृत शरीर थडग्यांत घालून ठेविलें होतें, व त्यांतून त्याला बाहेर जातां येऊं नये म्हणून नीट रीतीनें दगड बसवून तें मोहोरबंद केलें होतें; व पायलेट यानें त्या ठिकाणीं आपले पाहरेकरीहि पाहरा करण्यासाठीं रात्रंदिवस बसविले होते. अशा स्थितींतून जीझस् ख्राइस्टला आपल्या थडग्यांतून बाहेर पडतां येईल असें त्या वेळच्या त्या फॅरिसीजना वाटलें होतें काय? परंतु ईश्वर हा चमत्काररत्नांचा समुद्र आहे. जो ब्रह्मांड व्यापून राहतो, तो आधीं थडग्यामध्यें कोंडून कसा राहणार? आणि राहिलाच तर त्याला बाहेर येणें अशक्य आहे काय? परमेश्वराला काय अशक्य आहे? हिंदुस्थानांत १२०० वर्षांच्या पूर्वी कुमारिल आदिकरून मोठमोठ्या पंडितांनीं कर्ममार्गाचें इतकें स्तोम माजविलें होतें, आणि शाक्यमुनीच्या अनुयायांनीं बौद्ध धर्माचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर इतक्या झपाट्यानें चालविलेला होता, कीं ज्ञानमार्ग आणि वैदिक धर्म यांचें आर्यभूमीवर आतां नांवहि उरत नाहीं अशी त्या वेळीं स्थिति येऊन पोंचली होती. जो उठला तो वैदिक धर्माचा तिरस्कार करून गौतम बुद्धाच्या धर्माचा अंगीकार करीत होता. अशा वेळीं धर्मान्तराची प्रचंड लाट फोडून, तिचे बारीक बारीक कण करून, ते चारी दिशांमध्यें फेकून देणारा एखाद्या पर्वतासारखा कोणी महात्मा उत्पन्न होईल, असें त्या वेळच्या निराश झालेल्या वैदिक धर्माभिमान्यांना वाटलें होतें काय? श्रीमत् शंकराचार्य, त्यांचें अलौकिक बुद्धिसामर्थ्य, त्यांची वादिमतखंडनाची हातोटी, त्यांनीं केलेलें धर्मसंस्थापन, त्यांनीं संपादिलेला दिग्विजय, त्यांनीं नाचविलेले विजयध्वज आणि गाजविलेले कीर्तिडिंडिम – ह्यांची त्यांच्या आधींच्या लोकांना काय कल्पना होती? भविष्यत् काळाच्या पोटांत असलेल्या ह्या असंख्य गोष्टी त्या वेळच्या लोकांना कोठें दिसत होत्या? पण त्यांना त्या दिसत नव्हत्या म्हणून त्या घडून आल्या नाहींत असें नाहीं. परमेश्वरानें – ज्याला सर्वांच्या योगक्षेमाची काळजी वाहावयाची असते, त्या परमेश्वरानें त्या सर्व गोष्टी घडवून आणिल्या.

हें सर्व जर आपण पाहतों, तर मग आपल्यालाच निराश होण्याचें काय

बरें कारण आहे ? प्रथमारंभीं दिलेल्या अभंगांत तुकारामांनीं वर्णन केल्या-प्रमाणें ज्यानें पक्षी आणि हरिण यांना पारध्यांच्या हातून सोडविलें, ज्यानें प्रह्लादाला अनेक संकटांतून वांचविलें, ज्यानें द्रौपदीची लज्जा रक्षण केली, ज्यानें गाईप्रमाणें दीन झालेल्या पृथ्वीला रावणाच्या जुलमांतून मुक्त केलें, ज्यानें येशू ख्रिस्ताला मरणानंतर तिसऱ्या दिवशीं आपल्या मोहोरबंद थडग्यां-तून बाहेर पडण्याचें सामर्थ्य दिलें, आणि ज्यानें शंकराचार्यांच्या मिषानें आर्य धर्माचें आर्य भूमंडळामध्यें फिरून संस्थापन केलें, तो परमेश्वर आपल्या-लाहि आपल्या अवनतावस्थेमधून बाहेर काढणार नाहीं काय ? एखादा राजा चांगला असतो; त्याच्या वेळीं चांगलीं कृत्यें होतात. परंतु त्याच्या मागून वाईट राजा आला असतां पूर्वींच्यासारखीं सत्कृत्यें त्याच्या वेळीं होत नाहींत. अशासारखी देवाची गोष्ट नाहीं. प्रह्लादाच्या, द्रौपदीच्या, रावणाच्या, येशूच्या किंवा शंकराचार्यांच्या वेळीं जो दीनांचा कनवाळु परमेश्वर होता तोच हल्लींहि स्वर्गांतील सिंहासनावर विराजमान आहे. इतकेंच नव्हे तर त्याच्यापुढेंहि जे कोणी लोक अवनतीला जाऊन संकटांत पडतील, त्यांना त्यांतून वर काढण्यासाठीं तो परमेश्वर अनंत काळपर्यंत तेथें बसलेला असेल. तर मग आपल्याला निराश होण्याचें काय बरें कारण आहे ? आपल्या भावी उन्नतीचीं चिन्हें दिसत नाहींत. परंतु परमेश्वराच्या घरी कदाचित् आपल्याहि उन्नतीची तयारी परिपूर्ण होऊन राहिली असेल येत्या पावसाळ्यांत [illegible] रोपें उगवतील, त्यांपैकीं कोण-कोणाचीं पुढें मोठीं झाडें होतील व त्यांपैकीं आपल्या छायेनें संतप्त जनांना कोण संतोषित करतील, आणि आपल्या [illegible]नें आश्रित जानांना कोण चिरडून टाकतील, त्याच्याबद्दल आपल्याला आज कांहीं माहिती नाहीं; परंतु परमेश्वराच्या घरीं ह्या सर्व गोष्टी सिद्धवत् आहेत. त्या भावी मोटमोठ्या वृक्षांचीं बीजें जमिनीवर पडलेलीं आहेत, व त्यांच्या उपाधिभूत वस्तु त्यांच्या सन्निध येऊन पडलेल्या आहेत. ही जशी वृक्षांची गोष्ट आहे, तशीच ती आपल्या भावी उन्नतीचीहि आहे.

आपण उन्नतावस्थेला येणार हें खास. आपल्या राजकीय, सामाजिक आणि धार्मिक उत्कर्षासाठीं आपलें इंग्रज सरकार आणि दुसरे कित्येक इंग्लिश लोकांपैकीं महात्मे प्रयत्न करीत आहेत. त्यांचे ते प्रयत्न कधींहि

व्यर्थ जाणार नाहींत. त्यांना लवकरच फळें येतील. इंग्रजांचे आजपर्यंत बहुतेक प्रयत्न सफल झालेले आपण पाहिले आहेत. मग आपल्या उन्नती-बद्दलच्याच मात्र त्यांच्या प्रयत्नांना वांझपणा काय म्हणून यावा ? आपण हिंदुस्थानांतील लोक मोठे होणार याबद्दल संशयच नाहीं. वाट चालत असतां आपला एखादा सोबती पुढें जाऊन बसतो, आणि आपली वाट पाहत असतो, याप्रमाणें आपला अभ्युदय हा आपल्या प्रगतीच्या मार्गांत आपली वाट पाहत बसलेला आहे. तेव्हां ही वाट चालतां चालतां तो आपल्याला केव्हां तरी भेटणार हें खास. सौख्य, संपत्ति, उत्कर्ष, विद्या, शौर्य, धैर्य, साहस, सत्यप्रियता, आरोग्य, दीर्घायुष्य, अप्रतिहत तेजस्विता इत्यादि इहलोकींच्या असंख्य संस्पृहणीय वस्तु आपल्यासमोर अंतरिक्षा-मध्यें अदृश्य रीतीनें आपल्यासाठीं परिणत होऊन बसल्या आहेत. जे आपण ह्या आर्यभूमीच्या उदरांत जन्माला आलों आहों त्या आपल्याला खात्रीनें पुढें सुख आहे. भविष्यत् काल हा आपला आहे. त्यांत आपण जसें सत्यधर्मानें वागूं, त्याप्रमाणें आपलें सुख तेथें लिहून ठेवलेलें आहे. आपण जर गुडघ्यांत मान घालून निराशेचे सुस्कारे टाकीत बसलों, तर त्यापासून आपण आपलें काय हित साधून घेणार आहों ? निराशा म्हणजे दुर्बलत्व होय. प्रत्येक सुस्काऱ्याबरोबर आपण आपली कर्तृत्वशक्ति आपल्या शरीरांतून बाहेर घालवीत असतों. निराशा ही मनुष्याचे असलेले हातपाय मोडते. परंतु आशा ही परमानंद माधवाच्या कृपेप्रमाणें लंगड्या माणसालाहि गिरींचें उल्लंघन करण्याला प्रवृत्त करते. आशा हीच मनुष्याची शक्ति आहे, आणि आशा हाच मनुष्याचा जोर आहे. ज्याच्या मनाला आशा नाहीं, त्याला भविष्यकाळ असून नसून सारखाच. यासाठीं आपण आशा धरली पाहिजे; व आपलें जें कर्तव्यकर्म आहे तें आपण सतत करीत राहिलें पाहिजे, म्हणजे आपला उत्कर्ष आपल्यापासून फारसा लांब आहे असें नाहीं. अशक्यतेच्या कल्पनेनें आपलें मन निराशेच्या स्वाधीन होऊ न देतां भावी उत्कर्षाच्या आशांनीं आणि महत्त्वाकांक्षांनीं आपलें मन पूर्णपणें भरून ठेवून ईश्वराला अनन्यभावानें शरण गेलें पाहिजे, म्हणजे तो सर्व कांहीं गोष्टी, मग त्या आपल्याला कितीहि अशक्य वाटत असोत, घडवून आणील यांत शंका नाहीं. कारण ईश्वराची लीला अगाध आहे !

# ५. धर्मकल्पनांचा परिणाम

( काळ : अग्रलेख, ता. २५-४-१९०२ )

## " महासभेच्या पुरस्कर्त्यांना आधार ! "

विचाराचा आचारावर पुष्कळ परिणाम होतो, ही गोष्ट सर्वसम्मत आहे. विचार कोणतीहि गोष्ट स्वतः करीत नाहीं, पण दुसऱ्याकडून करवितो. विचार हा आचाराचा जनक आहे, आणि आचार हा विचाराचा पुत्र होय. विचार असेल तर आचार होईल किंवा न होईल, पण विचारच नसेल तर आचार उत्पन्न होऊं शकणार नाहीं, हें खास. कारण असेल तर कार्य उत्पन्न होईल किंवा न होईल, परंतु कारणच नसेल तर कार्य कोठून उत्पन्न होणार ? अशा प्रकारचा संबंध विचार आणि आचार यांच्यामध्यें आहे. मनुष्याची या जगांतील जीवयात्रा सुखावह होण्याकरितां त्याला चांगल्या आचारांची अत्यंत आवश्यकता असते. परंतु चांगले आचार चांगल्या विचारांवांचून कसे उत्पन्न होणार ? ह्याकरितां मनुष्याला चांगल्या विचारांची आकांक्षा उत्पन्न झाली. पण हे चांगले विचार तरी वाटेवर पडले आहेत असें नाहीं. प्रत्येक मनुष्याला सुख पाहिजे असतें, परंतु तें सुख उत्पन्न करण्याला मूळ कारण जे चांगले विचार ते प्रत्येक मनुष्याच्या डोक्यामध्यें असतातच असें नाहीं. यासाठीं मनुष्याला दुसऱ्याच्या चांगल्या विचारांकडे वळणें भाग पडलें, व त्याला स्वतःच्या धर्मामध्यें असल्या चांगल्या विचारांचा खजिना एकत्र सांपडला. धर्म या शब्दाचे कोणी कांहीं अर्थ करोत, परंतु सामान्य दृष्ट्या पाहतां धर्म म्हणजे चांगल्या विचारांचा समुच्चय. आतां ह्या विचारांपैकीं कांहीं विचार पारलौकिक असतात आणि कांहीं ऐहिक असतात. पण ते कसलेहि असले तरी ते इतके उत्कृष्ट असतात कीं, तसे विचार एकाच काळीं एकाच व्यक्तीच्या डोक्यामध्यें येणें कधींहि संभवनीय नसतें, आणि म्हणूनच असले उत्तम विचार ज्यांमध्यें संकलित केलेले असतात ते धर्म ईश्वरप्रणीत आहेत असें स्वाभाविकपणेंच लोक मानूं लागले. पण कित्येक लोक असे दुराग्रही असतात

कीं, त्यांना धर्म हे ईश्वरप्रणीत आहेत ही कल्पना कधींहि पसंत होत नाहीं. त्या धर्मांचें कर्तृत्व ईश्वरापासून हिसकावून घेऊन अल्पज्ञ मनुष्यांच्या माथीं मारण्याला ते सदैव उत्सुक असतात. त्यांना ईश्वरानें वेद केलेले खपत नाहींत; किंवा देवदूतानें महंमदाच्या कानामध्यें देवाची इच्छा काय आहे ती येऊन सांगितली हें मत पसंत पडत नाहीं. वेद हे विश्वामित्र, वसिष्ठ या माणसांचे; बायबल हें जीझस् ख्राइस्ट या माणसाचें, आणि कुराण हें महंमद या माणसाचें, असें मानण्यांतच त्यांना फायदा आहे असें वाटतें. ह्या वर्गांतील लोक आपापल्या धर्मांतील आज्ञा पाळण्यांत कांहीं कसूर करतात असें नाहीं. परंतु ह्या देवाच्या म्हणून पाळण्यांत त्यांना शरम वाटते, आणि मनुष्याच्या म्हणून पाळण्यांत भूषण वाटतें. शहाण्याचे चाकर व्हावें, पण वेड्याचे धनी होऊं नये, अशी एक लौकिक म्हण आहे. पण ह्या मताच्या लोकांना सर्वज्ञ परमेश्वराचें आज्ञाकरत्व पत्करण्यापेक्षां अल्पज्ञ मनुष्याचें–स्वामित्व नव्हे तर–आज्ञाकरत्वच पत्करण्यामध्यें मोठा आनंद वाटतो. पण हे धर्मप्रचारक जरी मनुष्यच होते असें मानिलें, तरी ते फार अलौकिक मनुष्य होते याबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं. ते प्रत्यक्ष ईश्वर नसले तरी ते ईश्वरासारखेच होते, ते ईश्वराचे अंश होते, किंवा ते ईश्वराच्या कृपेला पूर्णपणें पात्र झालेले होते, याबद्दल कोणामध्येंहि फारसा मतभेद नाहीं. कारण, धर्मप्रचाराचें काम हें लहानसान नव्हे, तें पाहिजे त्या क्षुद्र मनुष्याच्या हातून होण्यासारखें नाहीं. तसें असतें तर, प्रार्थनासमाजाचादेखील एव्हांना एक धर्म बनून गेला असता. पण ह्या गोष्टी भलत्यांच्याच हातून होणें शक्य नाहीं. असो. अशा रीतीनें प्रत्यक्ष परमेश्वराच्या हातून किंवा त्याच्या कृपाकटाक्षानें जे धर्म अस्तित्वांत आलेले आहेत त्यांपैकीं हिंदु धर्म, बौद्ध धर्म, ख्रिस्ती धर्म व महंमदी धर्म प्रमुख होत.

हे धर्म म्हणजे चांगल्या विचारांचे निरनिराळे खजिने होत, हें वर सांगितलेंच आहे. जे विचार चांगले ते सदोदित चांगलेच. तरी पण प्रसंग-विशेषाच्या अनुरोधानें कित्येक धर्मांमध्यें चांगल्या विचारांनाच प्राधान्य दिलेलें असतें, व त्याचा परिणाम त्या धर्माच्या अनुयायांवर केव्हां ना केव्हां तरी झाल्यावांचून राहत नाहीं. धर्म हे ईश्वरप्रणीत असोत किंवा मनुष्यकर्तृक असोत, त्यांच्यामध्यें जे विचार एकत्र केलेले असतात त्यांचा त्या त्या

धर्मांतील लोकांवर बरावाईट परिणाम केव्हां तरी होतोच. या म्हणण्याच्या [illegible] बौद्ध धर्माचें उदाहरण फार चांगलें आहे. हिंदु धर्मामध्यें एके वेळीं यज्ञयागादिकांचें फार प्राबल्य झालेलें होतें, व तन्निमित्त अर्थात् यागीय पशुहिंसाहि फार होऊं लागली होती. ही धर्माची दोरी एकाच दिशेला अतिशय ओढली जाऊं लागल्यामुळें ती दुसऱ्या दिशेकडे ओढली जाण्याबद्दल इच्छा उत्पन्न होऊं लागल्या, आणि प्रयत्न अस्तित्वांत येण्याला सुरुवात झाली. त्या इच्छा आणि ते प्रयत्न ह्यांनाच कालगतीनें बौद्ध धर्म हें स्वरूप आलें. पूर्वी ( यज्ञांतील पशूंची ) हिंसा हाच परम धर्म होय, अशी समजूत होती. ह्याच्या उलट गौतम बुद्धानें ' अहिंसा परमो धर्मः । ' हें मत प्रचारांत आणलें, व तेव्हांपासून बौद्ध धर्मानुयायी लोकांच्या मनावर ह्या अहिंसा मताचा पगडा फारच जबरदस्त रीतीनें बसू लागला. अहिंसा हा एक चांगला विचार, व बौद्ध धर्माच्या खजिन्यामध्यें ह्या अहिंसा मतरूपी हिऱ्या-माणकांचीच विशेष भरती. पण ह्या विचाराचा परिणाम तद्धर्मानुयायी लोकांच्या आचारावर फारच विलक्षण झाला. धर्म हा इहलोकींच्या आणि परलोकींच्या अशा दोन्ही ठिकाणच्या सुखाकरितां आहे. त्यापासून येथेंहि सुख झालें पाहिजे, आणि परलोकींहि सुख मिळालें पाहिजे. अशीच धर्माची योजना असावी, आणि असतेहि. पण बौद्ध धर्मांत अहिंसेवर विशेष कटाक्ष असल्यामुळें या धर्माच्या अनुयायी लोकांच्या ऐहिक सुखामध्यें कधीं कधीं व्यत्यय येण्यासारखा असतो. अहिंसेचें मत एका दृष्टीनें फारच उत्कृष्ट. परंतु आपल्या सभोंवतालचें सर्व जग अहिंसेमध्यें पूर्णपणें निमग्न झालें असतां आपण अहिंसेच्या मताला चिकटून राहण्यांत फारसा अर्थ आहे असें नाहीं. दुसऱ्या लोकांनीं आपली हिंसा करून आपला प्राण घेतला तर, मग आपण त्या अहिंसेच्या उत्कृष्ट मतापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचा अनुभव केव्हां घेणार ? परंतु या विचारांना गौणत्व देऊन बौद्ध लोकांनीं अहिंसेवरच विशेष भिस्त ठेविली, व ह्याचा परिणाम त्यांच्या आचारावर घडून आला. ' ईस्ट अँड वेस्ट ' च्या चालू महिन्याच्या अंकामध्यें एका इंग्रजी ग्रंथकाराचा एक उतारा दिलेला आहे. त्यामध्यें ह्या अहिंसामताचा बौद्ध लोकांच्या युद्धावर कसा परिणाम होतो ह्याचें मोठें मार्मिक वर्णन

दिलेलें आहे. ब्रह्मदेशांतील लोक हे बौद्धधर्मी आहेत; हें सर्वांना माहीत आहेच. त्यांच्या आणि इंग्लिशांच्या अलीकडे ज्या कांहीं लढाया झाल्या, त्यांमध्यें बौद्ध लोकांची मनोवृत्ति कशी होती ह्याच्याबद्दलचें चित्र सदर उताऱ्यामध्यें काढलेलें आहे. प्रसंग पडला म्हणून बौद्ध लोक लढत होते. वास्तविक तसें करण्याविषयीं त्यांना त्यांच्या धर्माची अनुज्ञा नव्हती. पण ह्या दोन स्थितींमध्यें किती तरी अंतर आहे! ईश्वराच्या आज्ञेला अनुसरून लढणें आणि मनुष्याच्या आवश्यकतेसाठीं लढणें ह्यांमध्यें फारच तफावत आहे. पण बौद्ध लोकांचा धर्म त्यांना लढा असें सांगत नाहीं. इतकेंच नव्हे, तर उलट लढूं नका असें सांगत असतो. हिंसा करणें हें महत् पातक आहे, आणि लढाई म्हणजे हिंसेशिवाय दुसरें कांहींच नाहीं, अशी बौद्ध मताची स्थिति असल्यामुळें बुद्धिस्ट लोकांना लढाईच्या वेळीं जोर कोठून येणार? त्यांना भयंकर रणकंदन करण्याला उत्तेजन कसें मिळणार? आणि घनघोर संग्राम करण्याची स्फूर्ति त्यांच्या मनामध्यें कशी प्रादुर्भूत होणार? बौद्ध शिपाई लढाईला निघाला म्हणजे आपण एक भयंकर पातक करण्याला निघत आहों, अशी त्याची भावना होते आणि अशा भावनेच्या योद्ध्याकडून सफळ युद्ध तें काय होणार! तो शत्रूच्या सैन्यावर छापा घालण्यासाठीं रात्रीचा कोठें दडून बसला असतां त्याला आकाशांत जी नक्षत्रें दिसतील तीं आपलें अघोर कर्म पाहात आहेत, त्यांच्या समक्ष मीं हें हिंसेचें काम कसें करूं, असा विचार मनामध्यें येऊन त्याचे हातपाय लटपट कांपूं लागले पाहिजेत. अशी त्याची स्थिति झाली म्हणजे तो आयताच शत्रूच्या हातीं सांपडणार. तो कोठेंहि पाहो, त्याला उत्तेजन म्हणून कोठेंच मिळावयाचें नाहीं. सूर्य, चंद्र, आकाश, वायु हीं सर्व 'तूं महापातक करीत आहेस', असेंच त्याला सांगणार. अशा रीतीनें बौद्ध लोकांचा धर्मच त्यांचा पराजय करतो; त्यांचें अहिंसेचें शास्त्रच त्यांचीं शस्त्रें बोथट करतें; आणि त्यांचा स्वधर्माभिमानच त्यांचे हातपाय बांधून त्यांना शत्रूच्या हवालीं करतो. असल्या धर्मामध्यें कांहीं चांगल्या गोष्टी असतील, पण सध्यांच्या काळांत असला धर्म श्रेयस्कर नाहीं. असला धर्म काय कामाचा? ज्याच्यापासून लोकांना इहलोकीं शत्रूपासून पराभव प्राप्त झाला पाहिजे, तो धर्म काय कामाचा? धर्मांतील विचार असे

असले पाहिजेत. आपला अभ्युदय करणारा म्हणून आपण ज्याला चिकटावें, परंतु जो आपले हातपाय बांधून आपल्याला शत्रूच्या स्वाधीन करतो,–तो धर्म नव्हे; तर आपला एक विश्वासघात करणारा हितशत्रूच होय. मनुष्याला गुलाम बनविणें हें धर्माचें कर्तव्य नव्हे. धर्म ही संस्था गुलामगिरीसाठीं नाहीं. मोक्ष हें धर्माचें अंतिम फल होय, आणि मोक्ष म्हणजे स्वतंत्रताच. मायेच्या बंधनापासून मनुष्याची सुटका करणे, हें धर्माचें इष्ट कार्य होय. पण ज्याच्यामध्यें यःकश्चित् गुलामगिरीच्या बंधनापासून मनुष्याची सुटका करण्याचें सामर्थ्य नाहीं, तो धर्म त्याची मायेच्या बंधनापासून सुटका काय करणार? जो इहलोकीं आपल्या अनुयायाला शत्रूच्या बंधनांमध्यें सांपडून देण्याची तयारी करून देतो तो धर्म परलोकीं त्याच्या आत्म्याला निर्वाणपद काय देणार! इहलोकींचीं सुखें पारलौकिक दृष्टया थोडींशीं गौण खरीं; परंतु म्हणून धर्मानें ऐहिक सुखाकडे अगदींच दुर्लक्ष करावें असें नाहीं. आध्यात्मिक उन्नतीप्रमाणें आपल्या अनुयायांची आधिभौतिक उन्नतीहि त्याच्या धर्मानें घडवून आणिली पाहिजे. विजयश्रीच्या मंगल मालिकेशिवाय धर्माचाहि कंठ ओका दिसतो; आणि शत्रूच्या मस्तकावर उभें राहिल्याशिवाय धर्म त्यांतील कित्येक मतें कितीहि उच्च असलीं तरी) ठेंगणाच दिसतो. ह्याकरितां ज्याच्या योगानें ऐहिक श्रेष्ठत्व-सुद्धां प्राप्त होईल अशींच मतें प्रत्येक धर्मामध्यें प्रतिपादन केलेलीं असावींत, व तीं बहुतेक धर्मांमधून तशीं असतातच.

ह्या बाबतींतच हिंदु धर्माकडे आपण पाहिलें तर, त्याची योजना वरील धोरणावरच केलेली आहे, असें दिसून येतें. बौद्ध धर्माप्रमाणें हिंदु धर्मामध्यें अहिंसेचा पगडा लोकांच्या मनावर फाजील बसलेला नाहीं. योग्य प्रसंग येईल तेव्हा युद्ध करण्याविषयीं हिंदु धर्माची अनुज्ञाच आहे; इतकेंच नव्हे, तर उलट उत्तेजनहि आहे. बौद्ध धर्मांतल्याप्रमाणें ह्या धर्मामध्यें शत्रूवर चालून जाणाऱ्या योद्धयाचे हातपाय मोडलेले नाहींत. पण ह्यावरून हिंदूंच्या धर्मशास्त्रामध्यें प्रत्येक युद्धाला उत्तेजनच दिलेलें आहे असें मात्र नाहीं. अन्यायमूलक युद्धाची निंदाच केलेली आहे. असल्या युद्धाला हिंदु धर्मामध्यें खून आणि चोरी हींच नांवें दिलेलीं आहेत, व ह्या धर्माप्रमाणें असलीं युद्धें करणारे म्हणजे खुनी आणि दरवडेखोरच होत. म्हणून अन्याय्य युद्धांची

गर्हणा करून न्यायमूलक युद्धांचीच प्रशंसा हिंदु धर्मानें केलेली आहे. व त्या युद्धामधील योद्धयांचें गुणवर्णन केलेलें आहे. हिंदुस्थानांतील लढाई करणाऱ्या लोकांना क्षत्रिय हें नांव देण्यांत येत असतें त्या क्षत्रियांचा महिमा हिंदु धर्मानें फारच मोठा वर्णन केलेला आहे बौद्ध धर्मी योद्धा लढाई करूं लागला म्हणजे आपण हिंसा करीत आहों, म्हणून आपण नरकांत जाऊं, अशी त्याला भीति वाटत असते. परंतु हिंदु धर्मांतील योद्धयाची तशी स्थिति नसते. त्याला त्याच्या धर्मानें सांगितलें आहे कीं, तूं रणामध्यें शत्रूनें मारता मारतां मरण पावलास, तर तुला स्वर्गप्राप्ति होईल. ह्या शास्त्राच्या अनुशासनानें त्याला अधिक जोर येतो. तो आपलीं पूर्वींचीं पातकें विसरतो. पूर्वीं त्यानें कांहींहि पातकें केलीं असलीं तरी त्या सर्वांचें क्षालन होऊन, आतां आपण स्वर्गलोकीं जाणार, अशा विचारांनीं त्याचें मन उल्लसित झालेलें असतें. बौद्ध धर्मी योद्धा आपल्या [illegible] नरकाकडे भीत भीत पहात आणि मंद रीतीनें एकेक पाऊल टाकीत रणांगणाकडे कूच करीत असतो. परंतु हिंदु योद्धा आकाशांतील स्वर्गसुखाकडे पाहून आनंदानें शत्रूवर धांवून जातो. तो लढाईला गेला म्हणजे त्याला आकाशाचें स्वरूप अगदीं बदलून गेलेलें दिसूं लागतें. अनेक तपश्चर्या करणारांनादेखील जें दार उघडत नाहीं, तें स्वर्गाचें द्वार आपल्यासाठीं खुलें झालेलें त्याला दिसतें. इंद्राचें नंदनवन आणि त्याचें उच्च सिंहासन हीं त्याला आकाशामध्यें दिसूं लागतात. तो विजय पावला, तर त्याच्या विजयासाठीं दुंदुभि वाजविण्याकरितां आणि त्याच्यावर पुष्पवृष्टि करण्याकरितां जमलेल्या यक्ष, गंधर्व, किन्नर, सिद्ध आणि देव त्यांच्या विमानांनीं सर्व आकाश व्याप्त झालेलें त्याला दिसतें. आणि तो जर धारातीर्थीं मरण पावला तर मंदार पुष्पांच्या माळा हातांत घेऊन त्याला वरण्याकरितां अहमहमिकेनें पुढें सरसावणाऱ्या देवांगनांची सर्व आकाशभर दाटी झालेली त्याला दिसूं लागते. बौद्धधर्मी योद्धयाला ह्यांपैकीं काय आनंद आहे ? किंवा काय उत्तेजन आहे ? त्याच्यावर पुष्पवृष्टि करण्याकरितां आकाशांत कोणी देव येत नाहींत, किंवा त्याला माळ घालण्याकरितां कोणी देवांगना येत नाहींत. तो अतिशय पवित्र हेतूसाठीं लढत असला, तो आपल्या देशासाठीं, आपल्या स्वतंत्रतेसाठीं, आपल्या धर्मासाठीं, आपल्या राजासाठीं, आपल्या बायकामुलांसाठीं, किंवा आपल्या

जीवितासाठीं लढत असला, तरी त्याच्या डोक्यावरील आकाश त्याच्याकडे क्रुद्ध दृष्टीनेंच पाहत असणार, व त्याच्या डोक्यावरील नक्षत्रें त्याला आगीच्या गोळ्याप्रमाणेंच भासणार. त्या बिचाऱ्याचें अभिनंदन करण्याला कोणीच नाही. परंतु हिंदुधर्मी शिपायाचें तसें नाहीं. युद्धप्रसंगीं तो ज्या ज्या वस्तूकडे पाहील ती ती वस्तु त्याचें अभिनंदनच करीत असते. आपल्या प्राणावर उदार होऊन लढणाऱ्या क्षत्रियाला हिंदु धर्मशास्त्रानें फारच मोठें महत्त्व दिलेलें आहे. जो युद्धामध्यें आपला देह खर्चीं घालतो त्यानें मोठा यज्ञ केला असें शास्त्र मानतें. आपण शत्रूवर बाण टाकीत आहों आणि दुसऱ्याचे आलेले बाण सहन करीत आहों, अशा स्थितींत असलेला जो क्षत्रिय — त्याच्यापेक्षां पृथ्वीच्या पाठीवर दुसरा श्रेष्ठ कोणीच नाहीं असें देव मानतात.

तस्य शस्त्राणि यावन्ति त्वचं भिंदन्ति संयुगे ।
तावतः सोऽश्नुते लोकान्सर्वकामदुहोऽक्षयान् ॥
यदस्य रुधिरं गात्रादाहवे संप्रवर्तते ।
सहते नैव पापेन सर्वपापैः प्रमुच्यते ॥
यानि दुःखानि सहते क्षत्रियो युधि तापितः
तेन तेन तपो भूय इति धर्मविदो विदुः ॥

क्षत्रियांच्या अंगाला जितक्या जखमा लागतील तितके स्वर्गांतील निरनिराळे लोक त्याला अनुभवायला मिळतात. त्याच्या अंगांतून लढाई-मध्यें जें रक्त वाहतें त्याच्या योगानें त्याचीं सर्व पापें धुवून जातात, व तो युद्धामध्यें जें दुःख सहन करतो तीच त्याची तपश्चर्या होय असें धर्मवेत्ते लोक म्हणतात.

अधर्मः क्षत्रियस्यैष यच्छय्यामरणं भवेत् ।
विसृजन् श्लेष्ममूत्राणि कृपणं परिदेवयन् ॥
अविक्षतेन देहेन प्रलयं योऽधिगच्छति ।
क्षत्रियो नास्य तत्कर्म प्रशंसन्ति पुराविदः ॥
न गृहे मरणं तात क्षत्रियाणां प्रशस्यते ॥

क्षत्रियानें अंथरुणावर पडून मलमूत्रोत्सर्ग करीत मरूं नये. शरीराला जखम लागल्यावांचून जर क्षत्रियाचा देह नाश पावला तर तें त्या क्षत्रियाचें कृत्य स्तुतीला कधींहि पात्र होत नाहीं, इत्यादि वचनांनीं क्षात्रकर्म न करणाऱ्या क्षत्रियाची शास्त्रानें निर्भर्त्सनाच केलेली आहे, व

**सर्वोपायै रणमुखमातिष्ठंस्त्यक्तजीवितः ।**
**प्राप्नोतींद्रस्य सालोक्यं शूरः पृष्ठमदर्शयन् ॥**

इत्यादि वचनांनीं रणामध्यें प्राण देणाऱ्या क्षत्रियाला इंद्रलोकाची प्राप्ति होते, म्हणून शास्त्रांनीं फल सांगितलें आहे. अशा रीतीनें क्षात्रकर्म करणाराला उत्तेजन देण्याकडे आणि त्याचें अभिनंदन करण्याकडे हिंदु धर्माची प्रवृत्ति आहे, त्याला हतवीर्य करण्याकडे नाही, हें उघड दिसतें. मरण ही गोष्ट सदा सर्वकाळ वाईट, ती गोष्ट अशुभ. परंतु क्षात्रकर्मीयांच्या मरणामध्यें शास्त्रकारांनीं अशुभ असें कांहींच मानलेलें नाहीं.

**आहवे तु हतं शूरं न शोचेत कथं च न ।**
**अशोच्यो हि हतः शूरः स्वर्गलोके महीयते ॥**
**न ह्यन्नं नोदकं तस्य न स्नानं नाप्यशोचकम् ।**

अवान्तर कोणी क्षुद्र प्राणी मरण पावला तर त्याच्यासाठीं स्नान करणें, त्यांचें सुतक धरणें, त्याला तिलांजलि देणें आणि पिंड अर्पण करणें इत्यादि क्रिया शास्त्रानें सांगितल्या आहेत. परंतु जो रणामध्यें मरण पावतो तो असल्या सगळ्या क्रियांच्या वरचा होय. त्याला उत्तम गति देण्याला तिळाच्या पाण्याची आणि भाताच्या मुटकुळ्याची अपेक्षा नाहीं. त्याच्यासाठीं कोणी रडावयाला नको. कारण तो आपल्या कृतीनें उत्तम लोकांत जाऊन पोंचलेला असतो. ज्याची इंद्रलोकामध्यें पूजा चाललेली असते, त्याच्यासाठीं मृत्युलोकामध्यें आक्रोश काय म्हणून असावा ? त्याच्याबद्दल आनंदच वाटला पाहिजे. अशा प्रकारानें रणामध्यें क्षात्रधर्म करण्याबद्दल अन्यत्र विहित अशा और्ध्वदैहिक संस्कारांचा निषेध करूनहि शास्त्रानें असल्या पुरुषांचें अत्यंत गौरव केलेलें आहे असें दिसतें. बौद्धमतानुयायी योद्ध्याला ह्यांपैकीं कांहींच गौरव नाहीं. तो रात्रीं आकाशांतील नक्षत्राकडे पाहून युद्ध करते वेळीं भीत असतो, आणि

माझ्या हिंसेच्या पातकाबद्दल हा सूर्य मला जाळून भस्म करील कीं काय, अशी त्याला दिवसास प्रतिक्षणीं दहशत वाटत असते; परंतु हिंदु धर्मांतील क्षत्रिय त्याच सूर्याकडे अगदीं निराळ्या दृष्टीनें पाहत असतो.

द्वाविमौ पुरुषो लोके सूर्यमण्डलभेदिनौ।
परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥

हें शास्त्रवचन त्याला माहीत असतें. हें त्याच्या अंतःकरणांत खेळत असतें. हें त्याची महत्त्वाकांक्षा वाढवीत असतें आणि त्याला रणमध्यमार्गी ओढून नेत असतें. आपण पराक्रम केला तर आपली योग्यता काय आहे, हें या शास्त्रवचनानें त्याला सांगून ठेविलेलें असतें. त्यामुळें तो आकाशांतील सूर्याकडे मोठ्या उत्कंठेनें आणि अभ्यसूयेनें पाहत असतो. स्वर्गलोकांत जाण्याचे शास्त्रकारांनीं दोन मार्ग सांगितले आहेत. ते शुक्ल आणि कृष्ण, अर्चिमार्ग आणि धूममार्ग इत्यादि नांवांनीं उपनिषद् ग्रंथांतून प्रसिद्ध आहेत. परंतु रणामध्यें मरण पावणाऱ्यांचा मार्ग त्याहूनहि श्रेष्ठ असा वर्णिलेला आहे. धूममार्गापेक्षां अर्चिमार्ग श्रेष्ठ, परंतु त्या मार्गांतील ज्या पायऱ्या आहेत त्यांमधून जाण्याचीहि क्षत्रियाला आवश्यकता ठेवलेली नाहीं. हा एकदम सूर्यमंडळाचा भेद करून वर जातो. योगाध्ययन करणारा संन्याशी आणि रणामध्यें सन्मुख मारला गेलेला योद्धा हेच दोघे काय ते सूर्यमंडळाचा भेद करून जाऊं शकतात. इतकी आपल्या शास्त्रानें योद्ध्याची महती वर्णन केली आहे. असल्या भावी स्वर्गप्राप्तीच्या कल्पनांनीं प्रेरित झालेल्या योद्ध्याच्या हातून काय होणार नाहीं ? मी सूर्यमंडळ भेदून जाईन हा विचार ज्याच्या डोक्यांत घोळत आहे – त्याला शत्रूचें डोकें फोडणें फारसें अशक्य आहे काय ? असले उदात्त हेतु आणि उदात्त फळें आपल्या शास्त्रकारांनीं आपल्या योद्ध्यांच्यापुढें ठेविलीं आहेत. त्यामुळें आजपर्यंत ह्या भरतभूमीच्या इतिहासामध्यें लोकांच्या हातून शूरत्वाचीं अनेक कृत्यें पूर्वीं झालेलीं आहेत, व पुढेंहि होण्याचा संभव आहे. मूळ धर्मामध्यें तशा प्रकारच्या कल्पना असल्या म्हणजे त्या लोकांवर केव्हां ना केव्हां तरी आपला परिणाम करतात. परंतु जेथें तशा कल्पनाच नाहींत तेथें त्यांचे परिणाम तरी काय होणार ? आपल्या लोकांच्या हातून शूरपणाचीं कृत्यें

व्हावीं, हा महंमदाचाहि हेतु दिसतो; व त्याप्रमाणें त्यानें आपल्या धर्मामध्यें कल्पनांची योजना केली आहे. आणि त्या कल्पनांनीं मुसलमान लोकांवर काय परिणाम झाला आहे ह्या गोष्टी मुसलमानी अमलाच्या चरकामधून केव्हां तरी एकदां पिळून निघालेल्या एशिया आणि युरोप खंडांतील बहुतेक लोकांना माहीतच आहेत. सारांश, मनुष्याच्या अंगांत हिंमत उत्पन्न करणाऱ्या अशाच कल्पना ज्यामध्यें आहेत त्या धर्मापासूनच मनुष्याला सुख प्राप्त करून घेण्याचा संभव आहे. बौद्ध धर्मासारखा कमकुवतपणा आणणाऱ्या कल्पना असल्यावर त्या कल्पनांच्या अनुरोधानें चालणाऱ्या लोकांच्या कपाळीं काय काय दुःख भोगण्याचें येईल, हें सांप्रतच्या स्थितीवरून उघड उघड दिसतच आहे. तें स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता आहे असें नाहीं.

• • •

# ६. दिल्लीचें तख्त आणि भाऊसाहेबांचा घण

( काळ : अग्रलेख ६-९-१९०१ )

शिवाजीच्या उदयापासून तों बाजीरावाच्या अस्तापर्यंत मराठ्यांचा प्रतापी सूर्य सर्व महाराष्ट्रावर प्रकाशमान होत असतां, त्या अवधीमध्यें मराठ्यांच्या हातून अचाट शौर्याच्या अशा अनेक गोष्टी झालेल्या आहेत. त्या सर्वच आपल्या परीनें मोठ्या आहेत. परंतु त्या सर्वांमध्यें एक गोष्ट इतकी भव्य, प्रचंड आणि अद्भुत आहे कीं, तिच्याबद्दल विचार करूं लागलें असतां मन अगदीं थक्क होऊन जातें. ती गोष्ट म्हटली म्हणजे सदाशिवरावभाऊंनीं दिल्लीचें बादशाही तख्त फोडिलें ही होय. पानिपतच्या मोहिमेमध्यें बारीकसारीक गोष्टी पुष्कळ घडून आल्या असतील; पण ह्या वर नमूद केलेल्या गोष्टीनें ज्याचें मन आकर्षण करून घेतलें नसेल, असा मनुष्य सांपडणें फार कठीण आहे. पानिपतची मोहीम हा मराठ्यांच्या शौर्याचा कळस होता. पानिपतच्या समरांगणावर मराठ्यांच्या शस्त्रांना यश आलें असतें, तर त्यांच्या वैभवाला पारावारच राहिला नव्हता. परंतु जरी तेथें त्यांना यश आलें नाहीं, तरी पुण्यापासून अटकेपर्यंत मराठे सरदार अव्याहतपणें कूच करीत आणि खंडण्या घेत गेले, ही गोष्ट कांहीं लहानसान नव्हे. पानिपतच्या मैदानांत पराभव होईपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून येत होत्या, त्या त्या सर्व मराठ्यांच्या उत्कर्षाच्याच सूचक होत्या. खुद्द ज्या दिवशीं पानिपतास मराठ्यांचा पराभव झाला, त्या दिवशीं संध्याकाळचा चार घटका दिवस राहीपर्यंतसुद्धां मराठ्यांच्या पक्षाला यश आलेलें होतें. त्या घटकेपर्यंत मराठ्यांच्या उत्कर्षाची एकसारखी चढती कमान होती, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्या उत्कर्षाच्या कालामध्यें मराठ्यांनीं जीं अचाट कृत्यें केलीं, त्यांतील पहिल्या प्रतीचें कृत्य म्हटलें म्हणजे त्यांनीं दिल्लीचें तख्त फोडिलें हें होय.

दिल्लीचें तख्त फोडावें ही कल्पना भाऊसाहेबांची. सुराजमल जाट हा ह्या कल्पनेला विरुद्ध होता. व भाऊसाहेबांनीं दिल्लीचें तख्त

फोडलें म्हणून सुराजमल जाट व त्याच्याबरोबर दुसरे कांहीं सरदार मराठ्यांचा पक्ष सोडून निघून गेले. ह्या इतिहासांतील गोष्टीवरून ज्या तख्त फोडण्याचे परिणाम अशा रीतीनें अहितकारक झाले, त्या गोष्टीला इतकें महत्त्व देणें बरोबर नाहीं, असा आक्षेप येणें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु आम्ही जें या गोष्टीला श्रेष्ठपद देत आहों, तें अगदीं निराळ्या कारणासाठीं आहे. सध्यांच्या प्रसंगीं आम्हांला ऐतिहासिक वादांशीं विशेष कांहीं कर्तव्य नाहीं. आणि त्या वादांच्या दृष्टीनें विचार केला, तरीहि सुराजमल जाटाच्या म्हणण्यांत काय अर्थ होता ? सुराजमलाचें असें म्हणणें होतें कीं, आम्ही बादशहाचे नोकर आहों, तेव्हां आमच्यासमक्ष आम्ही बादशहाचा खजिना लुटूं देणार नाहीं. पण जाटाच्या ह्या म्हणण्यांत काय अर्थ होता ? बादशहाचा खजिना कोठला ? बादशहांनीं तो कोठून आणला होता ? बादशहांनीं जन्मास येते वेळीं स्वर्गलोकांतून आपल्याबरोबर तो स्वर्गांतून आणला होता काय ? किंवा त्यांच्या आजापणजांनीं आणला होता ? हा बादशाही खजिना आला कोठून ? लोकांच्या जवळून पैसे लुबाडून ते बादशहानें आपल्या ताब्यामध्यें आणून ठेविले, म्हणजे झाला तो बादशाही खजिना ! पण वास्तविक ते पैसे लोकांच्या श्रमाचे. लोकांच्या खिशांत जेव्हां पैसे येतात तेव्हां ते घामानें भिजून येतात. परंतु जेव्हां ते बादशहाच्या खजिन्यांत जातात तेव्हां रक्तानें ओले होऊन जातात. गरीब लोक कुदळीनें आणि नांगराच्या फाळानें एक एक पैसा कमवितात, आणि बादशहा तरवारीनें आणि तोफेच्या गोळ्यानें कोट्यवधि रुपयांची लूट मारतात, आणि अशा तऱ्हेनें त्यांचे खजिने भरतात. असले खजिने बादशहांचे कसले ? ते वास्तविक लोकांचेच आहेत. त्यांच्यावर लोकांचाच हक्क जास्त आहे. ज्यांनीं निढळाच्या घामानें पैसा मिळविला, ते सर्व लोक चोर व्हावे, आणि ज्यांनीं ते लोकांपासून लुटून आणिले ते त्याचे मालक व्हावे काय ? दिल्लीचा खजिना दिल्लीच्या बादशहाचा नव्हता, तो दिल्लीच्या लोकांचा होता. तो हिंदुस्थानच्या लोकांचा होता. त्या खजिन्यांत हिंदुस्थानच्या लोकांचे पैसे सांठविलेले होते. आतां ते पैसे कोणापासून किती लुबाडून घेतले होते, याचा बादशहाच्या दप्तरामध्यें जमाखर्च नसल्यामुळें ( कारण

लुटीच्या पैशाचा जमाखर्च कोण ठेवतो ? ) ते ज्याचे त्याला परत करणें ही गोष्ट अशक्य असल्याकारणानें त्या पैशाचा जर कांहीं योग्य विनियोग करण्याचा मार्ग असेल तर तो एकच होता, आणि तो हा कीं, ज्याचा त्याला परत करता येत नसलेला हिंदुस्थानांतील लोकांचा पैसा हिंदुस्थानांतील लोकांच्या कोणत्या तरी सामान्य अशा कल्याणाकडे लावावयाचा. आणि हिंदुस्थानांतील लोकांचें त्या वेळीं सर्वसामान्य कल्याण असें कोणतें होतें ? गझनीचा महमद, महमद घोरी वगैरे मुसलमानी योद्ध्यांच्या स्वाऱ्यांपासून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य दिवसेंदिवस नष्ट होत चाललें होतें. तेव्हांपासून जें ग्रहण लागत चाललें त्याचा पूर्ण खग्रास होण्याची वेळ औरंगजेबाच्या कारकीर्दीत आली होती. पुढें दक्षिणेमध्यें शिवाजीमहाराजांसारखे प्रतापशाली पुरुष उत्पन्न होऊन त्यांनीं जरी महाराष्ट्राला स्वातंत्र्याची गोडी लावून दिली होती, तरी उत्तर हिंदुस्थानमध्यें मुसलमानांचा अमल कायमच होता. उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानाचें पूर्ण वर्चस्व होते. १७६०-६१ सालचे दिवस असे आले होते कीं, त्या वेळेला मुसलमानाच्या सत्तेला प्रतिबंध करण्याचा कांहीं उपाय योजण्यांत आला नसता तर पारतंत्र्याच्या जोखडानें हिंदुस्थानांतील लोकांच्या माना कायमच्या मोडून गेल्या असत्या. दिल्लीच्या बादशहाचें वजन कमी होत चाललें आहे असें पाहून त्याला मदत करण्यासाठीं अहमदशहा अबदाली हा कंदाहारहून सैन्य घेऊन येत होता, व अबदालीला मदत करण्यासाठीं रुमशामच्या बादशहानेंहि आपलें कांहीं सैन्य पाठविलें होतें. म्हणजे हल्लीं जसे युरोपमध्यें संयोगसंधि ( Alliances ) झालेले आपण पाहतों, त्याप्रमाणें त्या वेळच्या तीन मोठमोठ्या मुसलमान राजांच्यामध्यें हा Triple Alliance च झालेला होता. कॉन्स्टॅन्टिनोपलचा बादशहा, कंदाहारचा बादशहा, आणि दिल्लीचा बादशहा हे एकत्र होऊन हिंदुस्थानाला गुलामगिरीमध्यें दडपून ठेवण्याविषयीं प्रयत्न करीत होते, असें त्या वेळेचें शत्रूकडील कारस्थान होतें. शत्रु हिंदुस्थानचें स्वातंत्र्य नष्ट करण्यासाठीं खटपट चालवीत होते आणि त्याच वेळीं आमच्या हिंदुस्थानांतील सुराजमल जाट ‘ आम्ही बादशहाचा खजिना रक्षण करणार ’ म्हणून रडत होते. ह्या लोकांच्या दूरदृष्टीला काय म्हणावें ? त्या वेळेला

आपल्या देशाविरुद्ध कोण काय काय कारस्थानें करीत आहेत, याचा जाटांना गंधहि नव्हता असें दिसतें. अशा वेळीं जसे मुसलमान एक झाले होते त्याचप्रमाणें हिंदूंनींहि एक व्हायला पाहिजे होतें. पण तें सर्व एकाच बाजूला राहून जे भाऊसाहेब सर्व हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचा प्रयत्न करीत होते, त्यांनाच उलट सुराजमल जाट आडवा आला. परंतु भाऊसाहेबांची दृष्टि सुराजमलासारखी वेडगळ समजुतींनीं आणि मतांनीं आधळी झालेली नव्हती. आपल्या देशावर कोणतें संकट आलें आहे, आणि आपला देश स्वतंत्र करण्यासाठीं आपण या प्रसंगीं काय केलें पाहिजे, याची पूर्ण कल्पना भाऊसाहेबांच्या डोळ्यांसमोर होती. त्यांना हिंदुस्थान स्वतंत्र करावयाचें होतें. त्यांना हिंदुपदपादशाहीची इमारत उभी करावयाची होती, व अशाच धोरणानें त्यांचे सर्व प्रयत्न चालले होते. त्यांनीं दक्षिणेंतून गायकवाड, विंचूरकर, पोवार, निंबाळकर वगैरे सरदार गोळा करून बरोबर आणिले होते. पुढें कूच करून माळव्यांत आल्यावर तेथें ज्या फौजा होत्या त्या त्यांनीं बरोबर घेतल्या होत्या. बुंदेले व झांशीवाले तमाम समागमें निघाले. जयपूर, उदेपूर, भरतपूरवाले, कुंभेरी, चितोड, रामनगर वगैरे ठिकाणचे सर्व रजपूत शिपाईहि भाऊसाहेबांच्या सैन्यांत येऊन मिळाले. हा अतिशय आणीबाणीचाच प्रसंग होता. १७६१ सालानंतर हिंदुस्थानांत मुसलमानांनीं राज्य करावें कीं हिंदूंनीं राज्य करावें, हिंदु लोकांनीं गुलामगिरी पत्करावी कीं स्वतंत्र व्हावें, या महत्त्वाच्या प्रश्नाचा निकाल करण्याचाच हा प्रसंग होता. आणि यासाठींच हिंदूंच्या बीजाचे म्हणून जे सरदार व शिपाई होते ते सर्व [illegible] आपल्या सभोंवतीं गोळा गेले होते. हिंदुस्थान हें हिंदुस्थानांतील लोकांकरितां आहे, दुसऱ्याकरितां नव्हे, हें प्रतिपादन करण्यासाठीं भाऊसाहेबांच्या सभोंवतीं चार लक्षांच्यावर फौजेचा जमाव जमला होता. इतक्या लोकांच्या खर्चाला काय लागणार नाहीं ? भाऊंनीं आपल्याबरोबर दक्षिणेंतून पुष्कळ पैका आणला होता; परंतु तो दिल्लीपर्यंत मजल येऊन पोंचेपर्यंत सर्व खलास होऊन गेला व फौजेंत पैशाची फार टंचाई आली. दिल्लीच्या बादशाही तख्तामध्यें अपार खजिना असल्याची माहिती सर्वत्र होती. शिवाय तें तख्तहि अतिशय मौल्यवान् होतें. ही संपत्ति दिल्लीच्या बादशहानें कशी

क्रमाविली होती, हें वर आपल्याला दिसून आलेंच आहे. ही हिंदुस्थानां-तील लोकांच्या निढळाच्या घामाची संपत्ति हिंदुस्थानच्या लोकांच्या सर्वसामान्य कल्याणाकडे उपयोगांत आणण्याची जर एखादी वेळ असली तर ती ही होती. हिंदुस्थानांतील लोकांच्या स्वातंत्र्यासाठीं हिंदुस्थानांतील लोकांची संपत्ति उपयोगांत आणावयाची नाहीं तर ती केव्हां आणा-वयाची ? हिंदुस्थानची संपत्ति हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितांच आहे, ती बादशहांच्या जलशांकरितां नाहीं. अशा उदात्त विचारांनीं प्रेरित होऊन भाऊंनीं दिल्लीचें तख्त फोडण्याचा निश्चय केला. त्यांतील पैका भाऊ-साहेबांना स्वतःच्या उपयोगाकरितां नको होता. तख्तावरील जवाहीर काढून त्यानें भाऊसाहेबांना आपलें अंग सुशोभित करावयाचें नव्हतें, तर त्या थोर वीराला सर्व हिंदुस्थान स्वातंत्र्यानें सुशोभित करावयाचें होतें. त्या द्रव्यापैकीं चार दमड्या भाऊसाहेबांच्या पदरांत पडणार होत्या असें नाहीं. त्या पैक्यानें भाऊसाहेबांना आपलें पोट जाळावयाचें नव्हतें; तर हिंदुस्थानला स्वतंत्र करण्यासाठीं ज्या फौजा निघाल्या होत्या त्यांच्या पोटाला अन्न द्यावयाचें होतें. आणि त्यासाठीं सदाशिवरावभाऊंनीं हें कृत्य केलें. व अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे वर निर्दिष्ट केलेला आक्षेप अगदीं पोकळ आणि कमजोर आहे, असें कोणालाहि वाटल्यावांचून राहणार नाहीं.

ह्याप्रमाणें ह्या आक्षेपाचें निरसन केल्यानंतर आपण आतां सदाशिवरावभाऊंनीं दिल्लीचें तख्त फोडलें या गोष्टीच्या महत्त्वाकडे वळूं. पानिपतच्या लढाईमध्यें कोणाचा पराभव झाला असें हल्लींच्या इंग्रजी शाळेंतील मास्तरानें विचारलें म्हणजे ‘मराठ्यांचा पराभव झाला’ असें उत्तर देण्याविषयीं मुलांना शिकविलेलें असतें. परंतु ह्या प्रश्नाचें उत्तर इंग्रजीच्या अमदानींतील चवथ्या इयत्तेकरितां लिहिलेल्या महाराष्ट्र देशाच्या इतिहासांतील उत्तरापेक्षां जरा जास्त बिकट आहे. पानिपतच्या लढाईमध्यें मराठ्यांचें पुष्कळ सैन्य मारलें गेलें हें खरें, परंतु एवढ्या-वरून अबदालीचा जय झाला आणि मराठ्यांचा पराजय झाला हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. मुख्य सेनापति मरणें किंवा पुष्कळ सैन्य मरणें एवढ्यावरून जयापजयाची कल्पना ठरविणें रास्त नाहीं. या गोष्टीचा विचार करतांना पुढें घडून आलेल्या परिणामांकडेहि लक्ष दिलें पाहिजे.

पानिपतच्या लढाईत मराठ्यांचा मोड झाला असला, तर अब्दालीचाहि मोड झाला आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, त्यानंतर मुसलमानांची हिंदुस्थानवर काबूलच्या दिशेनें दुसरी स्वारी आली नाहीं महंमद गझनी, तैमूरलंग, नादीरशहा यांच्या मालिकेंतील अब्दाली हाच शेवटचा नाग आला. ही माळ येथेंच कोणीं तोडिली? ह्या स्वाऱ्या येथेंच कोणीं बंद केल्या? हा सर्व पानिपतच्या मोहिमेचाच परिणाम आहे. पुढें महादजी शिंद्यांना दिल्लीच्या दरबारांत आपला विशेष जोर बसवितां आला, ह्याला मूळ कारण काय? उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचें वर्चस्व बहुतेक कमी होऊन लोक इंग्रजी लाटेखालीं बुडून जाईपर्यंत जो स्वातंत्र्याचा थोडाबहुत अनुभव घेत होते, तो कशाचा प्रभाव? ह्या सर्व गोष्टी जर पानिपतच्या मोहिमेपासून झाल्या आहेत, तर त्या मोहिमेमध्यें, निदान त्या मोहिमेपासून मुसलमान लोकांचा पाडाव झाला, असें म्हणण्याला काय हरकत आहे? पानिपतच्या लढाई-पासून मराठ्यांच्या राज्याला धक्का बसला हें खरें, पण या लढाईमुळें मुसलमानी राज्याला धक्का बसला नाहीं असेंहि नाहीं. अशा रीतीनें ह्या लढाईनंतर तर मुसलमानांचा कमजोरपणा झालाच, पण त्याच्या आधींहि हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्याला पूर्णपणें उतरती कळा लागलेली होती. आणि ही गोष्ट भाऊसाहेबांनीं एका कृत्यानें सर्व जगाच्या दृष्टोत्पत्तीस स्पष्टपणें आणून दिली होती. दिल्लीचें तख्त फोडणें ही गोष्ट लहान-सान नव्हती. त्यामध्यें एक प्रकारचा पुष्कळ राजकीय अर्थ होता. भाऊ-साहेबांनीं हें दिल्लीचें तख्त फोडलें नव्हे,—तर हिंदुस्थानच्या गुलामगिरीचें डोकेंच फोडलें. गुलामगिरीचीं जोखडें हिंदुस्थानांतील सर्व लोकांच्या माना दाबून टाकण्याकरितां येथूनच तयार करून बाहेर पाठविलीं जात असत. बंगाल, बिहार, ओरिसा, अयोध्या, लाहोर, सिंध, गुजराथ, नागपूर, विजापूर, गोवळकोंडा आणि दौलताबाद या सर्व ठिकाणच्या हिंदु प्रजेला जखडून टाकण्यासाठीं गुलामगिरीच्या शृंखला येथेंच घडविल्या जात होत्या. अखंड भरतखंडांतील लोकांच्या अंतःकरणाला चावून चावून त्यांना रात्रीचीहि झोंप येऊं न देणारे गुलामगिरीचे साप आणि विंचू याच वारुळांतून बाहेर पडत होते. सर्व तरतरीत लोकांच्या उमेदी आणि

महत्त्वाकांक्षी मनुष्यांच्या आशा करपवून टाकणाऱ्या गुलामगिरीच्या ज्वाला ह्याच अग्निकुंडांतून निघून सर्व हिंदुस्थानभर सैरावैरा धांवत होत्या. आणि काश्मिरांतील हिमालयाच्या शाखा, माळव्यांतील सातपुडा, आणि दक्षिणेंतील सह्याद्रि अशा मोठमोठ्या उंच पर्वतांनाहि बुडवून टाकणाऱ्या [illegible] प्रचंड लाटा ह्याच समुद्रापासून उसळत होत्या. त्या दिल्लीच्या तख्ताचें हें स्वरूप आपण लक्षामध्यें आणलें पाहिजे. तें फोडण्यांत भाऊसाहेबांनीं केवढी मोठी कामगिरी बजाविली, याची आपल्याला बरोबर कल्पना करतां येईल. त्या वेळीं दिल्लीच्या बादशहांचा साऱ्या हिंदुस्थानभर अतिशय वचक होता व अतिशय दरारा होता. बाबर, हुमायून, अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब ह्या सर्व बादशहांनीं तें तख्त पवित्र करण्याकरितां आपली सर्व पुण्याई खर्च केली होती. या सर्व बादशहांचें वैभव त्या तख्तामध्यें एकवटलेलें होतें. तें तख्त म्हणजे मोंगलाई सत्तेची प्रत्यक्ष मूर्तिमंत प्रतिमाच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. दिल्लीपासून [illegible] जो अंमल चालत होता, तो या तख्ताचा होता. हिंदुस्थानांतील लोक हत्तीप्रमाणें जुलमाच्या पायाखालीं चुरडले जात होते, तरी 'ना विष्णुः पृथिवीपतिः' हें तत्त्व त्यांच्या मनामध्यें होतेंच. त्यामुळें ते या तख्ताकडे मोठ्या आदरबुद्धीनें पाहत असत. सर्वांच्या मनांत याच्याबद्दल पूज्यबुद्धि वास करीत होती, व या तख्ताबद्दल येथून तेथून सर्व लोकांच्या मनामध्यें एक प्रकारचा भीतिमिश्रित सन्मान वागत होता. या तख्तावर सोन्याच्या मुलाम्याचे थर चढविण्याकरितां हजारों लोक निमूटपणें जुलमी करांच्या खालतीं वांकत होते या तख्तावर हिरे आणि माणकें चढविण्यासाठीं कैक श्रीमंत लोक गरीब होत होते, कैक हिंदु देवळांचे जवाहीरखाने उघडे पडत होते, आणि कित्येक रजपूत राजांच्या स्त्रिया आपल्या नैसर्गिक लावण्यांतच संतोष मानून स्वस्थ बसल्या होत्या. ह्या तख्तापुढें शेंकडों मांडलिक राजे आपले करभार आणून ओतीत असत. आणि लढाईत जिंकलेले शेंकडों कैदी हात जोडून उभे राहत असत. ह्या तख्तापुढें कित्येकांनीं सलाम केले असतील, कित्येकांनीं नाकें घासलीं असतील, आणि कित्येकांनीं साष्टांग नमस्कार घातले असतील. ह्या तख्तापुढें मेवाडचे राणे, उदेपूरचे ठाकूर, बंगालचे

सुभेदार, आणि दक्षिणेचे राजे रोज लवून मुजरा करीत होते. ह्या तख्तापुढें तंग विजारी घातल्या असल्यामुळें नीट बसतां येत नललेले इंग्लिशांचे वकील आपण अगदीं सुखानें बसलों आहों, असें आपल्या बाह्यात्कारी हंसतमुख चेहऱ्यानें सभोंवतालच्या मुसलमानांना दाखवीत होते. ' हें तख्त मोडो ' म्हणून दक्षिणेंतील पाणीदार मराठ्यांमध्यें कोणी शिव्याशाप देत असले तर असोत, बाकी हिंदुस्थानभर ' हें तख्त सलामत राहो ' म्हणून सर्व लोकांच्या तोंडून प्रार्थना निघत होत्या. ह्या तख्ताच्या पुढें हिंदुस्थानांतीलच काय पण इंग्लंड, पोर्तुगॉल, हॉलंड, इराण, अफगाणिस्थान, कॉन्स्टँटिनोपल इत्यादि दूरदूरच्या देशांतूनहि आलेल्या नजराण्यांच्या राशी पडत असत. असा ह्या तख्ताचा महिमा होता. पण एवढा मोठा महिमाहि आपण आपल्या बाहुबलानें लयाला नेऊं व आपला देश स्वतंत्र करूं, अशी महत्त्वाकांक्षा दक्षिणेंतील मराठे वीरांच्या मनामध्यें उड्या मारीत होती, व ती सदाशिवरावभाऊंनीं शेवटास नेली. सदाशिवरावभाऊंचे पूर्वज म्हटले म्हणजे कोंकणांत समुद्राकांठीं एका खेडेगांवांत राहणारे एक गृहस्थ. दैवाच्या मनांत नसतें तर विश्वनाथभटाचीं मुलें श्रीवर्धनच्या वाळवंटामध्यें नाचत–बागडतच पडलीं असतीं. तीं फार उंच चढलीं असतीं तर एखाद्या माडाच्या झाडावर चढलीं असतीं, सिंहासनावर चढलीं नसतीं. त्यांनीं फार मजल मारली असती तर आपल्या पंचक्रोशींतील अगदीं शेवटच्या गांवाला ते गेले असते, पण अटकेपर्यंत गेले नसते; व त्यांनीं फार फार जिंकले असते तर एखादा भाऊबंदकीचा वाद जिंकला असता, हिंदुस्थान देश जिंकला नसता. श्रीवर्धनच्या नारळीच्या बागांतून आणि समुद्रकिनाऱ्यावरील वाळवंटावरून त्या वेळीं इतर मुलें जशीं नाचत–बागडत होतीं, त्याचप्रमाणें बाजी, चिमाजी, रघुनाथ, विश्वास आणि सदाशिव हीं मुलेंहि त्यांच्याच-बरोबर कदाचित् नाचत–बागडत राहिलीं असतीं. परंतु परमेश्वराची इच्छा कांहीं निराळीच होती. त्याच्या मनांतून ह्या माडांवर चढणाऱ्या मुलांना राज्यपदावर चढवावयाचें होतें. त्याच्या मनांतून श्रीवर्धनच्या किनाऱ्यावर या डोंगरापासून त्या डोंगरापर्यंत वाऱ्याप्रमाणें भटकत फिरणाऱ्या या मुलांना त्यांच्या हातांत विजयश्रीचे भगवे झेंडे देऊन साऱ्या हिंदुस्थानभर फिरवावयाचें होतें. त्याच्या मनांतून श्रीवर्धन हें नांव अन्वर्थक करावयाचें होतें. कारण,

त्यानें तेथील हीं मुलें हातीं धरून साऱ्या हिंदुस्थानच्या विजयश्रीचें वर्धन केलें. सदाशिवरावभाऊहि कोंकणांत राहून हल्लीं जसे कित्येक लोक करूं शकतात, त्याप्रमाणें फार तर माडावरील ताजा नारळ बुक्कीनें फोडूं शकले असते; पण सदाशिवरावभाऊंचा जन्म त्याकरितां नव्हता. त्यांचा जन्म जुनें बादशाही तख्त बुक्कीनें फोडण्याकरितां होता, व तें कृत्य सदाशिवरावभाऊंनीं केलें. बादशाही तख्ताचा मोठेपणा आणि सदाशिवरावभाऊंच्या पूर्व-वृत्ताचा कोंकणीपणा हीं वर लिहिलेल्या रीतीनें आपल्या डोळ्यांपुढें आपण मांडलीं असतां सदाशिवरावभाऊंनीं केवढें प्रचंड, अघटित आणि अलौकिक कृत्य केलें याची आपल्याला बरोबर कल्पना येईल. बाकीच्या लोकांचे डोळे बादशाही वैभवानें दिपून गेलेले होते, पण सदाशिवराव-भाऊंची दृष्टि साफ होती. सदाशिवरावभाऊंना पक्कें माहीत होतें कीं, बादशाही तख्त कसलेंहि केलेलें असो, पण त्याला कोणी फोडणारा भेटला कीं तें फुटलेंच पाहिजे; व त्याप्रमाणें जें तख्त सहा-सात शतकेंपर्यंत अभेद्य झालें होतें, त्याला अखेरीस [illegible] हा फोडणारा भेटला, आणि त्याबरोबर तें फुटलें. तख्त कसलेंहि केलेलें असलें, तरी लोखंडाचा घण ही अशी कांहीं एक अजब चीज परमेश्वरानें ह्या जगामध्यें निर्माण करून ठेविली आहे कीं, त्याच्याखालीं सर्व प्रकारच्या धातूंचे तुकडेच झाले पाहिजेत. लोखंडाचे घण सोन्याचीं आणि हिऱ्यां-चींहि तख्तें नेहमीं फोडूं शकतात यांत शंका नाहीं. आणि असले घणहि तयारच असतात. ते घण उचलणारीं मनगटें मात्र पाहिजेत. तीं असलीं म्हणजे कोणतेंहि तख्त असलें तरी तें फुटलेंच पाहिजे. बलाढ्य, सत्त्वशील, सत्त्वयुक्त आणि न्यायोपबृंहित अशा मनगटांनें उचललेल्या घणाखालीं निष्कारण मारलेल्या लोकांच्या रक्तानें लाल झालेल्या, गांजलेल्या, शिव्याशापरूपी धरणीकंपाच्या धक्क्यांनीं डळमळूं लागलेल्या, अनन्वित जुलूम, अन्यायाचे कर, प्रजेचा असंतोष, राज-वल्लभांची दुर्व्यसनें, फंदफितुरी आणि बंडाळ्या ह्या अनेक भुंग्यांनीं आंतून पोखरलेल्या तख्ताचे तुकडेतुकडेच झाले पाहिजेत. ही गोष्ट भाऊसाहेबांच्या मनामध्यें येऊन चुकलेली होती. इतर लोकांना जरी ह्या तख्ताचा मोठा बाऊ वाटत होता, तरी बादशाही जुलमामुळें त्याला

आधींच भेगा गेलेल्या भाऊसाहेबांच्या डोळ्याला दिसत होत्या. तें तख्त बादशाही अन्यायानें आधींच फोडून ठेविलें होतें. भाऊसाहेबांनीं नंतर घण उचलिला. दक्षिणेंतील [illegible] समुद्रकांठचा एक मुलगा उत्तर हिंदुस्थानांतील यमुनेच्या कांठच्या दिल्लीच्या किल्लयांत जाऊन आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं हातावर शिर घेऊन निघालेल्या लोकांच्या पोटाला अन्न देण्याकरितां सहा सात शतकांच्या संचित केलेल्या वैभवानें उभारलेलें तख्त फोडण्याकरितां आपल्या आजानुलंबी पवित्र हातांमध्यें घण घेऊन उभा राहिलेला आहे—ही कल्पना, हा प्रसंग, हें चित्र, हें सविधानक किती आल्हादजनक, किती स्वदे-[illegible] आणि किती रोमहर्षक आहे! ह्याची प्रचीति आज आपल्याला केवळ कल्पनासृष्टीमध्येंच करून घेतली पाहिजे. ज्यांनीं अशा स्थितीमध्यें [illegible] प्रत्यक्ष पाहिलें असेल त्यांचे डोळे धन्य! त्यांनीं बाहुवीर्याची परमावधि पाहिली! आणि स्वातंत्र्यप्रीतीची पराकाष्ठा अनुभविली! बादशाही तख्त भाऊसाहेबांच्या डोळ्यासमोर होतें. शहाजहान, औरंगजेब, [illegible], अहमदशहा वगैरे बादशहा ज्या तख्तावर बसून सर्व हिंदुस्थानचें राज्य हांकीत होते, तें तख्त रिकामें झालेलें भाऊसाहेबांच्या पुढें होतें, व त्या तख्तावर बसून आपण बादशहा व्हावें अशी इच्छा भाऊसाहेबांच्या मनांत आली असती, तर त्याचा हात धरायला त्या वेळीं कोण समर्थ होता? कोणी नव्हता. तरी पण आपण त्या तख्तावर बसावें, आणि आपण आतां हिंदुस्थानचे बादशहा झालों आहों, अशी चोहोंकडे द्वाही फिरवावी, ही कल्पना भाऊसाहेबांच्या मनाला शिवलीसुद्धा नाहीं. ज्या तख्तावर बसण्याकरितां शेंकडों बादशहा धडपडत आहेत, धडपडत होते, आणि राहतील,–तें तख्त फोडण्यांतच भाऊसाहेबांना जास्त कृतकृत्यता वाटली. ह्यांतच त्यांच्या अंगचा थोरपणा दिसून येत आहे. असल्या तख्तावर बसेल कोणीहि. पण जो तीं फोडतो तो त्यांवर बसणाऱ्यांच्याहि मानेवर बसण्याच्या योग्यतेचा असला पाहिजे. रामानें समुद्रावर सेतु बांधला म्हणून कित्येकांना मोठी फुशारकी वाटत होती. परंतु एका आचमनामध्यें सर्व समुद्राचें पाणी पिऊन टाकणाऱ्या कुंभोद्भव ऋषीची गांठ पडल्याबरोबर ती सर्व फुशारकी फिक्की पडली. तद्वत् या दिल्लीच्या तख्तावर बसलेल्या बादशहांना आपण फार

मोठे म्हणून अतिशय धन्यता वाटत होती. पण तें तख्त फोडणारा निघाला तेव्हां त्या सर्व धन्यतेचें पाणी होऊन गेलें असलें पाहिजे. आणि ज्याप्रमाणें क्षारोदक समुद्र अगस्त्यमूत्रमय मानला गेल्यामुळें तो रामाला अस्पर्शनीय झाला, त्याचप्रमाणें सदाशिवरावभाऊंच्या घणानें छिन्नविच्छिन्न केलेलें आणि फोडून टाकलेलें तें तख्त यांच्यामागून येणाऱ्या राजांना, जर त्यांच्यांत कांहीं मानीपणा असेल तर, केवळ अनुपभोग्यच झालेलें आहे. अशा रीतीनें अचाट कृत्य सदाशिवरावभाऊंनीं आपल्या इतिहासामध्यें करून ठेवलें आहे. असलीं कृत्यें फार मनन करण्यासारखीं असतात. असल्या कृत्यांत उदार मनोवृत्ती एकसारख्या उचंबळत असतात. सत्त्वगुण, शौर्य, स्वातंत्र्यप्रीति, स्वदेशभक्ति, आत्मोन्नति इत्यादि अनेक गुण असल्या कृत्यांच्या पोटामध्यें सदोदित वास करीत असतात. ज्यांनीं असली उत्तम आचरणें केलीं ते खात्रीनें स्वर्गलोकालाच गेले असले पाहिजेत.



# ७. स्वयंवर व संकुल युद्ध

( काळ : अग्रलेख, ३-७-१९०३ )

कोकिळाबाई दिसण्यांत अगदीं कोंवळ्या आणि तरुण दिसत असत, तरी पण त्यांचें वय चाळिशीच्या जवळजवळ आलेलें होतें. त्यांना वैधव्य आल्याला आठ-दहा वर्षें झालीं होतीं, तरी पण त्या बहुतेक बाबतींत अगदीं एखाद्या सवाष्ण बायकोप्रमाणें दिसत असत आणि वागतहि असत. त्या फार पापभीरु होत्या, व हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें आपण नेहमीं आपलें आचारण ठेवावें अशी त्यांची फार इच्छा असे. त्यांचे विचार नेहमीं हिंदु धर्मशास्त्रामध्यें घोंटाळत असत. कांहीं करावयाचें झालें तरी तें हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें करावयाचें, अशी आपली संवय त्यांच्या मनाला लागूनच गेलेली होती. फार काय, त्यांच्या मनांतून पुनर्विवाह करावयाचा होता. परंतु तोसुद्धां हिंदु धर्म-शास्त्राप्रमाणें सशास्त्र होतो किंवा नाहीं, याची यांच्या मनाला शंका वाटत होती. परंतु कोणी एका सद्गृहस्थानें कोकिळाबाईंना असें सांगितलें कीं, पुनर्विवाह सशास्त्र आहे किंवा अशास्त्र आहे याबद्दल शंकराचार्यांच्या नजरेखालीं पूर्वीं एकदां वादविवाद झाला होता, त्यांत पंच नेमण्यांत आले होते, व त्यांच्या बहुमतानें जें निश्चित होईल त्याप्रमाणें करावें असें ठरलें होतें. त्या पंचांपैकीं सहा जण पुनर्विवाहाला विरुद्ध होते, तरी पण बाकी चौघेजण पुनर्विवाह सशास्त्र आहे असेंच म्हणत होते. ही हकीकत ऐकून आणि पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेबद्दलचें हें दांडगें प्रमाण लक्षांत आणून पुनर्विवाह सशास्त्रच असला पाहिजे, अशी कोकिळाबाईंच्या मनाची खात्री झाली; व पुनर्विवाह करण्यांत आपण आपल्या धर्माच्या विरुद्ध जात नाहीं असें समजून त्यांनीं एके दिवशीं आपला पुनर्विवाह करून घेण्याचा निश्चय कायम केला.

आपल्यांतील सगळ्या वेदकालीन आणि पुराणकालीन चाली अमलांत आणाव्या ही कोकिळाबाईंची फार मोठी महत्त्वाकांक्षा. त्यामुळें पुनर्विवाहा-बरोबरच स्वयंवराचीहि चाल आपल्यामध्यें फिरून सुरू करतां आली तर

फार बरें होईल, असें त्यांना वाटलें; व त्यांनीं स्वयंवरानें आपला पुनर्विवाह करण्याचें ठरविलें. व तो आपला विचार त्यांनीं एका वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करून जगाला कळविला. ही पुनर्विवाहाच्या स्वयंवराची नोटीस प्रसिद्ध झाल्यापासून जिकडे तिकडे गडबड उडून गेली. हिंदु धर्माच्या चालीरीतीप्रमाणें ऑगस्ट महिन्याची पांचवी तारीख हा दिवस स्वयंवराला नेमण्यांत आला होता. कोकिळाबाई ज्या शहरांत राहत होत्या त्या शहरांत ऑगस्टची पांचवी तारीख हा फारच महत्त्वाचा दिवस होता. ही पुनर्विवाहाच्या स्वयंवराची बातमी ऐकून छप्पन देशचे आणि शहाण्णव कुळींचे पुनर्विवाहास तयार असलेले सर्व लोक त्या शहरांत येऊन दाखल झाले होते. कोणी आपल्या स्नेह्यांच्या येथें उतरले होते, कोणी इंग्रजी खाणावळींतून बिऱ्हाड लाविलें होतें, आणि कोणी इंग्रजी दुकानांतून मिळणाऱ्या फराळाच्या जिनसांवर दिवस काढीत होते. स्वयंवराच्या जागेकरितां एक मोठा थोरला दिवाणखाना भाड्यानें घेण्यांत आला होता; व तो दिवाणखाना छतें, हंड्या, झुंबरें, सतरंज्या, गालिचे, खुर्च्या वगैरे साधनांनीं अत्यंत सुशोभित केलेला होता. तारीख पांच ऑगस्ट रोजीं सकाळीं दहा वाजण्याच्या आधीं ते छप्पन देशचे आणि शहाण्णव कुळींचे पुनर्विवाहासाठीं तयार असलेले लोक त्या दिवाणखान्यांत येऊन नंबरवारीनें आपआपल्या जागेवर बसले होते, व विवाहाचा मंगल वेष धारण करून आणि हातामध्यें ती सौवर्ण पुष्पमालिका घेऊन नववधूप्रमाणें कोकिळाबाई आपल्याला वरण्याकरितां केव्हां येतात, इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. इतक्यांत एकाएकीं त्या दिवाणखान्याच्या भिंतींतील एक लहानसा दरवाजा उघडला आणि त्यामधून कोकिळाबाई बाहेर पडल्या त्या वेळचा त्यांचा पोषाख फारच रमणीय दिसत होता. ईषदीषदविलंबी केसांवरून त्यांनीं मुंडावळ्या बांधल्या होत्या. त्यामुळें त्यांचें स्वरूप फारच मोहक दिसत होतें. त्यांच्याबरोबर कामंदकी या नांवाची एक बाई बाहेर आली. ही बाई फार चतुरस्र होती. ह्या बाईला पुनर्विवाहास तयार असलेले पुरुष आणि तयार असलेल्या स्त्रिया यांच्याबद्दलची सर्व माहिती होती. व या उभयवर्गाच्यामध्यें निरोप पोहोंचविणें किंवा नजराण्यांची ने–आण करणें वगैरे सर्व कामें करण्यांत ही बाई फार कुशल असे. कोकिळाबाई

स्वतः जरी धूर्त होत्या तरी हे छप्पन देशचे आणि शहाण्णव कुळींचे पुनर्विवाहास तयार असलेले जे लोक जमले होते, त्या सगळ्यांची माहिती कोकिळाबाईंना नव्हती. पण ती माहिती स्वयंवराच्या वेळीं मिळणें जरूर असल्यामुळें व ती सर्व माहिती कामंदकीबाईला माहीत असल्यामुळें, इंदुमति जशी आपल्या स्वयंवराच्या वेळीं सुनंदेला आपल्याबरोबर घेऊन निघाली, त्याप्रमाणें कोकिळाबाई कामंदकीला आपल्याबरोबर घेऊन त्या पुनर्विवाहास तयार असलेल्या लोकांच्या खुर्च्यांच्या पंक्तीमधून चालण्याकरितां निघाल्या. त्या वेळीं पुनर्विवाहास तयार असलेल्या लोकांची फारच गाळण उडून गेली. सगळ्यात आपण चांगलें दिसावें, आणि आपलें स्वरूप त्या नववधूच्या अंतःकरणांत शिरावें यासाठीं जो तो प्रयत्न करूं लागला. कोणीं आपल्या कोटाचीं बटणें खुलीं केलीं, कोणीं खुलीं असलेलीं बंद केलीं, कोणीं आपल्या टोप्या सर-सावल्या, कोणीं हातरुमालांनीं तोंडावरील घाम पुसला, कोणी खिशांतील घड्याळें काढून वेळ पाहूं लागले, आणि कोणीं तोंडांतील जळक्या विड्या काड्यांच्या पेटीवर विझवून ते तुकडे सुरक्षित ठेवूं लागले. अशा प्रकारची त्या नवऱ्यामुलांमध्यें गडबड चालली आहे तों कोकिळाबाईचा स्वयंवर-समारंभ सुरू झाला. कामंदकी पुढें चालली आहे, कोकिळाबाई त्यांच्या पाठीमागून जात आहेत, आणि प्रत्येक नवऱ्यामुलाचें वर्णन कोकिळेच्या महितीकरितां कामंदकी सांगत चालली आहे, असा प्रकार सुरू झाला. कामंदकी पहिल्या नवऱ्यामुलाला उद्देशून कोकिळेला म्हणाली, हा तुझ्या मनास येतो काय ? हा मोठा सुधारक आहे. याच्याशीं जर तूं पुनर्विवाह केलास तर तुझे अनेक फायदे होणार आहेत. मुख्य फायदा हा होईल कीं, तुझ्या संसारांत तुला याच्या घरीं पाहुण्यांपासून कधींहि त्रास सोसावा लागणार नाहीं. कारण याचें घर वाळीत टाकलेलें आहे. अथवा तो नको असेल तर हा दुसरा पाहा. हाहि मोठा सुधारक आहे. याच्यापासून मोठा फायदा हा आहे कीं, याच्या घरीं असतांना तुला चोरीबद्दल कधींहि भय बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. कारण याच्या घरामध्यें चहाचे चिनी पेले, आणि बिस्किटांचे जस्ती डबे यांच्याशिवाय कांहींएक नाहीं, ही गोष्ट याच्या गांवांतील सगळया लोकांना ठाऊक झालेली आहे. नंतर पुढें सरून

तिसऱ्या एकाकडे बोट दाखवून कामंदकी म्हणाली, हे कोकिळे, ते वर जर तुझ्या मनास येत नसतील, तर तूं याला अवश्य वर. सासू, सासरा, नणंदा, भावजया वगैरेंचा किती त्रास असतो, हें बायकांना सांगावयाला पाहिजे असें नाहीं. तो त्रास चुकावयाला पाहिजे असेल तर तूं याच्याशीं रममाण हो. कारण, मी अतिशय मोठा सुधारक आहे असें वाटून हा अतिशय बहकून जाऊन भलभलतेंच करूं लागल्याकारणानें याच्या आईबापांनीं आपल्या कुटुंबांतून याला बाहेर हांकलून लाविला असल्यामुळें हा हल्लीं एका मिशनऱ्यांच्या पागेंत एकटाच राहत आहे. असला नवरा मिळणें फार दुर्घट आहे. तरी पण ‘भिन्नरुचिर्हि लोकः’ या न्यायानें जर तुला हा आवडत नसेल, तर हा पलीकडे एक नवरामुलगा बसला आहे—तो पाहा. याच्याशीं लग्न केलें असतां तुझी मोठमोठ्या साहेबलोकांत ओळख होण्याचा फार संभव आहे. कारण हा तुझा भावी नवरा चाकरी मागण्यासाठीं ज्याच्या बंगल्यावर गेला नाहीं असा एकहि साहेब आपल्या देशांत नसेल. अथवा या दुसऱ्या सुधारकाशीं जर तूं लग्न लावशील तर त्यापासूनहि तुझें अनंत कल्याण होणार आहे. हा मोठा शूर आहे, व बैल ज्याप्रमाणें आपल्या पायांखालीं चिखल तुडवितात त्याप्रमाणें यानें हिंदुस्थानांतील सर्व जुन्या चालीरीती आपल्या पायांखालीं तुडवून टाकल्या आहेत. कारण, हा त्यांच्याप्रमाणें कधीं वागत नाहीं. अथवा तुला देवाची पूजा करणें, देवाला जाणें, देवाला नमस्कार करणें, वगैरे गोष्टींचा कंटाळा आला असेल तर तूं त्या पलीकडच्या [illegible] ग[illegible]यामध्यें माळ घाल. कारण, तो प्रार्थनासमाजी आहे. किंवा हा नास्तिक असेल अशी तुला भीति वाटत असली तर तूं याला वरूं नको. त्याच्या शेजारीं बसलेला तुला पसंत पडेल असें मला वाटतें. कारण तो पक्का आस्तिक आहे. कां कीं, त्यानें एक नवीन युक्ति शोधून काढिली आहे. ती अशी कीं, सुधारणेची एकच बाब हातीं घ्यावयाची व बाकीच्या सर्व बाबतींत अगदीं धर्माभिमानी लोकांप्रमाणें वागावयाचें, असा यानें अलीकडे आव घातला आहे. आतां कोकिळे, या दिवसांमध्यें प्रत्येकानें थोडीबहुत सुधारणा आपआपल्या शक्तीप्रमाणें केली पाहिजे. तेव्हां तुला जर जातिभेदाचें बंड मोडण्याची सुधारणा करावयाची असेल, तर तूं त्या पलीकडच्या रांगेंतील खुर्च्यांवर बसलेल्या नवरदेवांना वर. कारण त्यांतील कोणी

गुजराथी आहेत, कोणी तेलंगी आहेत, कोणी परभू आहेत, कोणी कम-अस्सल आहेत, कोणी नेटिव ख्रिश्चन आहेत, आणि कोणी ब्राह्मण आहेत. पण हेहि तुझ्या मनास येत आहेत असें दिसत नाहीं. तेव्हां पुढें चल. तुला दुसऱ्या तऱ्हेचे सुधारक दाखवितें. तुला कदाचित् समाजाची भीति वाटत असेल; आणि आपण एखादा सुधारक नवरा वरिला, आणि त्यानें बोलल्या-प्रमाणें कृति केली तर त्यामुळें आपला समाज विरुद्ध होऊन आपलें विनाकारण नुकसान होईल अशी जर तुला शंका वाटत असेल, तर मी सांगतें या सुधारकाला तूं बेलाशक वर. कारण, हा सुधारक लागोपाठ आज तेरा वर्षें सामाजिक परिषदांमध्यें निरनिराळ्या विषयांवर बोलत आलेला आहे. पण यानें सुधारणेची अमुक एक गोष्ट केली, असा आळ धर्माभिमानी लोकसुद्धां याच्यावर घालण्याला धजणार नाहींत. तेव्हां इतका बोलका सुधारक नवरा तुला दुसऱ्या कोठेंहि मिळायचा नाहीं. वास्तविक पाहिलें असतां सुधारकांच्या अंगांतला हा गुण कांहीं हलका नव्हे. तरी पण तो नवरामुलगा कोकिळेला नाहीं आवडला. झालें ! तेव्हां कामंदकी दोन खुर्च्या पुढें सरून फिरून कोकिळेला म्हणाली—तुला हिमालय पर्वतावर चढणारा नवरा पाहिजे असेल तर याला वर, हिंदुसमाजाला धरणीकंपाचे धक्के देणारा नवरा पाहिजे असेल तर त्याला वर, सब्रगोलंकार करणारा पाहिजे असेल तर त्याला वर, ज्याच्या अंगा-वर वज्रासारख्या अस्त्रांचे प्रहार केले तरी [illegible] नाहींत असा नवरा पाहिजे असल्यास त्याला वर. अशा रीतीनें तिनें कोकिळेला अनेक नवरे दाखविले; परंतु त्यापैकीं तिला फारसे कोणी पसंत पडले नाहींत; व मला यांपैकीं स्वयंवरण्याला कोणीहि एक पसंत पडत नाहीं असें तिनें अखेरीस आपलें मत सर्वांना जाहीर रीतीनें कळविलें, तेव्हां सर्वांना अतिशय दुःख झालें. प्रत्येकाचीं मनापासून इतकीं वर्णनें केलीं तीं सर्व फुकट गेलीं म्हणून कामंदकीलाहि वाईट वाटलें, व छप्पन देशचे जे नवरेमुलगे आपल्या पदरच्या खर्चानें या स्वयंवराकरितां आले होते, त्यांना अगदीं वेड्यासारखें होऊन गेलें; व आतां आपल्या गांवच्या लोकांनीं पुनर्विवाहाची बायको कोठें आहे म्हणून विचारलें तर त्यांना काय सांगावें अशी त्यांना मोठी पंचाईत पडली, व त्यामुळें ते अगदीं चवताळून गेले. आपण इतकी सुधारणा करीत असतां, आणि आपण इतके मोठे सुधारक झालों असत

अजूनहि आपल्याला बायका पसंत करीत नाहींत, म्हणजे आम्ही आतां याच्यापलीकडे सुधारणा तरी करावयाची कशी? असे विचार मनांत येऊन त्यांतील शूर होते ते कोकिळाबाईच्या अंगावर धांवून गेले, आणि आपण पुढें जाण्यासाठीं दुसऱ्यांना मागें ढकलीत ढकलीत त्या नवरदेवांनीं कोकिळाबाईच्या अंगावर अतिशय गर्दी केली, व तिला उद्देशून अनेकजण अनेक बोलूं लागले——आम्ही इतक्या खटपटी करतों तरी आमच्यापैकीं कोणीच तुमच्या मनास येत नाहीं, याचा अर्थ काय? आमच्या महत्कृत्यांना कांहींच किंमत नाहीं कीं काय? आम्हीं केस राखले आहेत, चष्मे लावतों, बूट घालतों, देवाची थट्टा करतों, उपयुक्त चालींविरुद्ध वागतों, धर्माला धाब्यावर बसवितों, जातिभेद मोडला पाहिजे म्हणून बोलतों, पाहिजे त्या निरनिराळ्या जातींचे एकमेकांशीं पुनर्विवाह झाले तरी त्यांचें अभिनंदन करतों, स्वतःचें कांहीं कार्य नसतें तेव्हां समाजाची बिलकुल पर्वा करीत नाहीं, प्रत्येक वर्षीं दगडावर दगड ठेवून आणि खुर्चीवर अध्यक्ष ठेवून सुधारणेच्या सभा भरवितों, सडकून बोलतों, परस्पर लोक सुधारणा करीत असले तर अशीच सुधारणा झाली पाहिजे म्हणून म्हणतों, अशा एक ना दोन हजार गोष्टी आम्ही करीत असतां त्यांचें चीज झालें नाहीं, तर मग त्या करण्यापासून काय उपयोग? असे अनेक शब्द उच्चारून तेथें त्यांनीं बराच गिल्ला केला. जिकडे तिकडे गडबड आणि ओरड सुरू झाली व सगळाच गोंधळ माजून गेला. कोणी हातांत काठ्या घेऊन उठले व एकमेकांवर धांवूं लागले, कोणी खुर्च्यांवर उभे राहिले, कोणाच्या खुर्च्या फाटल्या, आणि कांहीं खुर्च्या मोडल्या. कोकिळाबाई ही स्त्रीजातीची असल्यामुळें तिच्याविरुद्ध इतका दंगा करणें असभ्यपणाचें होय, असें मानणारा एक पक्ष दुसऱ्या पक्षाशीं हातांत काठ्या घेऊन भांडूं लागला. त्यांच्या भांडणांत तेथील हंड्या, झुंबरें छताला टांगलेलीं होतीं त्यांपैकीं बहुतेक जमिनीवर उतरलीं. आज या दिवाणखान्यांत पुनर्विवाहाचा स्वयंवर व्हावयाचा आहे, अशी बातमी पूर्वींच पसरली असल्यामुळें सोडावॉटर, लेमोनेड, व्हिस्की, बर्फ, कोल्डड्रिंक, काड्यांच्या पेट्या वगैरे जिन्नस विकणाऱ्यांचीं दुकानें तेथें बरींच जमा झालीं

होतीं. त्यांच्याहि बाटल्यांपैकीं बऱ्याच बाटल्या रिकाम्या होऊन आणि फुटून जाऊन ह्या भांडणांत कामास आल्या. सगळीकडे गोंधळ आणि अस्ताव्यस्तपणा आणि कलकलाट होऊं लागला. आपल्यामुळें हा सगळा एवढा अनर्थ ओढवत आहे, आणि हें संकुल युद्ध माजून राहिलें आहे, तेव्हां याचें उपशमन आपणच कांहीं तरी केलें पाहिजे असें मनांत आणून जो सुधारक सगळ्यांत पुढें होऊन आणि अतिशय मोठ्यानें ओरडून भांडत होता, त्याचा हात धरून कोकिळाबाईनें म्हटलें कीं, बरें आहे, थांबा; तुमचें म्हणणें मला बरोबर दिसतें. तेव्हां स्वयंवराच्या नियमाप्रमाणें मी तुम्हांला पसंत करतें. आतां तुम्ही आणि मी मिळून पुनर्विवाह लावूं या. हे शब्द बाहेर निघत आहेत न निघत आहेत तोंच मोठ्यानें भांडणारा सुधारक म्हणाला—छे, छे, मी स्वतःकरितां मुळींच भांडत नाहीं. आमच्या घरीं माझ्या वडील मामांच्या पुतणीची काकी आहे तिनें मला अजून पुनर्विवाहाची परवानगी दिली नाहीं, सबब मी आपल्यासाठीं भांडत नाहीं. माझें भांडण तत्त्वासाठीं आहे, व्यक्तीसाठीं नाहीं. हे त्याचे शब्द ऐकून कोकिळाबाईनें दुसऱ्या एका त्यांतील अग्रेसराचा हात धरला. तेव्हां तो म्हणाला, देशाच्या उन्नतीसाठीं असें झालें पाहिजे, असा माझ्या म्हणण्यांतील मुद्दा आहे. आणि पुनर्विवाहाच्या जोडप्याच्या संततीला कुंड गोळक, रंड गोळक वगैरे हलक्या जातीमध्यें न मोडतां, ते सर्व जातींमध्यें श्रेष्ठ होत असें जर सगळा हिंदुसमाज एक कबुलीपत्र मला लिहून देत असेल तर मी हें धाडसाचें, शौर्याचे, देशोन्नतीचें, परोपकाराचें आणि भूतदयेचें कृत्य करण्याला एका पायावर तयार होईन. ' न कर्त्याचा वार शनिवार ' या वर्गापैकीं हें उत्तर ऐकून कोकिळाबाईनें त्याचा हात सोडून दिला, व तिसऱ्या एका सुधारक पुढाऱ्याचा हात धरण्याला ती पुढें सरसावली. इतका प्रकार होत आहे तों त्या दिवाणखान्यांत माजलेली गर्दी बरीच कमी झाली. पूर्वी भांडणाच्या आवेशांत कोकिळाबाईच्या अंगावर जे अगदीं तुटून पडत होते ते हळूहळू एक एक पाऊल मागें घेऊं लागले. दिवाणखान्यांत नवरदेवांची थोड्या वेळापूर्वी जी अतिशय भीड झाली होती तेथें आतां हळूहळू पातळाई दिसूं लागली. पुष्कळांनीं आपल्या घरचा रस्ता सुधारला. ही पुनर्विवाहाची माळ आपल्या गळ्यांत पडली

तर आपलें कसें होईल, आणि आपला छळ झाला तर तो सोसण्याचें आपल्या अंगामध्यें सामर्थ्य कोठें आहे, असे अनेक विचार मनांत येऊन बहुतेकांनीं आपल्यावर पाळी येण्यापूर्वीं येथून पाय काढला. कोकिळा-बाईला ती सर्व सुधारक मंडळी त्या दिवाणखान्यांतून हाकलून लावण्याचा हाच उत्तम उपाय वाटला, व ती सौवर्णमाला घेऊन ज्याच्या त्याच्या-पुढें जाऊं लागली, तेव्हां चट सारे सुधारक "कां हो तुम्ही पळून चाललां" असें एकमेकांस म्हणत तेथून पाय काढून पटापट पळून गेले. आणि आतां या दिवाणखान्यांत रक्तपात होतो कीं काय, अशी ज्याबद्दल भीति पडली होती, तो दिवाणखाना पांच मिनिटांच्या आंत खाली झाला, व तेथें औषधालासुद्धां सुधारक उरला नाहीं.

* * *

# ८. उच्च पर्वताच्या उच्च शिखरावर

( काळ : अग्रलेख, ३०-१०-१९०३ )

१७८१ मध्यें सत्तरींतील राणे व सरदेसाई यांनीं बंड करून त्या प्रान्तांतील फिरंगी लोकांचा अधिकार नष्ट करण्याचा प्रसंग आणला होता. गोवें सरकारनें त्यांना बैठा पगार, मोकाशे, इनामें वगैरे देण्याचें कबूल करून शान्त केलें. १८५२ साली राणे व सरदेसाई यांच्या कांहीं मागण्या गोव्याच्या सुभेदारानें अमान्य केल्या, म्हणून दिपाजी राणे यांच्या [illegible] त्यांनीं फिरून बंड केलें. बंडवाल्यांनीं श्रीमंतांची मालमत्ता लुटली. राण्यांच्या नांवाखालीं लुटारू लोकांनीं पुष्कळ धुमाकूळ घातला. गोव्याच्या सरकारनें लष्करी कायदा जारी करून बंडवाल्यांचा पाठलाग सुरू केला. या वेळीं तिरंगी सैन्यांत देशी लोकांचा मोठा भरणा होता. पाठलाग करतांना सरकारी लोकांची बंडवाल्यांबरोबर गांठ पडली तर ते बंडवाल्यांना पळून जाण्यास संधि देऊं लागले. अनेक बंडवाल्यांना गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. शेवटीं सरकारनें दिपाजीबरोबर तह करून त्यास पेन्शन ठरवून दिलें आणि नंतर बंड शान्त झालें.

पुढील प्रसंग हा एका गृहस्थाच्या आत्मचरित्रांतील एक लहानसा भाग आहे. तरी त्यापासून वाचकांना क्षणभर करमणूक आणि बोध प्राप्त होणार नाहीं असें नाहीं. सदर गृहस्थ म्हणतो :

मी मूळचा गोवें प्रान्तींचा राहणारा. माझी जात ब्राह्मण. लहानपणीं आईबापांनीं घरांत जुन्या चालीचें थोडेंसें शिक्षण मला दिलें होतें; व नंतर पोर्तुगीज सरकारच्या शाळेंत मला थोडेंसें पाश्चिमात्य शिक्षणाचेंहि वळण लागलें होतें. हें आपलें आणि लोकांचें, घरचें आणि बाहेरचें, असें दोन्ही प्रकारचें शिक्षण मिळून मला माझ्या विसाव्या वर्षाच्या सुमारास जगांत

काय चाललें आहे याच्याबद्दल थोडें थोडें कळूं लागलें. मला इतिहास वाचण्याची बरीच गोडी असे. त्यामुळें आपण कोण, आपला देश कोणता, तो हल्लीं कोणत्या स्थितींत आहे, वगैरे गोष्टींबद्दलचेहि विचार तेव्हांपासून माझ्या मनांत येऊं लागले. प्रथमतः हे विचार फारसे वारंवार माझ्या मनांत येत नसत. परंतु इतिहासाच्या पुस्तकांतून मन काढून वस्तुस्थितीचीं पुस्तकें वाचण्याकडे मी आपल्या डोळ्यांचा जसजसा जास्त उपयोग करूं लागलों, तसतसे हे विचार माझ्या मनांत [illegible] मला एक प्रकारचें स्फुरण आलें. माझी दृष्टि विस्तीर्ण झाली. माझ्या आशा अपरंपार झाल्या. आपल्यापुढें कर्तव्यकर्माचें अतिशय मोठें विस्तीर्ण मैदान आहे, व त्यामध्यें आपण स्वैरगतीनें संचार करूं, अशी माझ्या मनाला मोठी उमेद वाटू लागली. परंतु ही मनोराज्याची स्थिति फार दिवसपर्यंत टिकली नाहीं. हळूहळू मला जगाचा अनुभव येऊं लागला; व माझ्या प्रान्तांतील लोकांच्या स्वभावाचें परिज्ञान मला दिवसेंदिवस जास्त येऊं लागलें. आणि त्यामुळें आपल्या मनांतील आशा सफळ होण्याचा कांहीं रंग नाहीं, असें माझ्या मनाला उत्तरोत्तर वाटूं लागलें. हल्लीं सर्वच हिंदुस्थान देश परकीय लोकांचा गुलाम म्हणून राहिला आहे. तेव्हा आतां हिंदुस्थानच्या अमुक एक भागाला शेखी मिरविण्याला विशेष जागा आहे असें नाहीं. परंतु तीन-चारशें वर्षांपूर्वी तशी स्थिति नव्हती. अशा त्या वेळीं गुलामगिरीचा पहिला शिक्का आमच्या गोवें प्रान्तावर बसला ! आम्ही सगळ्यांत पहिले गुलाम ! परकीयांनीं येऊन पहिल्यानें आपलें पाश्चिमात्य राज्य स्थापन करून ज्या प्रदेशाला पावन केलें तो आमचा गोव्याचा प्रदेश होय ! हिंदुस्थानच्या गुलामगिरीच्या रांगेंत अग्रभागीपणाचा मान आम्हांला ! हिंदुस्थानांतील सर्व गुलाम एकत्र बसून गुलामगिरीचे वेदोक्त मंत्र म्हणण्याचा प्रसंग आल्यास 'श्रीमन्महा०' म्हणून सुरुवात करण्याचा अधिकार आमचा ! अल्बुकर्क आणि सेंट झेविअर यांच्या हातांत राज्यविस्तार आणि धर्मप्रसार या दोन बाबतींमध्यें सांपडलेलीं आम्ही मेंढरें किती उत्तम आहों, हें युरोपियन जगाच्या निदर्शनास आणून देऊन, फ्रेंच, इंग्लिश वगैरे लोकांना आम्हीं हिंदुस्थानांत येण्याविषयीं बोलावणें धाडलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं ! आमच्यासारखेच हिंदुस्थानांतील बाकीचे लोक अजागळ आहेत व आमच्यासारखीच हिंदुस्थानांतील

बाकीची जमीन कोपरानें खणली जाण्यासारखी आहे हें आम्हीं इतर पाश्चिमात्य राष्ट्रांना दाखवून दिलें, आम्हीं त्यांना हिंदुस्थानचे बंद असलेले दरवाजे उघडून दिले ! इतकें आमच्या हातून झालें असूनहि आम्ही हिंदुस्थानचें काय काय अकल्याण करण्याला कारणीभूत झालों आहों याची माझ्या देशबांधवांपैकीं कोणालाहि कल्पना येत नाहीं, हें पाहून मला अतिशय वाईट वाटूं लागलें. माझ्या जन्मभूमीनें आपल्याला लागलेला गुलामगिरीचा डाग धुवून टाकण्यामध्यें पहिला नंबर मिळवावा, अशी माझी महत्त्वाकांक्षा होती; परंतु त्याचीं कांहींएक चिह्नें न दिसतां उलट परकीय आणि स्वकीय लोकांच्या कामवासना तृप्त करून पापाचरण वाढविण्याच्या कामामध्येंच माझ्या जन्मभूमीचा पहिला नंबर लागलेला पाहून तर माझी अतिशयच निराशा झाली. आशेपासून निराशा म्हणजे पर्वताच्या शिखरापासून पर्वताच्या पायथ्यापर्यंतचा कडेलोटच होय. ह्या कडेलोटामुळें माझ्या मनाच्या अगदीं चिंधड्या होऊन गेल्या, व स्वदेशांत चैन पडेनासें झालें. तेव्हां घायाळ झालेल्या आणि ठेचलेल्या मनाला औषधोपचार करण्यासाठीं म्हणून उरलेलें आयुष्य तीर्थयात्रा करण्यांत घालवावें असें मनांत आणून मी घरांतून बाहेर पडलों व बरींच वर्षें अशा रीतीनें घालविलीं.

परंतु सुमारें सात-आठ वर्षांपूर्वीं मला अशी बातमी कळली कीं, आपल्या प्रान्तांतील कांहीं शूर मराठे सरदारांनीं गोंव्यामध्यें फिरून आपलें स्वराज्य स्थापन करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. ही बातमी ऐकून फिरून माझी चित्तवृत्ति पालटली व मीं आपल्या जन्मभूमीला परत येण्याचा निश्चय केला. उत्तर हिंदुस्थानांतून कोंकणाच्या सरहद्दीपर्यंत येण्याला मला बरेच दिवस लागले. परंतु अखेरीस मीं आपल्या जन्मभूमीच्या जवळजवळ येत चाललों तेव्हां कोंकण आणि देश यांना एकमेकांपासून विभक्त करणारा सह्याद्रि मला वाटेंत लागला. त्या पर्वतावर चढतां चढतां मी अगदीं थकून गेलों. तरी पण पायांना होत असलेले श्रम तेथील एकदर वनश्रीच्या योगानें माझ्या मनाला फारसे जाणवले नाहींत. एक डोंगर चढून जावें तों दुसरा डोंगर त्याच्यापुढें उभा आहेच, असा क्रम चालला होता. अखेरीस कितीहि डोंगर ओलांडले तरी हे संपावयाचेच नाहींत असें मला वाटूं लागलें. तरी पण मनुष्याची सहनशक्ति ही सर्वांना ओलांडून जाईल

यांत शंका नाहीं. मी निराश न होतां तशीच पुढें वाट चालूं लागलों तरी डोंगरांचीं वळणें संपेनात. दऱ्या, खोरीं, डोंगर, कडे, खिंडी हीं एकामागून एक आपलीं तयारच आहेत ! तशांतच संध्याकाळची वेळहि अगदीं जवळ जवळ येत चालली; आणि मधूनमधून वन्य श्वापदांच्या आरोळ्याहि दुरून ऐकूं येऊं लागल्या. अशा परिस्थितींत माझ्या मनांतील धैर्य संपत आलें तरी पण वाट संपेना. अखेरीस एक दोन वळणांतून वर चढून गेल्यानंतर जवळच मला एक खिंड दिसली व तेथें या उंच पर्वताच्या उंचीचा शेवट झाला असावा असें माझ्या मनानें घेतलें. म्हणून कसाबसा मी तेथपर्यंत एकदांचा गेलों.

मी तेथें गेल्यावर मात्र माझ्या सर्व श्रमांचा परिहार झाला. तेथील एका उंच आणि स्वच्छ अशा खडकावर मी विश्रान्ति घेण्याकरितां बसलों. त्या वेळीं तेथून जी अपूर्व शोभा दिसत होती तिची इतरांना कल्पना येण्याला त्यांनी तसल्याच एखाद्या ठिकाणीं जाऊन बसलें पाहिजे. एवढा वेळपर्यंत माझे डोळे आणि माझी जन्मभूमि यांच्यामध्यें जें एक डोंगरांचें शिखर आड आलेलें होतें, तें एखाद्या रंगभूमीवरील पडद्याप्रमाणें बाजूला सरून जाऊन माझ्या दृष्टीला तेथून किती तरी आल्हादकारक देखावे दिसूं लागले ! त्या डोंगराच्या आडून निघून मी त्या खिंडीच्या तोंडाशीं गेलों, तों माझ्या जन्मभूमीवरून वाहत आलेला वारा मला पहिल्यानें भेटला. त्या माझ्या देशबांधवानें—मी ज्या जन्मभूमींत जन्म पावलों त्याच जन्मभूमींत जन्म पावलेल्या त्या वाऱ्यानें माझ्या सर्व अंगाला आलिंगन दिलें, आणि खऱ्या बंधूप्रमाणें वाटेच्या अतिशय श्रमामुळें माझ्या शिरोभागावर उत्पन्न झालेले घर्मबिंदु त्यानें आपल्या हातानें पुसून टाकिले. त्या वेळीं मला जो आनंद झाला तो काय सांगावा ! या वाऱ्याची झुळूक माझ्या अंगाला लागतांक्षणींच हा माझ्या देशचा वारा म्हणून मीं त्याला ओळखिलें. आणि आपल्या देशबांधवांप्रमाणें मी त्याच्यासंबंधानें प्रेम प्रदर्शित करूं लागलों. मला माझी जन्मभूमि सोडून वीस-पंचवीस वर्षें होऊन गेलीं होतीं. तेव्हां इतक्या अवधीनंतर मला माझ्या जन्मभूमीकडचा वारा भेटला तोदेखील मला अधिक वाटला. अशा रीतीनें ह्या एका प्रथमदृष्ट देशबांधवाची भेट झाल्यानंतर मीं आपली दृष्टि माझ्यासमोर दिसणाऱ्या अफाट आणि

हृदयंगम अशा त्या भूप्रदेशाकडे वळविली. पुष्कळ दिवसांनीं भेटलेल्या त्या वाऱ्यानें आधींच माझी मनोवृत्ति अगदीं उल्लसित होऊन गेली होती. संध्याकाळचा मंद वायु वाहूं लागला असतां त्याजवर लहान मुलांनीं सोडलेला पतंग जसा उच्छृंखल वृत्तीनें वर-खालीं उड्या मारीत असतो त्याप्रमाणें माझ्या मनाची त्या वेळीं स्थिति झाली होती. तो मंजुळ वारा, तो रमणीय प्रदेश, ती शान्त वेळ, तें शून्य स्थान, तें निर्जन अरण्य, आणि ती अद्‌भुत सृष्टिरचना – या सगळ्यांनीं मिळून माझें मन क्षणभर माझ्या पंचभौतिक देहांतून काढून कोणीकडे नेलें होतें, आणि ते त्याचें काय करीत होते याचें मला त्या वेळीं बिलकुल भान नव्हतें. नदीच्या पृष्ठभागावर पुराच्या पाण्यांत उत्पन्न झालेल्या भोंवऱ्यांत जसें एखादें फूल सांपडावें, किंवा जमिनीच्या पृष्ठभागावर दोन दोहोंकडून वाहत येणाऱ्या वाऱ्यांच्या संघर्षणापासून उत्पन्न होणाऱ्या धुळीच्या भोंवऱ्यामध्यें जसें एखादें कोंवळें पान सांपडावें, त्याप्रमाणें तेथील त्या देखाव्याच्या, सौंदर्याच्या आणि शान्ततेच्या भोंवऱ्यामध्यें माझें मन सांपडून तें चक्राकार भ्रमण करीत करीत किती उंच उडालें होतें, आणि त्याची काय दशा झाली होती, याची मला कांहींएक कल्पना नव्हती. तरी पण माझ्या डोळ्यांनीं आपला व्यापार बंद ठेवला नव्हता. आपल्या जन्मभूमीचें पुष्कळ वर्षांनीं फिरून दर्शन होणार म्हणून माझे डोळे अधिक उत्सुक झालेले होते. इतक्यांत त्या खिंडीच्या रूपानें त्या पर्वतानें आपला दरवाजा उघडून त्याच्या दोन फळ्या दोहोंकडे सारून माझी जन्मभूमि मला दाखविली, तेव्हां माझा आनंद माझ्या पोटांत राहीनासा झाला. माझी जन्मभूमि तेथून माझ्यासमोर दिसूं लागली. ज्या नद्यांचें मी अनेक वेळां पाणी प्यालों होतों, ज्यांच्या पाण्याचें माझ्या अंगामध्यें रक्त बनलें होतें, आणि ज्यांच्या पाण्यामध्यें मी लहानपणीं आपल्या सोबत्यांसह शाळेंत जाण्याचें चुकवून पोहत बसत असें, त्या माझ्या जन्मभूमींतील नद्या तेथून मला दिसल्या. परंतु मी जेथें होतों तेथून त्या फार दूर होत्या. त्यामुळें त्यांचे सूक्ष्म झालेले आणि नागमोडी वळणानें वाहत जाणारे प्रवाह मला अगदीं हुबेहूब सर्पाकृति दिसत होते. तसेंच त्या पर्वताच्या शिखरावरून माझें गांव, त्याच्याच पिछाडीला असलेला माझा लहानसा डोंगर, आणि त्यावरचीं माझीं लहान लहान झाडें मीं

पक्षीं ओळखलीं. ज्या देशांतून मी लहानपणीं नाचलों—बागडलों आणि हिंडलों—फिरलों, आणि ज्या शेतांतील धान्यानें माझ्या अंगांतील मांसाची रचना केली, तीं शेतें मीं तेथून पाहिलीं. ह्याच्यापेक्षां पलीकडचें वास्तविक माझ्या डोळ्याला कांहीं दिसत नव्हतें, किंवा माझ्या कानाला कांहीं ऐकूं येत नव्हतें. तरी पण इतक्या अंतरावरून दिसण्याला अशक्य अशा गोष्टी मी पाहत होतों, आणि ऐकूं येण्याला अशक्य अशा गोष्टी मी ऐकत होतों, असें मला वाटलें. तेथून मीं आपल्या घरचीं सर्व माणसें पाहिलीं. वडील माणसांना मीं प्रणिपात केले, आणि माझ्या गुडघ्याशीं येऊन उभ्या राहिलेल्या लहान लहान मुलांना मीं वर उचलून त्यांचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेतलें. मला पाहून हंबरणाऱ्या माझ्या गोठ्यांतील गाईच्या पाठीवरून मीं हात फिरविला, आणि त्यांच्या नवीन प्रसूत झालेल्या कालवडींना पुष्कळ वेळ गोंजारून कोंवळा चारा खाण्याला त्यांना शिकविलें. माझे पूर्वींचे मित्र मला भेटावयाला आलेले मीं पाहिले; व त्यांनीं मध्यंतरीं झालेल्या घडामोडींच्या सांगितलेल्या हकीकती मीं ऐकल्या. आमच्या शेजारचीं-पाजारचीं अनेक वृद्ध माणसें जग सोडून गेल्याची दुःखकारक बातमी मीं ऐकली आणि त्यांच्याऐवजीं माझ्या ओळखीचीं नसलेलीं अशीं अनेक नवीन नवीन लहान मुलें या जगांत आलेलीं मी पाहिलीं. लहान झाडें मोठीं झालेलीं आणि मोठीं झाडें वाळून गेलेलीं, नवीन घरें जुनीं होत चाललेलीं आणि जुनीं घरें नाहींशीं झालेलीं, नवीं शेतें पाडलेलीं आणि जुन्या शेतांचे बांध बदललेले, जेथें पूर्वीं चांगली वाट होती तेथें गवत उगवलेलें आणि नवीन ठिकाणींच वाटा मळलेल्या,—असे माझ्या गांवामध्यें अनेक प्रकारचे फेरफार झालेले मला त्या पर्वताच्या शिखरावरून दिसले !

असा हा सगळा प्रकार मी आपल्या दृष्टीनें आणि कल्पनेनें पाहून मनामध्यें फारच गहिंवरलों. माझी जन्मभूमि ही अजूनहि गुलामगिरीमध्येंच होती; व आपल्या पायांतील गुलामगिरीच्या बेड्या तोडून टाकण्यासाठीं ती कांहीं प्रयत्न करीत नाहीं, म्हणून रागानें संतापून व तिचा त्याग करून आज वीस-पंचवीस वर्षेंपर्यंत मी दूर देशांत राहून तीर्थयात्रा करीत हिंडत होतों. तरी पण प्रत्येक तीर्थाच्या पाण्यांत आपलें मन मलिन वस्त्राप्रमाणें धुवून प्रत्येक देवाच्या चरणीं तें एखाद्या निर्मल पुष्पाप्रमाणें अर्पण करण्या-

मध्यें मी नेहमीं व्यग्र झालेलों असतांनाहि रात्रीं निजलों म्हणजे ज्या जन्मभूमीचीं मला सदोदित स्वप्नें पडत असत, आणि तिच्यावरील परकीय जुलूम पाहून मी स्वप्नामध्येंहि रडत असें, ती माझी जन्मभूमि मला प्रत्यक्ष दिसल्यानंतर माझ्या मनाला काय वाटलें असेल हें मी शब्दांनीं सांगणें शक्य नाहीं. पूर्वीं जशी मला ती प्रियकर वाटत होती, तशीच ती ह्या वेळेसहि वाटली, व तिला उद्देशून माझ्या तोंडून असे उद्गार निघाले कीं, तुझ्यावर परकीयांचा जुलूम होत असला, आणि तूं परकीयांच्या अमलांत असलीस, तरीहि तूं मला माझ्या प्राणाप्रमाणें प्रिय आहेस. तुझ्यावर परकीय लोक जुलूम करताहेत, म्हणून तर मीं तुझ्याबद्दल मनामध्यें जास्त प्रेम बाळगून तुला तुझ्या हालांतून सोडविण्याचा जास्तच प्रयत्न केला पाहिजे. तो प्रयत्न माझ्या हातून सफल झाला नाहीं, तर तूं माझ्या ज्या असंख्य देशबांधवांना जन्म दिला आहेस, आणि ज्यांच्या शरीरांतील हाडें हीं तुझ्यांतील तत्त्वांपासून बनलेलीं आहेत, त्यांच्यापैकीं कोणी तरी तुझे पांग फेडणारा निघेल यांत शंका नाहीं. अशा रीतीनें माझ्या जन्मभूमीचें शान्तवन करून मीं आपली दृष्टि दुसरीकडे वळविली.

मी ज्या ठिकाणीं उभा होतों, त्या ठिकाणावरून पाहिलें असतां पृथ्वी आणि आकाश यांच्या बहुतेक मध्यभागीं मी होतों असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतक्या उंच ठिकाणावर चढून गेलेल्या मनुष्याचें लक्ष पूर्वसंबंधानुसार पृथ्वीतलाकडे कांहीं वेळपर्यंत लागलें तरी तें आकाशांतील आणि आसपासच्या सृष्टिसौंदर्याकडे फिरून माघारें वळणार नाहीं, हें अगदीं अशक्य आहे. पृथ्वीतलावरून माझें मन निघून आसमंतात् पसरलेल्या व भूतलापासून तों गगनतलापर्यंत भरून राहिलेल्या सृष्टिचमत्कारांकडे लागलें. माझा देह जड आहे, ही कल्पना मी क्षणभर विसरलों, आणि तेथें स्वैर गतीनें संचार करणाऱ्या वाऱ्याप्रमाणें मीहि जिकडे तिकडे फिरत आहें असें मला वाटलें. त्या स्थळाचा अद्भुतपणा पाहून माझें डोकें भ्रमण पावूं लागलें. मी जेथें उभा राहिलों होतों, तेथून मला दोन-तीनशें तरी दऱ्या दिसत होत्या. एखाद्या गर्विष्ठ माणसाप्रमाणें आपल्या माना वर करून माझ्याभोंवतीं डोंगर तर किती बसले होते, याची गणना त्या माझ्या गोंधळून गेलेल्या मनाला मुळींच करतां येईना. तसेंच कित्येक

डोंगरांच्या शिखरांवरून मोठमोठ्या राजांनीं बांधलेले किल्लेच पांच-पन्नास मला दिसत होते पूर्वीच्या राजांनीं एकहि असा डोंगर ठेवला नव्हता कीं, जेथें माऱ्याची जागा असून त्यांनीं त्यावर किल्ला बांधला नव्हता. जिकडे पाहावें तिकडे डोंगर, किल्ले, कडे, दऱ्या, खोरीं यांच्याशिवाय दुसरें कांहीं दिसतच नव्हतें. दऱ्यांतून आणि खोऱ्यांतून संध्याकाळचा काळोख भरत चालला होता; आणि कांहीं किल्ले व डोंगरांचीं शिखरें यांच्यावर मला अस्तास जात चाललेल्या सूर्याच्या प्रकाशाचीं कांहीं चिन्हें दिसत होतीं. परंतु संध्याकाळचा काळोख आणि धुकें यांच्यायोगानें सूर्यबिंब बहुतेक निस्तेज होऊन गेलें होतें; व एखाद्या ओसाड दिवाणखान्यांत एकटीच हंडी लावून ठेवलेली असावी, त्याप्रमाणे त्या शून्य आकाशाच्या छता-पासून खाली लोंबत असलेल्या सूर्यबिंबाची स्थिति झालेली होती. त्या वेळीं आकाशांत कोणीहि नव्हतें. रात्रीचीं नक्षत्रें अजून दिसूं लागलेलीं नव्हतीं. येथून तेथून सर्व आकाश अगदी शून्य आणि भयाण दिसत होतें. आकाशांत संचार करणारे पक्षीहि तेथें कोणी दृष्टीस पडत नव्हते. बहुत-करून संध्याकाळ जवळ आल्यामुळें न संपणाऱ्या आकाशमार्गांत चालून चालून दमून ते आपापल्या घरट्यांतून स्वस्थ जाऊन बसले असावेत. सारांश, माझ्याशिवाय त्या सगळ्या प्रदेशामध्यें दुसरें कोणीहि नव्हतें. त्या पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या खेडेगांवांतील एखाद्या कुत्र्याच्या भुंकण्याचा मात्र ध्वनि एखादे वेळीं मध्येंच कानावर येई. याशिवाय त्या विस्तीर्ण प्रदेशामध्यें दुसरा कसलाहि आवाज ऐकूं येत नव्हता, किंवा दुसरा कोणी मनुष्य दृष्टीस पडत नव्हता. तें शून्य आकाश, तें निस्तेज सूर्यबिंब, ती आकाशांतील अफाट पोकळी, ती पर्वतांचीं उंच उंच शिखरें, ते राजानीं बांधलेले जुनाट किल्ले, त्या डोंगराच्या पोटांतील खोल खोल दऱ्या, त्या दऱ्यांच्या पोटांतून वर उसळत येणारा काळोखाचा लोट, तो पृथ्वीतलावर पसरलेला भयाणपणा, आणि त्यांतच माझी जन्मभूमि पाहून मनावर झालेले ते संस्कार, ह्या सगळ्यांच्या मध्यभागीं संध्याकाळच्या वेळीं मी एकटा उभा राहिलों असतां त्या वेळीं माझी काय स्थिति झाली असेल हें सांगतां येणें फार कठिण आहे. तो देखावा पाहून परमात्म्याचें विश्वस्वरूप माझ्यापुढें पसरलें आहे असें मला वाटलें. ही जी

अवाढव्य जड सृष्टि माझ्यासभोंवतीं पसरलेली होती, ती सर्व चैतन्यमय आहे असें मला भासूं लागलें. पर्वत पर्वताशीं बोलत आहेत, किल्ले त्यांना माना डोलवीत आहेत, आकाशाच्या पोकळींतील प्रत्येक परमाणु चैतन्ययुक्त होऊन नाचत आहे, वारे आकाशांतील निरोप घेऊन ते सांगण्याकरितां पृथ्वीकडे धांव घेत आहेत.–असा मला भास झाला. बाहेरची अद्भुत सृष्टिरचना पाहून माझ्या आंतील मन डळमळूं लागलें. माझ्यासभोंवतीं जीं पंचमहाभूतें आपलें अक्राळविक्राळ स्वरूप प्रकट करून सर्वत्र पसरलीं होतीं, त्यांना या माझ्या पंचभौतिक देहांतील पंचमहाभूतांनीं ओळखिलें. जीं हीं बाहेर इतक्या स्थूल रूपानें पसरलेलीं आहेत, तींच आपण सूक्ष्म रूपानें या शरीरामध्यें कोंडलेलीं आहों अशी त्यांची खात्री झाली, आणि त्या पंचमहाभूताच्या या ज्या लहान लहान कुप्या भरून परमेश्वरानें माझ्या शरीरांतील नाड्यांतून निरनिराळ्या ठिकाणीं ठेवल्या होत्या त्या सर्व कुप्या ताड्कन् फोडून टाकून माझ्या शरीरांतील सूक्ष्म पंचमहाभूते जणूं काय माझ्यासभोंवतीं बाहेर पसरलेल्या त्या स्थूल पंचमहाभूतांच्या समुद्रामध्यें एकतानता पावून जातात कीं काय, असें मला वाटलें. अशी स्थिति झाल्यामुळें माझा देहावरील अभिमान गळला. माझ्यांत आणि माझ्याबाहेर सर्व एकच आहे, अशी चित्तवृत्ति झाल्यामुळें माझ्या मनाची भीति उडून गेली. माझ्या पायांखालीं जमिनीचा आधार आहे, असा मला भास झाला. मी पर्वताच्या शिखरावरून खालीं पडेन, ही माझी स्मृति नाहींशी झाली, व मी वाऱ्याप्रमाणें आकाशाच्या पोकळींत तरंगत आहें, असा मला भास झाला. मी पर्वताच्या शिखरावरून खालीं पडेन, ही माझी भ्रान्ति लयाला गेली. कारण खालीं पडणार कोठून? आणि काय खालीं पडणार? खालीं म्हणजे काय, आणि वर म्हणजे काय? आणि जर याबद्दल मला भीति वाटावी तर मग तशीच ती त्या पर्वतालाहि कां वाटूं नये? असे प्रश्न माझ्या मनांत उद्भवूं लागले. मी त्या पंचमहाभूतांशीं एकरूप झालों. मी आपलेपणा विसरून गेलों. त्या योगानें माझ्यामध्यें अष्टसिद्धींच्या योगानें उत्पन्न होणारें अणिमालघिमादिकांचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे, असें मला वाटूं लागलें. मी आकाशासारखा सर्वव्यापी होईन, मी वायूसारखा सर्वत्र संचारी होईन, मी सूर्यासारखा प्रकाशमान्

होईन, मी जलासारखा पाहिजे तिकडे वाहत जाईन, किंवा पृथ्वीसारखा सर्वांना आधारभूत होईन, मी जें पाहिजे तें करीन, असें मला वाटूं लागलें. योगसाधनानें, प्राणाच्या अवरोधानें, आणि इडापिंगलांच्या नियमनानें असली दिव्य शक्ति पुष्कळ अभ्यासानंतर प्राप्त होते म्हणून म्हणतात. परंतु त्या दिव्यशक्तीचा एक नवीनच दरवाजा या वेळीं माझ्यापुढें उघडला. शुद्ध सत्त्वगुण माझ्या चित्तवृत्तींत प्रकाशित होऊन बाहेरचें सर्व विश्व हें मीच आहे, आणि मी हेंच बाहेरचें विश्व आहे, असें मला दिसू लागलें. त्यामुळें सर्व भेदभाव निरास पावला, आणि त्या पर्वताच्या शिखरावर मींच निर्माण करून घेतलेल्या त्या सुखाच्या समुद्रांत मी क्षणभर अत्यत आनंदानें पोहत राहिलों.

मला या वेळीं होत असलेला हा आनंद दुसऱ्या कोणाला तरी अनुभवण्याला द्यावा, अशी इच्छा होऊन मीं आपल्या आजूबाजूला पाहिलें. मीं आपल्या आवडत्या माणसांना मोठमोठ्यानें हांका मारल्या. मीं आपल्या जिवलग स्नेह्यांना मोठ्या आदरानें बोलाविलें. कोणी तरी तेथें येऊन त्या सुखाचा अनुभव घ्यावा अशी माझी इच्छा होती. पण तेथें कोण येणार ? माझ्याजवळ कोणीहि नव्हतें, व माझ्या हांका कोणालाहि ऐकूं जाण्यासारख्या नव्हत्या. परंतु मला अशी खात्री वाटत होती कीं, त्या ठिकाणीं येऊन तें परमेश्वराचें विश्वस्वरूप जर कोणी पाहते तर ते साधूच बनले असते, जीवन्मुक्त झाले असते, त्यांचीं हीं संसारबंधनें तुटून ते ह्या दुःखांच्या यातनातून उद्धरून गेले असते ! कारण या ठिकाणावरून ससारांतील मनोविकार तुच्छत्व पावून कसे निरसून जातात, याचा अनुभव मलाहि येत होता. एका दोन-चार पैशांच्या किंमतीच्या जिनसासाठी माझें कांहीं दिवसांपूर्वीं दुसऱ्या एका इसमाशीं भांडण झालें होतें, व त्यामुळें मी त्याच्यावर क्रुद्ध होऊन त्याचा द्वेष करीत असें. त्या प्रसंगाची मला येथें आठवण झाली, तेव्हां तो प्रसंग मी प्रस्तुतच्या या प्रसंगाच्या शेजारीं आणून मांडिला. तेव्हां माझ्या मनाची काय स्थिति झाली ! मला आपल्या पूर्वीच्या राग, द्वेष आदिकरून मनोविकारांबद्दल शरम वाटूं लागली व हसूं येऊं लागलें. मीं आपल्या मनाशीं म्हटलें, एवढी थोरली संपत्ति माझ्यापुढें असतां मी यःकश्चित् चार दिडक्यांच्या जिनसासाठीं वेड्यासारखा काय भांडत बसलों होतों ? हें सर्व परमेश्वराचें ऐश्वर्य, ही

दिव्य विभूति, हें निरतिशय प्रेम, हीं सर्व माझीं असतां एका क्षुद्र वस्तूसाठीं मीं लोभ धरावा, ती न मिळाली म्हणजे दुसऱ्यावर क्रोध करावा, आणि त्या क्रोधामुळें त्याचा द्वेष करण्याला प्रवृत्त व्हावें, हें केवढें अज्ञान आहे ! अशा विचारानें माझे मनोविकार गळून गेले, माझा अहंभाव निरसन पावला, माझ्या सांसारिक वासनांचे ओघ आटून गेले, आणि माझ्या ऐहिक बंधनाच्या शृंखला तुटून पडल्या. संसारात मिथ्या स्पृहणीय वाटणाऱ्या गोष्टींसंबधानें अशा रीतीनें दृष्टि फिरून जाऊन निर्विकार झाल्यानंतर मी ज्या ईश्वरी साम्राज्याच्या गादीवर जाऊन बसलों तेथून या जगाकडे जेव्हां मी पाहूं लागलों, तेव्हां या कुलुंग्या सार्वभौमांचीं साम्राज्यें, अत्यंत साहसी राष्ट्रांचे अतिशय वाढलेले म्हणून समजले जात असलेले व्यापार, श्रीमंतांच्या संपत्त्या, राजाचे राजवाडे वगैरे सर्व वस्तु अत्यंत क्षुद्र, तुच्छ, आणि घाणेरड्या दिसूं लागल्या. अशा प्रकारचा या स्थानाचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला, व तेव्हां ही गोष्ट माझ्या मनांत आली कीं, त्रिपथी, गिरनार, अबू, गंगोत्री, बदरीकेदार वगैरे ठिकाणच्या यात्रा करण्याविषयीं आपल्यामध्यें जें सांगितलें आहे, त्यांतील वर्म हेंच होय, कीं बदरिकाश्रमाला जाऊन नारायणाचें दर्शन घेतलें म्हणजे मनुष्य मुक्त होतो. तो कसा होतो, याची प्रतिक्रिया या वेळीं माझ्या मनांत पूर्णपणें ठसली. आणि या स्थळीं मला आणून अशा प्रकारचें ज्ञानामृत पाजून ज्या परमेश्वरानें मला ही दिव्य दृष्टि दिली, त्याचे आभार मानण्याकरितां फिरून मीं आपलें मन एकाग्र केलें. डोळे उघडे असून मला बाहेरचें कांहीं दिसत नाहींसें झालें. माझ्या हृदयाकाशांतील संकुचित जागा बाहेरील आकाशाप्रमाणें विस्तृत झाली. तेथें अंधकार होता तो हळूहळू नाहींसा होत जाऊन तो सर्व प्रदेश पूर्व दिशेप्रमाणें तेजोमय झाला. आणि त्यामध्यें मला माझ्या इष्ट देवतेची मूर्ति क्षणैक दृश्यमान् होऊन निरुपम सुखाचा मी अनुभव घेऊं लागलों.

परंतु दुर्दैवानें ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. मी जेथें होतों त्याच्या खालच्या एका दरींतून एकाएकीं बंदुकीचे कांहीं आवाज ऐकूं येऊन त्यानीं माझ्या समाधीचा भंग केला. मीं डोळे उघडून पाहिलें, तों बंदुकीच्या धुराचे लोट माझ्याहि डोळ्यांच्या वर चाललेले मला दिसले. तो धूर दिसतो आहे, तोंच गडबडीनें डोंगर चढून वर येत असलेल्या लोकांचीं पावलें ऐकूं

येऊं लागलीं. तेव्हां मीं खालीं पाहिलें, तों त्या डोंगरांतून अनेक लोक आपला प्राण बचावण्यासाठीं सैरावैरा पळत सुटलेले माझ्या दृष्टीस पडले. त्यांतील एकजण मी बसलों होतों तेथेंच धापा टाकीत आला. त्याच्या तोंडून हा काय प्रकार आहे तें सर्व मला कळलें. दादा राणे वगैरे मंडळींनीं पुढाकार घेऊन गोव्यामध्यें राज्यक्रान्ति करण्याचा जो घाट घातला होता, तो आपल्या लोकांच्या कमकुवतपणामुळें, नवीन शस्त्राच्या अभावामुळें आणि आपसांतील फितुरीमुळें सर्वस्वीं कसा फसला, याची हकीकत मला कळली. मी त्याला आणखी कांहीं प्रश्न विचारणार, तों तो पाठलाग करणाऱ्या शत्रूच्या भयानें पळून जाऊन कोठें दिसेनासा झाला. तेव्हां आपल्या जन्मभूमीची मीं येथूनच शेवटची भेट घेतली, आणि आपले इष्ट हेतु सिद्धीस जाण्याकारिता परमेश्वर प्रसन्न करून घ्यावा म्हणून मीं फिरून आपल्या तीर्थप्रवासाला पूर्वींप्रमाणें सुरुवात केली.



# ९. शिवाजीचें पुण्याहवाचन

( काळ : अग्रलेख, ९-९-१९०४ )

द्रौपदी—क एष यज्ञः ।
भीमः—रणयज्ञः । तथाहि ।

चत्वारो वयमृत्विजः स भगवान् कर्मोपदेष्टा हरिः
संग्रामाध्वरदीक्षितो नरपतिः पत्नी गृहीतव्रता ।
कौरव्याः पशवः प्रियापरिभवक्लेशोपशान्तिः फलं
राजन्योपनिमंत्रणाय रसति स्फीतंयशोदुंदुभिः ॥ —वेणीसंहार

शिवाजीचा शिवनेरी किल्ल्यांत आपली आई जिजाबाई हिच्या पोटीं जन्म होऊन आणि गुरु दादोजी कोंडदेव यांच्या हाताखालीं त्याचें थोडें-बहुत शिक्षण होऊन त्याला समजूं लागलें, तेव्हां त्याच्या दृष्टोत्पत्तीस पहिली गोष्ट आली ती ही कीं, आपला देश परतंत्र आहे. परिस्थितीच्या ज्ञानानें त्यांचे डोळे उघडले त्या वेळीं त्याला पहिल्यानें जी गोष्ट दिसली ती ही कीं, आपला हिंदुस्थान देश दुसऱ्यांच्या ताब्यांत आहे. तो जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे त्याला हिंदुस्थानच्या गुलामगिरीचीं चिन्हें दृग्गोचर होत. तो ज्या जमिनीच्या तुकड्यावर पाऊल टाकावयाला जाई, तो तो तुकडा दुसऱ्यानें बळकावून घेतलेला आहे असें त्याला कळे. ज्या पर्वतावर चढावें, त्या पर्वतावरील किल्ल्यावर दुसऱ्याचें निशाण आधींच चढून बसलेलें त्याला आढळून येई. एखाद्या नदीचें पाणी प्यावयाला जावें, तर तेंसुद्धां पारतंत्र्याच्या चिखलानें गढूळ होऊन गेलेलें त्याच्या नजरेस पडे. सूर्याचे निष्कलंक किरण हिंदुस्थानच्या [illegible] प्रवेश करून येऊं लागले, म्हणजे ते परकीय अंमलाच्या काळ्याकुट्ट काजळानें अत्यंत मलिन होऊनच खालीं उतरतात कीं काय, असा त्याला भास होई. वाऱ्याची जी जी झुळूक येई, ती ती गुलामगिरीच्या दुर्गंधीनें दूषित झालेली आहे, असें त्याच्या घ्राणेंद्रियाला वाटे, आणि हिंदुस्थानावर जें आकाश होतें, तेंसुद्धां परदास्याच्या ओंगळ डागांनीं सर्व बाजूंनीं डागळून गेलेलें आहे, असें

आकाशाकडे पाहिलें म्हणजे त्याला उपलब्ध होई. हिंदुस्थानांतील प्रत्येक घर म्हणजे बंदिखाना, प्रत्येक मनुष्य म्हणजे गुलाम, प्रत्येक रोजगारधंदा म्हणजे गुलामगिरीची शृंखला, प्रत्येक द्रव्यसंचय म्हणजे दरवडेखोरांची मालमत्ता, प्रत्येक देऊळ म्हणजे परधर्मीय प्रार्थनामंदिराच्या पायाचे दगड, प्रत्येक गाय म्हणजे परकीयांच्या मेजवानीचें पक्वान्न, आणि प्रत्येक स्त्री म्हणजे परकीयांच्या कामवासनेच्या जुलमाचें पात्र, अशा प्रकारची आपल्या हिंदुस्थान देशाची स्थिति झालेली पाहून शिवाजीच्या मनाला फारच वाईट वाटूं लागलें, व या भयकर पारतंत्र्याचा आपण कांहीं तरी प्रतिकार केला पाहिजे, एरवीं आपला जन्म व्यर्थ आहे, असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. त्याप्रमाणें सुदैवानें त्याला साहित्यहि मिळूं लागलें. आपलें गेलेलें राज्य परत कसें मिळवावें हें समजण्यासाठीं त्यानें पूर्वींचे इतिहास आणि कथा-पुराणें ऐकिलीं. आपल्या देशाच्या शत्रूला चोहोंकडून कसें घेरीत आणावें, आणि त्याला माऱ्याच्या जागेंत गांठून कसें ठोकावें, हें समजण्याकरितां त्यानें परिश्रमानें शिकारीमध्यें कौशल्य सपादन केलें. आपल्या जन्मभूमीच्या शत्रूच्या अंगची रग जिरविण्याकरितां आणि त्यांचा क्षय करण्याकरितां त्यानें आपल्या शरीरामध्यें अपार शक्तीचा संचय करून ठेविला. बाजी पासलकर, येसाजी कंक आणि तानाजी मालुसरे यांच्यासारखे मित्र, आणि सह्याद्रीच्या खोऱ्यांतील शूर, कंटक आणि प्रामाणिक अशा मावळे लोकांसारखे शिपाई त्यानें हिंदुस्थानावर स्वतंत्रतेचें निशाण उभारण्याकरितां आपल्याभोंवतीं जमा केले, व अशा प्रकारची सर्व तयारी झाल्यानंतर हिंदुस्थानांत हिंदुपदपातशाही स्थापन करण्याच्या प्रयत्नाचा उपक्रम त्यानें सुरू केला.

वर दिलेल्या ‘ वेणीसंहारा ’मधील भाषणांत भीमानें वर्णन केल्याप्रमाणें शिवाजीनें आरंभिलेलाहि एक रणयज्ञच होता. शिवाजी हा त्या यज्ञांतील यजमान, आणि त्याची भवानी तरवार ही यजमानपत्नी होय. सर्व महाराष्ट्र देश हें त्या यज्ञाचें स्थंडिल व्हावयाचें होतें. श्रीसमर्थ रामदास आणि श्रीसाधुवर्य तुकारामबुवा हे त्या रणयज्ञाचें कर्म निर्दोष रीतीनें कसें चालवावें ह्याविषयीं उपदेश करणारे व्हावयाचे होते. त्या रणयज्ञाच्या

होमकुंडामधून निघणाऱ्या ज्वालांमध्यें हिंदुस्थानचें दुःख, दारिद्र्य आणि पारतंत्र्य यांचें हवन करावयाचें होतें, आणि हिंदुस्थान देशाचें स्वातंत्र्य हें फळ यज्ञभोक्ता आणि यज्ञस्वरूपी जो नारायण त्यांच्यापासून सर्व हिंदुस्थानाकरितां संपादन करून घ्यावयाचें होतें. अशा प्रकारच्या ह्या अत्यंत पवित्र, अत्यंत धार्मिक, आणि अत्यंत लोकोपकारी रणयज्ञाला सुरुवात करण्याच्या पूर्वीं ह्या धर्मकृत्याच्या अंगभूत असें जें अवश्य आणि आदि-कर्तव्य पुण्याहवाचन तें एके दिवशीं फार अद्भुत रीतीनें घडून आलें. त्याचें वर्णन आज येथें देण्याचें आम्हीं योजिलें आहे.

शालिवाहन शक १५६८ या वर्षीं पुढें शिवाजीनें तोरणा किल्ला हस्तगत करून घेऊन भावी महाराष्ट्रीय स्वातंत्र्यमंदिराचें तोरण उभारलें. परंतु त्याच्या आधीं एके दिवशीं सहजगत्या शिवाजी मोठ्या पहाटेस उठून, स्नानादिक मंगल क्रिया आचरून, सह्याद्रीच्या एका शिखरावर चढला. तें शिखर बरेंच उंच होतें. त्या शिखरावर जे दर्भ उगवलेले होते, त्यांनीं बनलेल्या त्या स्वाभाविक दर्भासनावर शिवाजी पूर्वेकडे तोंड करून क्षणभर विश्रान्ति घेण्याकरितां बसला. अतिशय उंच उंच वाढलेलीं झाडेंसुद्धां तेथून अतिशय खोल दिसत होतीं, आणि आपल्याकडून आकाशांत फार उंच भराऱ्या मारणारे पक्षीसुद्धां तळच्या जमिनीवरच चालत आहेत कीं काय, असा त्या उंच शिखरावरून भास होई. तळचीं माणसें तेथून खुजीं दिसत, शेतकऱ्यांनीं लावलेलीं [illegible] शेतें कारागिरांनीं तयार केलेल्या नीटनेटक्या व नक्षीदार गालिच्याप्रमाणें भासत, आणि विस्तीर्ण नद्या अत्यंत सूक्ष्म अशा रजतधारेची बुद्धि उत्पन्न करीत. अशा त्या उंच पर्वतावरून भोंवतालचा प्रदेश दृग्गोचर होत होता. परंतु प्रातःकाल नुकताच होत चालला असल्यामुळें अगदीं क्षितिजाजवळचे प्रदेश मात्र किंचित् किंचित् अंधुक दिसत होते. आकाशावरचाहि रात्रीचा अंमल हळूहळू नाश पावत चालला होता. नक्षत्रें निस्तेज होऊन बहुतेक दिसेनाशींच झालेलीं होती. चंद्र मात्र आकाशाच्या मध्यभागीं एकटाच आपल्या अस्तसमयाची वाट पहात बसला होता, व त्याच्याकडे पाहिलें असतां स्वर्गातील एखाद्या देवाचा हा सुवर्णमय रथ आहे कीं काय, किंवा एखादा कांचनदेही राजहंस पक्षी आकाशगंगेच्या स्वच्छ उदकामध्यें प्रातःस्नान करून पोहत

बसला आहे कीं काय, असा भास उत्पन्न होई. त्या अरण्यांत जिकडे तिकडे फुलें फुलून त्याचा परिमल सर्वत्र पसरला होता. जमिनीवर गाई चरत होत्या आणि हरिणें उड्या मारीत होतीं, व आकाशांत पक्षी सुस्वर गाणीं गात होते. प्रभातकाळचा मंद आणि मंजुळ वारा सुटला होता. दिशा प्रसन्न झालेल्या होत्या. आकाश स्वच्छ दिसत होतें. पूर्वीं सर्व ब्रह्माण्डगोलावर जिनें आपला काळा पडदा पसरिला होता ती रात्र आतां, आपला तो काळा पडदा गुंडाळून घेऊन पार नाहींशी झाली होती, आणि जिकडे तिकडे प्रकाशाचा अंमल बसत चालला होता. असा तो रमणीय देखावा पाहून शिवाजीला अत्यंत आनंद झाला. परंतु त्याच्याचबरोबर त्याला अतिशय वाईटहि वाटलें. हा प्रदेश इतका सुंदर दिसत आहे याबद्दल त्याला आनंद झाला, परंतु हा आपला असून दुसऱ्याच्या ताब्यांत आहे, म्हणून त्याला अतिशय वाईट वाटलें. त्या सगळ्या सृष्टिसौंदर्यावर परतंत्रपणाचें काजळ फांसलेलें पाहून त्याला अतिशय खेद झाला. त्या रमणीय देखाव्यांतील प्रत्येक वस्तूवर 'गुलाम' हीं अक्षरें खोदलेलीं वाचून त्याची छाती फाटून गेली. हीं शेतें दुसऱ्यांच्याकरितां पिकत आहेत! ह्या नद्या दुसऱ्यांच्यासाठीं वाहत आहेत! ह्या गाई परकीयांच्या क्षुधाशमनासाठीं पुष्ट आणि मांसल होत आहेत! आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंगांतील तल्लखपणा शिकारीच्या योगानें वृद्धिंगत करण्यासाठीं हीं हरिणें चपळपणाची संवय करीत आहेत! आकाशतलालाहि आपलें मस्तक नेऊन भिडवावयाचें अशी उच्चत्वाविषयीं ज्यांची महत्त्वाकांक्षा अशा ह्या मोठमोठ्या विस्तीर्ण वृक्षांच्या पोटामध्यें दुसऱ्यांच्या चैनीचे पलंग, खुर्च्या आणि त्यांच्या वैभवशाली इमारतींचे खांब! आपल्या देशबांधवांच्या रक्ताच्या दुर्गंधीनें ज्यांना पीडा होत आहे, अशा परकीय लोकांच्या घ्राणेंद्रियांच्या संतर्पणासाठीं हीं सुवासिक पुष्पें! आणि आमची कत्तल करून त्यांना कंटाळा आला म्हणजे त्यांचें मनोरंजन करण्यासाठीं कोकिळा, साळुंकी, पोपट, चंडोल वगैरे हे सुस्वर गायन करणारे पक्षी! हिंदुस्थानांतील देवांचीं देवळें पाडण्याच्या कामीं झालेल्या श्रमांमुळें उत्पन्न होणाऱ्या घर्मबिंदूंच्या परिहरणासाठीं हे थंडगार वारे! आणि हिंदुस्थान देशाच्या पायांत दररोज पारतंत्र्याच्या नवीन नवीन शृंखला अडकविण्याच्या कामीं आमच्या शत्रूंना नवीन उमेद

आणून देण्यासाठीं हे प्रभातकाळ ! अशी परतंत्र देशांतील जी जी वस्तु पाहावी ती ती दुसऱ्याच्या हितासाठीं. अशा प्रकारची आपल्या जन्मभूमीची दुर्धर आणि दुःसह अवस्था पाहून [illegible] अंतःकरणाचें पाणीच होऊन गेलें; व "आपल्या देशाची अशी स्थिति राहतां कामा नये. आपल्या जन्मभूमीला गुलामगिरी म्हणजे आपल्या तोंडाला काळोखीच होय. ही आर्यभूमि स्वतंत्र झालीच पाहिजे ! आपल्या देशबांधवांच्या पायांतील पारतंत्र्याच्या शृंखला तोडून टाकण्याची इच्छा माझ्या मनामध्यें उत्पन्न होत आहे. ती माझी इच्छा सर्व देवतांनीं परिपूर्ण करावी !" असे उद्‌गार शिवाजीच्या तोंडून निघाले. ती सकाळची प्रसन्न वेळ, ती पृथ्वीच्या पृष्ठापासून तों आकाशाच्या तलापर्यंत सर्वत्र पसरलेली शान्तता, तें त्या उच्च पर्वतावरील एकान्तस्थान, आसमंतात् पसरलेला तो विस्तीर्ण प्रदेश, हिंदुस्थान देशाची त्या वेळची ती दुःखकारक स्थिति, आणि शिवाजीच्या अंतःकरणासारखें तें प्रेमळ, सात्त्विक आणि धीरोदात्त अंतःकरण, इतकी सामग्री एकत्र झाल्यानंतर त्या अंतःकरणाची एकतान वृत्ति होण्याला काय उशीर लागणार ? सर्व बाह्येंद्रियांची कृति स्तब्ध पडून त्यांतून पसरलेला चैतन्याचा अंश मनामध्यें एकवटला. योगबलावांचूनहि समाधि लागली, आणि आवाहनाच्या वेदोक्त मंत्रांवांचूनहि वैदिक देवता आशीर्वाद देण्यासाठीं शिवाजीच्यापुढें अवतीर्ण झाल्या. शिवाजी आपल्या आर्यभूच्या उद्धारार्थ जो रणयज्ञ आरंभिणार त्या रणयज्ञाच्या पुण्याहवाचनाचा हा प्रसंग प्राप्त झाला आहे असें पाहून सर्व देवता त्याच्या अभीष्टचिंतनासाठीं आणि आशीर्वचनासाठीं तेथें आविर्भूत झाल्या. हरि, हर आणि हिरण्यगर्भ हे अवतीर्ण झाले. षडंगसहित ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे आपापल्या सामर्थ्यासह प्राप्त झाले. ऋद्धि-बुद्धिसहित सांग, सपरिवार, सायुध आणि सशक्तिक, गणांमध्यें श्रेष्ठ, कवींमध्यें कवि, आणि ज्याच्या कृपादृष्टीवांचून कोणतेंहि कार्य करतां येणार नाहीं असा महागणपति तेथें अवतरला. वरुणदेवता मूर्तिमंत पुढें येऊन उभी राहिली. अग्नीला पुढें करून विश्वेदेव आले. इंद्राला पुढें करून मरुद्‌गण प्राप्त झाले. माहेश्वरीला पुढें करून सर्व मातृगण हजर झाले. वसिष्ठाला पुढें करून सर्व ऋषिगण तेथें येते झाले, आणि अरुंधतीला पुढें

करून सर्व ऋषिपत्न्या प्रकट झाल्या. यम, निर्ऋति, कुबेर आदिकरून अष्ट दिक्पाल अष्टदिशांचा प्रतिपाल करीत उभे राहिले. शुक्र, अंगार, बुध, गुरु इत्यादि नवग्रह आकाशमंडलामध्यें शुभस्थानीं येऊन बसले. यक्ष, गंधर्व, किन्नर हे आविर्भूत झाले. गायत्री, सावित्री, शान्ति, पुष्टिकरी, तुष्टिकरी, दुर्गा, पांचाली, सरस्वती, श्री, श्रद्धा, मेधा, देवमाता, देवपत्न्या, महासेन, ग्रामदेवता, कुलदेवता, इत्यादि सर्व देवता स्वस्वस्थानापन्न झाल्या. त्यांच्या-पाठीमागून अग्नि, आहुति, ओषधि, वनस्पति, अहोरात्र, पर्जन्य, यज्ञ, ऋतु, इत्यादिकांवर अधिष्ठान करणाऱ्या देवता प्राप्त झाल्या. तसेंच समुद्र, गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, परुष्णी, वितस्ता, इत्यादि नद्या, तीर्थे, जलद, नद, वगैरे सर्व समुदाय त्या ठिकाणीं एकत्र गोळा झाला. ह्याप्रमाणें स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ, ह्या तिन्ही लोकांमध्यें श्रेष्ठ, सत्त्वगुणविशिष्ट, महत्कार्यामध्यें संकटाच्या ओझ्याखालीं खचणाऱ्या अंतःकरणाला सामर्थ्य देणारे देव, देवता आणि इतर जें जें वस्तुजात होतें, तें तें सर्व त्या महात्म्याला आशीर्वचन देण्याकरितां त्या ठिकाणीं सन्निहित झालें.

परंतु ह्यांच्याशिवाय शिवाजीला प्रोत्साहन देण्याकरितां आणखीहि एका वर्गांतील लोक त्या ठिकाणीं जमा झाले होते. शिवाजीच्या पूर्वीं हिंदुस्थान देश परकीय लोकांनीं सुमारें पांच-सहाशें वर्षेपर्यंत व्यापून टाकिला होता. इतक्या मुदतींत आपला देश त्यांच्यापासून परत मिळवावा आणि तो स्वतंत्र करावा अशी इच्छा कोणाच्याच मनांत उत्पन्न झाली नव्हती असें नाहीं. परंतु अकराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत ह्या सर्व इच्छा अतृप्त राहिल्या होत्या. स्वदेशाच्या स्वतंत्रते-बद्दलच्या किती तरी इच्छा पांचशें वर्षेपर्यंत परिपूर्ण होण्याची वाट पाहात थांबून राहिल्या होत्या. त्या पांचशें वर्षांतील सगळ्या अपरिपूर्ण इच्छा या वेळीं सजीव होऊन शिवाजीला पाठबळ देण्याकरितां तयार झाल्या. तसेंच परकीय लोकांनीं अतिशय छळल्यामुळें किती तरी आत्मे तळमळत पडलेले होते, ते या परकीय राजांच्या पातकांचे घडे भरण्याची वाट पाहात होते. त्या आत्म्यांपैकीं कित्येक महापुण्यवान् होते, व त्यांनीं पृथ्वीवरील आपल्या कृत्यांनीं स्वर्गलोकांतील सलोकता, सरूपता इत्यादि चारी मुक्ति प्राप्त करून घेण्याची योग्यता संपादन केली होती. तरी पण आपला

हिंदुस्थान देश स्वतंत्र झालेला पाहावा आणि मग आपण स्वकर्मार्जित अशा उत्तम गतीला जावें, अशी त्यांची इच्छा होती. अशा रीतीनें ह्या आर्यभूच्या स्वातंत्र्यामध्यें त्यांचा हेतु गुंतलेला असल्यामुळें ते मुक्त झालेले असूनहि अमुक्त स्थितीमध्यें हिंदुस्थानच्या भाग्योदयाची वाट पाहात राहिले होते. तो सुदिन आतां जवळ आला असें जाणून ते सर्व आत्मे शिवाजीला साहाय्य करण्याकरितां आणि आशीर्वाद देण्याकरितां पुढें सरसावले. ह्या पांच–सहाशें वर्षांच्या अवधीमध्यें सूडदेखील किती तरी शिल्लक राहिलेले होते ! हे सूड हजारों, लक्षावधि, नव्हे कोट्यवधि होते असें म्हटलें तरी त्यांची संख्या कमीच केल्यासारखी होईल; इतके सूड त्या वेळीं योग्य संधीची मार्गप्रतीक्षा करीत बसलेले होते. इतके सूड त्या परकीय लोकांच्या असह्य जुलमाविरुद्ध रात्रंदिवस विव्हळत होते, कण्हत होते, कुंथत होते, ओरडत होते, आणि त्वेषाच्या किंकाळ्या फोडीत होते. त्यांतून कित्येक जखमी झाले होते, कित्येक रक्तबंबाळ झाले होते, कित्येक लंगडे होऊन पडले होते, कित्येक डोळे काढलेले होते, कित्येक माना मोडलेले होते, आणि कित्येक प्रेतवत् पडलेले होते; तरी पण ते सगळे आपल्या देशाच्या परकीय शत्रूंची खोड मोडण्याला अतिशय उतावीळ झालेले होते. आपल्या देशाच्या शत्रूंचा नाश करण्यासाठीं तोडलेले पायहि धांवून जाऊं पाहत होते, कापलेले हातहि तलवारी उपसून जखमा करण्याला इच्छित होते, फोडलेले डोळेहि अतिशय त्वेषानें पाहात होते, आणि मारलेलीं अंतःकरणेंहि प्रेतवत् पडलेल्या अवयवांमधून चैतन्याचा आणि सामर्थ्याचा संचार करविण्याचा प्रयत्न करीत होतीं. अशा प्रकारचे सगळे सूड एकत्र होऊन त्या वेळीं शिवाजीजवळ आले, व " तूं लढाई कर. आमची तुला मदत आहे, आम्ही तुझ्या बाजूनें लढूं. आम्ही आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न करूं आणि त्यांचे हातपाय मोडून टाकूं. त्यांच्या दुष्ट कृत्यांमुळें त्यांचा पराजय ठरलेलाच आहे. तेव्हां तूं लढ ! " असे शब्द उच्चारून त्याला उत्तेजन देऊं लागले. ह्या परकीय जुलमाच्या पाच-सहाशें वर्षांमध्यें किती तरी देवळें मोडून पडलीं होतीं, आणि किती तरी देवतांच्या मूर्ति छिन्नविच्छिन्न झाल्या होत्या. तीं सगळीं देवळें आणि त्यांतील देवता शिवाजीच्या ह्या स्वधर्म-

संस्थापनेच्या आणि स्वराज्यसंपादनाच्या सत्कृत्याला आपापल्या पुण्यांशांनीं साहाय्य करण्याकरितां पुढें आल्या. मोडलेलीं देवळें आणि भगलेल्या देवता मिळून तीं एकंदर किती आलीं होतीं याची गणना करणें अशक्यच होते. तीं सूक्ष्मरूपानें आलीं होतीं तरी त्यांची इतकी गर्दी झाली होती, मग तीं आपल्या स्थूलरूपानें तेथें आलीं असतीं, तर त्यांच्यांतील दगड, विटा, चुना, माती, खांब, लगी, तुळया, लोखंड, तांबें, पितळ, चांदी, सोनें, हिरे, माणकें वगैरे सामानाचे मिळून त्या सह्याद्रीसारखे तेथें दहा-पांच पर्वतच झाले असते. हे पर्वत म्हणजे परकीय राजांच्या पातकांचे, जुलुमांचे आणि धर्मविध्वंसनाचेच मूर्तिमंत पर्वत झाले असते! असो. सूक्ष्मरूपानें जीं अनेक देवळें आणि देवता प्राप्त झाल्या होत्या, त्यांच्यामध्यें नगरकोट, ठाणेश्वर, सोमनाथ, मथुरा, अयोध्या, काशी, भिलसा वगैरे ठिकाणचीं देवळें आणि देवता ह्या प्रमुख होत्या, व 'आमचा सूड तूं घे, आमचा तुला आशीर्वाद आहे, तुझ्या बाजूनें आम्ही लढूं,' अशा प्रकारचीं आश्वासनें त्यांच्या तोंडून निघत होतीं. गिझनीच्या महंमदानें आपल्या अंगावर केलेल्या जखमा सोमनाथानें शिवाजीपुढें उघड्या करून दाखविल्या. अल्लाउद्दिनानें आपले केलेले हाल भिलसा येथील बुद्धाच्या स्तूपानें शिवाजीपुढें वर्णन केले, व बुद्धासाठीं तूं लढ म्हणून त्याला विनंति केली. मथुरा, अयोध्या, काशी येथील मोडलेल्या देवळांतील भंगलेल्या मूर्तींनीं आपले अपमान शिवाजीपुढें निवेदन केले, व आपल्या जखमा त्याच्यापुढें उघडून दाखविल्या, आणि 'ह्या मनाच्या व शरीराच्या जखमांसाठीं तूं लढ,' असें त्यांनीं शिवाजीला सांगितलें. शिवाजीचा स्वराज्यस्थापनेचा हा महत् प्रयत्न पाहून ज्यांचे प्रयत्न पूर्वीं सफल झाले नव्हते, अशा राजांचे आत्मेहि आपल्या इच्छाबलाच्या अक्षौहिणी बरोबर घेऊन शिवाजीच्या मदतीला धांवले. लाहोरचे जयपाळ आणि अनंगपाळ यांच्या मनांतून गिझनीच्या महंमदाविरुद्ध सूड घ्यावयाचा होता, परंतु ती त्यांची इच्छा अजूनपर्यंत तृप्त झाली नव्हती. यासाठीं ते शिवाजीला पाठबळ देण्याकरितां हजर झाले. शत्रूंनीं डोळे काढिले असतांहि चांदभाटाच्या इषारतीनें शब्दवेधित्वाच्या बळावर अचूक नेम मारून शत्रूचा प्राण घेतला, तरी पृथ्वीराज चव्हाणाची फिरून स्वराज्यस्थापना करण्याची

इच्छा तृप्त झाली नव्हती, ती आतां तृप्त होणार असें पाहून अतिशय आनंदानें पृथ्वीराज तेथें आला. अल्लाउद्दिनाच्या प्रचंड सैन्यापुढें देवगिरीचें संरक्षण करण्याला असमर्थ झालेला रामराजा हिंदुराज्याच्या स्थापनेचा हा शुभमुहूर्त पाहून शिवाजीसन्निध प्राप्त झाला. नडीयाच्या राजवाड्यांतून बखत्यारखानानें पळवून लाविल्यानंतर जगन्नाथपुरीस जाऊन आपलें राज्य आपल्याला परत मिळूं दे, अशी नारायणाजवळ प्रार्थना करीत बसलेला राजा लक्ष्मणदेव हा आपल्याला खरोखरच भगवान् श्रीकृष्ण प्रसन्न झाला आहे व त्यानेंच हा सुप्रसंग जुळवून आणिला आहे, असें समजून हा भगवंताचा प्रसाद निवेदन करण्यासाठीं व शिवाजीला विजयाशीर्वाद देण्यासाठीं तेथें प्रकट झाला. त्याचप्रमाणें दिल्ली, अजमीर, कनोज, कलिंजर, उदेपूर, जोधपूर, जयपूर, चितोड, गुजराथ, वरंगळ, विजयानगर वगैरे अनेक ठिकाणचे राजे स्वराज्यसंस्थापनेचे आणि स्वतंत्रतेचे आपले अर्धवट राहिलेले प्रयत्न पुरे होण्याची ही वेळ आली आहे, असें जाणून त्या ठिकाणीं अवतीर्ण झाले. फत्तेपूरशिक्री ह्या ठिकाणीं सर्व रजपूत लोक एकत्र होऊन परकीयांपासून आपला देश आपण स्वतंत्र करून घ्यावयाचा अशा इच्छेनें फार निकरानें लढले; परंतु त्या वेळीं त्या त्यांच्या शौर्याचा उपयोग झाला नाहीं. त्या फत्तेपूरशिक्रीच्या रणमैदानावर जे असंख्य योद्धे मरून पडले, त्यांच्या इच्छा हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेसाठीं गुंतून राहिल्या होत्या; तेहि सर्व योद्धे शिवाजीच्या ह्या प्रयत्नाला मदत करण्यासाठीं त्याच्याभोंवतीं गोळा झाले. परंतु ह्यांच्यामागून पूर्वीं वर्णन केलेल्या सर्वांहून अतिशय जास्त हृदयद्रावक आणि खेदकारक असा देखावा दिसूं लागला. चितोडच्या वेढ्यामध्यें ज्या महासाध्वी राणीनें आणि तिच्याबरोबरच्या तेरा हजार रजपूत स्त्रियांनीं आपल्याला अग्नीमध्यें दग्ध करून घेतलें होतें, त्या स्त्रिया तेथें आल्या, व आपलीं भाजलेलीं अंगें पुढें करून म्हणाल्या, " आम्हीं स्वदेशासाठीं आपल्याला जाळून घेतलें. आम्हीं ज्या निखाऱ्यांत उड्या टाकल्या ते निखारे केव्हांच निवून गेले आहेत. त्यांची उष्णता तीनशें वर्षेंपर्यंत कोठून टिकणार ! तरी पण आमच्या अंगाची आग अद्यापि शान्त होत नाहीं. आम्हीं स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं आपल्या अंगाला ही आग लावून घेतली, ती स्वातंत्र्याच्या अमृतसिंचनावांचून शान्त होणार नाहीं. शिवाजी, त्या अमृताचें सिंचन

करून तूं आमचे आत्मे थंड कर! शिवाजी, तूं आमच्यासाठीं लढ! हे जे आमचे केस होरपळले आहेत, आणि आमच्या अंगावर फोड आले आहेत, ह्यांच्यासाठीं तूं लढ!" असे उद्गार काढून डोळ्यांत पाणी आणून त्यांनीं शिवाजीची विनवणी केली. शिवाजीचा हा स्वतंत्रतेचा विचार ऐकून तत्कालीन हिंदुस्थानहि प्रमुदित झाला, व आतां आपल्याला बरे दिवस येतील अशी त्याला आशा वाटूं लागली. गर्भावस्थेंत असलेल्या आत्म्यांना, आणि गर्भाशयापर्यंत ज्यांची मजल आली नसून अजून जे त्याच्याहि पुष्कळ मागें होते अशा आत्म्यांनासुद्धां, आपण जन्मास केव्हां येऊं, आणि ह्या स्वतंत्रतेच्या इमारतीमध्यें हातभार लावण्याला आपल्याला केव्हां संधि सांपडेल, अशाविषयीं उत्कंठा उत्पन्न झालेली होती. देवळांचे मोडलेले कळस, ब्राह्मणांचीं तोडलेलीं जानवीं, हिंदूंच्या उपटलेल्या शिखा, गाईंच्या सुरे ठेवलेल्या माना, भ्रष्ट केलेलीं तीर्थें, उध्वस्त पाडलेलीं पवित्र क्षेत्रें, लुटीनें कंगाल केलेले लोक, साराग्रगुल्मीमध्टीं तापलेल्या तव्यानें पोळलेले पाय, तोबऱ्यांतील राखेनें मळलेलीं मुखें, भुकेनें खोल गेलेलीं पोटें, अश्रूंनीं आर्द्र झालेले चेहरे, डोळ्यांत आलेले प्राण, आणि दुष्काळांनीं मृतप्राय झालेलीं शरीरें,—हे सर्व, "आतां आम्हांला या संकटांतून तूं सोडीव, याच्या पलीकडे जिवंत राहून दुःख सहन करणें शक्य नाहीं, तेव्हां तूं आमच्यासाठीं लढ!" असें म्हणून शिवाजीला शरण आले.

एका क्षणामध्यें अशा प्रकारचा हा विलक्षण समाज आपल्याभोंवतीं गोळा झालेला पाहून शिवाजीला मोठें आश्चर्य वाटलें. सर्व हिंदुस्थान देश भाराक्रान्त झालेला, गाई हंबरडे फोडीत असलेल्या, ब्राह्मण ब्रह्मकर्मे चालविण्याला असमर्थ होऊन बसलेले, मोडलेलीं देवळें आणि फोडलेल्या मूर्ति प्रतिकाराची मार्गप्रतीक्षा करीत असलेल्या, जुने राजे प्रोत्साहन देत असलेले, रजपुतांच्या स्त्रिया आक्रोश करीत असलेल्या, आणि त्यांतच आकाशांतील आणि पृथ्वीवरील सर्व देवता प्रसन्न मुद्रा धारण करून विजयाशीर्वाद देण्याला उत्सुक झालेल्या, असा तो त्या वेळचा एकंदर देखावा पाहून शिवाजीच्या अंतःकरणांतील स्वतंत्रतेविषयींचा निश्चय जास्तच दृढ झाला, व असल्या ह्या पुण्यकारक आणि सामर्थ्यवन्त दैविक आणि ऐहिक समाजापासून आपण वरप्रदान मागून घ्यावें, असल्या परमपावन विभूतींचें ज्या

दिवशीं आपल्याला दर्शन झालें आहे तोच आपण योजिलेल्या कृत्याला पुण्याह आहे, याकरितां आजच येथें आपल्या भावी रणयज्ञाचें पुण्याह-वाचन करावें, असा संकल्प शिवाजीच्या मनामध्यें उत्पन्न झाला, व त्याप्रमाणें त्यानें अवनीवर जानुमंडल ठेवून आणि आपल्या कमलमुकुल-सदृश हातांची अंजलि मस्तकाशीं धरून त्या सर्व समाजाची येणेंप्रमाणें प्रार्थना केली — "आपण सर्वोनीं मला दीर्घ आयुष्य द्यावें. हें मला स्वतःकरितां नको आहे, परंतु आपल्या देशाकरितां पाहिजे आहे. त्या देशाच्या स्वतंत्र-तेचें तुमच्या सर्वांच्या आशीर्वादानें मीं आरंभिलेलें कृत्य यथास्थितपणें शेवटास जावें, एवढ्यासाठीं आपण मला दीर्घ आयुष्य द्यावें. तसेंच ह्या हिंदुस्थान देशाच्या स्वतंत्रतेसाठीं, माझ्या स्वतःसाठीं नव्हे, मला दीर्घ आयुष्य, श्रेय, शान्ति, पुष्टि आणि तुष्टि असो, असा तुम्हीं आशीर्वाद द्यावा. तसेंच श्री, यश, विद्या, विनय हींहि तुम्ही मला या कृत्यासाठीं द्या. व्रत, नियम तप, स्वाध्याय, ऋतु, दम, दान, ह्यांनीं विशिष्ट असे जे ब्राह्मण त्यांचें मन समाधान पावो व ते प्रसन्न होवोत. तसेंच ह्या स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या कृत्यांत कोणतेंहि विघ्न न येवो. सर्वांना आरोग्य असो. हें कर्म शुभकारक होवो. हें कर्म शिवकारक होवो. कर्मसमृद्धि होवो. धर्मसमृद्धि होवो. वेदसमृद्धि होवो. शास्त्रसमृद्धि होवो. पुत्रसमृद्धि होवो. धनधान्यसमृद्धि होवो. इच्छिलेली संपत्ति आम्हांला मिळो. सर्व अरिष्टांचें निरसन होवो. जें पापकारक आहे त्याचा घात होवो. जें श्रेय आहे तें आम्हांला मिळो. याच्यापुढें जें कर्म ह्या आर्य-भूमीसाठीं केलें जाणार आहे, त्यामध्यें कोणत्याहि प्रकारचें विघ्न न येवो. त्याची उत्तरोत्तर प्रत्येक दिवशीं अभिवृद्धिच होवो. उत्तरोत्तर आमच्या क्रिया शुभ आणि शोभन अशाच होवोत. आमचे देशाविषयीं इच्छिलेले काम शेवटास जावोत. हें स्वतंत्रतेचें काम निर्विघ्न होण्यासाठीं तिथि, करण, मुहूर्त आणि नक्षत्रें यांचें आनुकूल्य असो. ह्या स्वदेशोद्धाराच्या हातीं घेतलेल्या कृत्यामध्यें तिथि, करण, मुहूर्त, नक्षत्र, ग्रह आणि लग्न यांच्यावर अधिष्ठान करणाऱ्या देवतांनीं आमच्यावर संतुष्ट असावें. दुर्गा, पांचाली, यांनीं संतुष्ट असावें. अग्निपुरोग विश्वेदेव यांनीं आमच्यावर कृपा करावी. इंद्रपुरस्सर मरुद्गणांनीं आमच्यावर कृपा करावी. ब्रह्मपुरस्सर सर्व वेदांनीं आमच्यावर कृपा करावी. विष्णुपुरस्सर सर्व देवांनीं आमच्यावर कृपा

करावी. माहेश्वरीपुरस्सर सर्व उमामातरांनीं आमच्यावर कृपा करावी. वसिष्ठ-पुरस्सर महर्षिगणांनीं आमच्यावर कृपा करावी. अरुंधतीपुरस्सर एक-पत्न्यांनीं आमच्यावर कृपा करावी. ऋषि, छंद, आचार्य, वेद, देव आणि यज्ञ ह्या सर्वांनीं सुप्रसन्न व्हावें. ब्रह्म आणि ब्राह्मण ह्यांनीं संतुष्ट व्हावें. श्री आणि सरस्वती यांनीं संतुष्ट व्हावें. श्रद्धा आणि मेधा ह्यांनीं संतुष्ट व्हावें. भगवती, कात्यायनी, माहेश्वरी, पुष्टिकरी, तुष्टिकरी, ऋद्धिकरी व वृद्धिकरी ह्यांनीं आमच्यावर सुप्रसन्न व्हावें. विनायक, महासेन, हरि, हर, हिरण्यगर्भ ह्यांनीं आमच्यावर सुप्रीत असावें. ग्रामदेवता आणि कुलदेवता ह्यांनीं संतुष्ट व्हावें. ब्राह्मणांचा द्वेष करणारे नष्ट व्हावे. या स्वराज्यस्थापनेच्या कृत्यांत आड येणारे नाहींसे व्हावे. ह्या कर्मामध्यें विघ्न करणारे लयाला जावे. शत्रूंचा पराभव व्हावा. घोर वास्तु शान्त व्हाव्या. पापकारक वस्तु नाहींशा व्हाव्या. नाना प्रकारचीं संकटें विनाश पावावीं. शुभकारक गोष्टी वाढाव्या. आम्हांला जल कल्याणकारक व्हावें. ऋतु कल्याणकारक होवोत. अग्नि कल्याण-कारक होवोत. आहुति कल्याणकारक होवोत. ओषधि कल्याणकारक होवोत. वनस्पति कल्याणकारक होवोत. अतिथि कल्याणकारक होवोत. दिवस व रात्र हीं कल्याणकारक होवोत. जेव्हां जेव्हां पाहिजे तेव्हां तेव्हां आमच्याकरितां पर्जन्य पडो. आमच्याकरितां फलयुक्त ओषधि परिपक्व होवोत. आमचा योगक्षेम यथास्थित रीतीनें चालो. नवग्रह आमच्यावर शुभदृष्टि राखोत. आणि भगवान् नारायण आमच्यावर सुप्रसन्न होवो. हे महाजनहो, मी तुम्हां सर्वांना नमस्कार करून तुमच्या आशीर्वचनाची अपेक्षा करीत आहें. तर हिंदुस्थान देशाला स्वतत्रता देण्याच्या ज्या कर्माला मी प्रारंभ करीत आहें, त्या कर्मासाठीं हा दिवस पुण्यकारक आहे, असा आपण सर्वजण मला आशीर्वाद द्या. ह्या कर्मामध्यें ऋद्धि प्राप्त होईल, असा आशीर्वाद तुम्ही मला द्या. या कर्मामध्यें श्री प्राप्त होईल, असा आशीर्वाद तुम्ही मला द्या.'' अशी त्याची प्रार्थना ऐकून सर्वांनीं त्याला अपेक्षित वरप्रदान दिलें. नंतर हिंदुस्थानच्या उत्कर्षासाठीं आणि स्वतंत्रतेसाठीं केलेले प्रयत्न निष्फळ झाले यांबद्दल जे आत्मे इतके दिवसपर्यंत तळमळत होते, त्यांनीं त्याला आशीर्वाद आणि प्रोत्साहन देऊन आणखी असें सांगितलें कीं, ''ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे ह्या भरतभूमीच्या स्वतंत्र

सिंहासनावर तुला अभिषेक करोत. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे तुला प्रत्यहीं विजय देवोत. ब्रह्मदेवासहवर्तमान इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, पवन, धनाध्यक्ष व शिव हे सर्व दिक्पाल तुझें सर्वदा संरक्षण करोत. तसेंच देवपत्न्या, आदित्यादि नवग्रह देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, पन्नग, ऋषि, मुनि, गाई, देवमाता, द्रुम, नाग, अप्सरा, अस्त्र, शस्त्र, राजे, वाहनें, ओषधि, रत्नें, वर्ष, अयनें, ऋतु, नद्या, समुद्र, पर्वत, तीर्थें, जलद आणि नद, हे सर्व तुझ्यावर अभिषेक करोत, आणि तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण करोत." असा त्या सर्वांनीं आशीर्वाद दिल्यानंतर सर्वांनीं मिळून त्याच्या मस्तकावर अभिषेक करण्याला सुरुवात केली. गंगादिक पुण्य नद्या व तीर्थें प्रविष्ट होऊन ज्याला सर्व तीर्थांचा राजा करून ठेविलें आहे अशा समुद्रांतून प्रत्यक्ष भगवान् सूर्यनारायणाच्या करांनीं ज्यामध्यें अत्यंत पवित्र, परमपावन आणि अमृतप्राय उदक भरून ठेविलें होतें, अशा प्रकारचा एक मेघ खालीं ओढून घेऊन, आणि त्यांतील जल मंत्रांनीं पुनीत करून ब्राह्मण ज्याप्रमाणें एखाद्या ताम्हनांतून दर्भकूर्चांनीं यजमानावर जलसिंचन करितात, त्याप्रमाणें तेथें जमलेल्या त्या सर्व दिव्य समुदायांनीं शिवाजीच्या मस्तकावर अभिषेक केला, व त्या वेळीं त्या सर्वांनीं पुढील मंत्र म्हटला :

"ॐ इमा आपः शिवतमा इमाः सर्वस्य भेषजीः ॥ इमा राष्ट्रस्य वर्धतीरिमा राष्ट्रभृतोऽमृताः ॥ याभिरिंद्रमभ्यषिंचत्प्रजापतिः सोमं राजानं वरुणं यमं मनुं ॥ ताभिरिंद्रमभिषिंचामि त्वामहं राज्ञां त्वमधिराजो भवेह ॥"

शिवाजीनें राष्ट्रवर्धनाचें जें पूज्य काम हातीं घेतलें होतें, त्याला अनुसरून अशाच मंत्रानें तेथील प्रत्येकजणानें त्याच्या मस्तकावर त्या शुद्ध अमृतमय जलाचा अभिषेक करून त्याला तूं राजा होशील असा आशीर्वाद दिला. त्या सर्व देवता म्हणाल्या, "हे महानुभावा, आम्ही ज्या ह्या मंत्रपूतजलानें तुझ्यावर अभिषेक करीत आहों, तें जल अत्यंत कल्याणकारक आहे. हें जल सर्वांवर औषध आहे. ह्या जलापासून राष्ट्राचें वर्धन होतें. हेंच जल राष्ट्राचें पोषणकर्तें प्रत्यक्ष अमृत आहे. ब्रह्मदेवानें सोमराजा, वरुण, यम आणि मनु यांना ज्या जलानें अभिषेक केला त्याच जलानें आम्ही तुला अभिषेक करीत आहों. सर्व राजांमध्यें

तूं श्रेष्ठ राजा होशील ! ” असा सर्वांनीं त्याला आशीर्वाद दिला, आणि त्याजवर त्या स्वर्गीय शुद्ध जलाचें त्यांनीं सिंचन केलें. ते शीतल आणि रम्य जलबिंदु शिवाजीच्या अंगावर पडून ते त्याला गार लागतांक्षणींच तो त्या समाधींतून जागा झाला, व हें काय आहे म्हणून इकडे तिकडे पाहूं लागला. परंतु तो देवतांचा समाज आतां त्याला मुळींच कोठें दिसेना. तेव्हां तो म्हणूं लागला कीं, “ त्या अनेक देवता आणि ते हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेसाठीं तळमळणारे पूर्वींचे आर्यपुरुष कोठें आहेत ? मला ते येथें दिसत होते हा भ्रमच होता कीं काय ? मी त्यांच्यापाशीं आशीर्वाद मागितला आणि त्यांनीं तो मला दिला, हा सर्व आभासच कीं काय ? त्या सर्वांनीं वेदोक्त मंत्र म्हणून राष्ट्रसंस्थापना करण्याविषयीं मला अनुज्ञा दिली, आणि मन्वादिक राजांना ज्या जलानें ब्रह्मदेवानें अभिषेक केला, त्याच जलानें माझ्यावर अभिषेक करून ‘ तूं सर्व राजांमध्यें श्रेष्ठ राजा होशील ’ असा त्यांनीं मला आशीर्वाद दिला हें सर्व मिथ्याच कीं काय ? ” अशा अनेक शंका त्याच्या मनामध्यें एक क्षणभर उद्भवल्या. परंतु आपलें मस्तक आणि सर्व अंग हें जलबिंदूंनीं आर्द्र झालेलें पाहून व देवतांनीं केलेल्या अभिषेकाचें हें अवशिष्ट चिह्न आहे, असें जाणून त्याच्या मनाचा सर्व संदेह नाहींसा झाला. अशी त्याच्या मनाची खात्री झाल्यानंतर आपल्या भावी रणयज्ञाचें जें हें आज स्वाभाविक पुण्याहवाचन झालें त्या पुण्याहवाचनाची ‘ फलसमृद्धिरस्तु ’ असा आशीर्वाद त्यानें मागितला. त्याबरोबर आसपासच्या पर्वतामधून ‘ अस्तु ’ असा मंद आणि गंभीर प्रतिध्वनि उत्पन्न झाला. आपल्या प्रार्थनेला हें सर्व विश्वानें जें आशीर्वादपूर्वक प्रत्युत्तर दिलें तोच शुभ शकुन आहे, असें समजून शिवाजीनें त्या वेळीं प्रथम तेथून जवळचाच जो तोरणा किल्ला दृष्टीस पडला, तो हस्तगत करून घेण्याचा निश्चय केला. तेव्हांपासून त्यानें मराठी राज्याची स्थापना कशी केली, आणि देवतांनीं या प्रसंगीं केलेल्या अभिषेकाची रायगडावर राज्याभिषेकाच्या वेळीं गागाभट्टांनीं पुनरुक्ति कशी केली, याच्याबद्दलची हकीकत महाराष्ट्र वाचकांना सांगावयाला पाहिजे असें नाहीं.

● ● ●

# १०. ब्लॅक होल

( काळ : अग्रलेख, ता. २२-४-१९०४ )

ब्लॅक होलची कथा बनावट असल्याचें शाबीत झालें आहे, आणि हिंदुस्थानच्या अंधारकोठडीच्या भिंतीहि फोडून काढल्या आहेत. आतां मरण्याची भीति नाहीं—जगण्याची हिंमत आहे.

कोणत्याहि राष्ट्रामध्यें देशद्रोहाच्या विचाराचीं माणसें असणें ही फार दुर्दैवाची गोष्ट आहे. ज्या राष्ट्रांत असले विचार आहेत तें राष्ट्र कुजलेलें आहे म्हणून समजावें; व कोणत्याहि शरीरांत इतकें कुजलेलें आणि नासलेलें रक्त हितावह नाहीं. ज्या ज्या भागांत नासलेलें रक्त सांचलेलें असेल ते ते भाग छाटूनच टाकले पाहिजेत. भलभलत्या कल्पना, अनेक पिढ्यांपासून चालत आलेल्या राष्ट्रहितविघातक रूढि, जगाच्या वस्तुस्थिती-विषयीं अत्यंत अज्ञान, मूर्खपणाच्या धर्मकल्पना आणि सामाजिक आचार-विचार यांचें जोखड, स्वहिताबद्दलच्या कोत्या समजुती आणि सार्वजनिक हिताबद्दल अत्यंत अनास्था, हे गुण ज्या राष्ट्रांच्या अंगीं पिढीजात खिळलेले आहेत, तीं राष्ट्रें गुलामगिरीची स्थिति अनुभविण्याला परिपक्क झालीं म्हणून समजावें. अशा राष्ट्रांवर इंग्लिशांनीं स्वारी केली म्हणून इंग्लिशांवर रागावण्याचें कारण नाहीं. इंग्लिशांनीं तो देश जिंकला नाहीं तर दुसरे कोणी तरी तो जिंकणारच. ज्याच्या अंगांतील सद्‌गुणरूपी प्राण निघून गेला व जें प्रेत झालें, तें जाळलें काय, किंवा पुरलें काय, किवा कोणी गिधाडांनीं खाल्लें काय, सर्व सारखेंच. तें गिधाडांनीं खाल्लें नाहीं तर कुत्रीं त्याचे लचके तोडतील. परंतु त्याचें स्वतःचें नशीब काय तें ठरलें गेलें ! अज्ञान हा राष्ट्राचा भयंकर शत्रु होय. वस्तुस्थितीचा अपरिचय हे सर्व दुर्बळ राज्यांचे अपरिहार्य इंग्लिश होत. आपल्या मूर्खपणाची आणि आपसांतील कलहाची तोफ आपल्याला जितकी मारते, तितका आपला संहार इंग्लिशांच्या कोणत्याहि मशीनगननें केला नाहीं. आपण होऊन आपल्या च्हाड्या इंग्लिशांना जितक्या सांगितल्या आहेत, तितक्या त्यांच्या अतिशय

मोठ्या पगाराच्या इन्टेलिजन्स डिपार्टमेंटमधील ऑफिसरालासुद्धां कळल्या नसतील. आपण आपल्या राष्ट्रहानिकारक वेडगळ धार्मिक समजुती आणि समाजबंधनें यांनीं जितके खालावलों आहों, तितके इंग्लिशांच्या करांच्या ओझ्यांनीं खात्रीनें खालावलों नाहीं. इंग्लिश लोक हिंदुस्थानांतून पैसा नेतात अशी आपली ओरड आहे, परंतु आपण आपल्या हातानें जितका पैसा परदेशीं पाठवितों तितका ते खात्रीनें येथून नेत नसतील. आम्हांला एक काम धड करतां येत नाहीं. आपण चार लोक एकत्र झालों तर चौघांचें मिळून एकमत आपल्याला बनवितां येत नाहीं. आपल्यांत एकाचा दुसऱ्यावर विश्वास नाहीं. वरच्यानें खालच्याला फसवावें, आणि त्यानें आपल्या खालच्याला फसवावें, अशावर सगळा चरितार्थ चालला आहे. मरु प्रदेशांतील पाण्याप्रमाणें आपल्यामध्यें प्रामाणिकपणा अत्यंत दुर्मिळ झाला आहे. जन्मास यावें, खावें, प्यावें, लग्न करावें, संतति वाढवावी, आपण भीक मागावी आणि पोरांकडूनहि भीक मागवावी, व अखेरीस जाळण्याच्या पैशाचीहि तरतूद न करतां मरून जावें, हे आज आपले चार पुरुषार्थ होऊन बसले आहेत. ब्राह्मण्याचा दिमाख मात्र उरला आहे. क्षत्रियांना वेदोक्त मात्र पाहिजे आहे. वैश्यांना धाडसी आणि [illegible]ची ओळखहि उरली नाहीं. शूद्रांची मात्र दास्यवृत्ति कायम राहिली आहे. इतकेंच नव्हे, तर बाकीच्या सर्व गोष्टी बर्फमय प्रदेशांतील झाडांप्रमाणें चोहोंकडे वठत चालल्या असतां पूर्वीं मन्वादिकांनीं फक्त शूद्रांकरितां म्हणून राखून ठेवलेल्या दास्यवृत्तीचा अतिशय जारीनें फैलाव होऊन ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हेसुद्धां ह्या दास्यवृत्तीचा सुखानुभव घेऊं लागले आहेत. अशी आज आपल्या चातुर्वर्ण्याची स्थिति आहे. अल्पवयांत आया झालेल्या मुली, आणि ब्रह्मचर्याबरोबरच गृहस्थाश्रमामध्यें पाऊल टाकलेले बाप, धर्माची ओळख विसरलेले ऋत्विज, कापसाच्या गादीवर बसलेले राजे आणि आपल्या राजाचें अहित चिंतणाऱ्या प्रजा, सरकारी पगारांनीं हातपाय बांधलेले विद्वान् लोक आणि अज्ञानानें हातपाय बांधलेले अशिक्षित लोक, अकालीं पडणारा पाऊस, आणि जन्मास येणारी संतति, अल्पायुषी प्रजा, पाण्यावांचून डोळे, जोरावांचून मनगटें, रुंदीवांचून छात्या, बुद्धीवांचून डोकीं, चपळपणावांचून पाय, व साहसावांचून मनें, अशा प्रकारचे उद्वेगजनक

आणि डोळ्यांतून टिपें ओढून काढणारे देखावे आपल्यामध्यें पदोपदीं दृष्टीस पडतात. आपल्या स्थितीचा विचार कोणीहि करीत नाहींत, जे कोणी करतात त्यांना त्याजवर काय उपाय योजावा हें समजत नाहीं, ज्यांना समजतें त्यांच्या अंगांत ते उपाय घडवून आणण्याची ताकद नाहीं, आणि ज्यांच्या अंगांत ताकद आहे त्यांच्यावर कोणाचा विश्वास नाहीं. यामुळें एखाद्या कड्यावरून जसें पाणी खालीं पडावें, त्याप्रमाणें आपण सर्वजण मूर्खपणाच्या ओघांत सांपडून वाहत जाऊन परराज्याच्या कड्याखालीं एकापाठीमागून एक उड्या घेत आहों. एखादी क्षुल्लक गोष्ट पाहण्यासाठीं किंवा ऐकण्यासाठीं हजारों लोक एकत्र जमतात; परंतु कोणी अधिकाऱ्यानें दरडावल्याबरोबर दहांपेक्षां आणखी जास्त दिशा असत्या तर बरें झालें असतें अशी दशा करून सोडतात ! स्थैर्य कोणाच्याच डोक्यांत नाहीं. सगळ्यांच्या खांद्यांवर मेंढरांचींच डोकीं चिकटविलेलीं ! दुसऱ्यांचें धोरण काय ? ते आपल्याला कां फसवितात ? आपलें काय चुकतें आहे ? आपण त्याला काय केलें पाहिजे ? हे विचार कोणाच्याहि मनांत नाहींत. अपमानाबद्दल त्वेष, गुलामगिरीबद्दल खंती, उत्कर्षाबद्दल महत्त्वाकांक्षा, आणि स्वाभिमानासाठीं स्फुरण, या गोष्टीचा खप आपल्यामध्यें इतका कमी झाला आहे कीं, एखाद्या व्यापाऱ्यानें एखादी लहान आगबोट या मालानें भरून आपल्या किनाऱ्यावर आणिली तर तीदेखील त्याला जशीच्या तशीच माघारी न्यावी लागेल. आपण निःपक्षपातबुद्धीनें आपल्या कोणत्याहि संस्थांचें परीक्षण केलें, तर आपण प्रत्येक बाबतींत अजून फारच मागें आहों असें दिसून येतें; व तेणेंकरून धैर्य खचून आपल्याकरितां या जगांत कांहींएक सुख नाहीं असें वाटूं लागतें. सर्वत्र अंधार पसरलेला दिसतो, दीर्घ आयुष्याचा कंटाळा येतो, प्लेगसारखी सार्वजनिक रोगाची सांथ आली म्हणजे आनंद होतो, आणि हतभाग्य लोकांकरितां निदान मृत्यूचें तरी सुख परमेश्वरानें ठेविलें म्हणून त्याचे आभार मानावे असें वाटतें. जिकडे पाहावें तिकडे आंधळ्याच्या दृष्टीला ज्याप्रमाणें काळोख त्याप्रमाणें आपल्या दृष्टीला आपलीं वैगुण्यें दिसतात. आपले उद्योगधंदे किती तरी मागसलेले ! कारखाने, यंत्रशास्त्र, मोठाल्या प्रमाणावर मोठालीं कामें, यांचा तर

आपल्यामध्यें मागमूसच नाहीं. आपली चित्रकला चुकीची, आपली रंग-कला अमनोवेधक, आपलीं नाटकें गैरशिस्त, आपली कविता बेचव, आपली व्यवस्था अव्यवस्थित, आपली शिस्त बिनशिस्तपणाची, असा चोहोंकडून बुद्धिहीनत्वाचा भयंकर अंमल माजलेला आपल्या दृष्टीला पडतो. शितावरून हंड्याची परीक्षा करण्याकरितां, उदाहरणार्थ अर्वाचीन नाटकांतील एखादा कवि घेऊन राष्ट्राच्या कोणत्या कल्पना त्याच्या काव्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत, आणि त्याच्या काव्यावरून राष्ट्राच्या काय कल्पना असाव्या असा दुसऱ्यांचा तर्क होईल, याविषयीं विचार करूं लागल्यास विचार करणाऱ्याच्या मनांत लज्जेशिवाय दुसरा कोणताहि मनोविकार उत्पन्न होणें शक्य नाहीं. राष्ट्रांतील चित्रकार राष्ट्राची काय कल्पना व्यक्त करीत आहेत, आणि कवी आपल्या राष्ट्राचे काय विचार जगापुढें मांडीत आहेत, त्या विचारांची योग्यता कितपत आहे, ते विचारांच्या महत्त्वाच्या थर्मामीटरमध्यें किती वर चढतील, या प्रश्नांना समाधानकारक उत्तरें मिळण्याला जागा नाहीं ! इतर राष्ट्रांतील विचारप्रागल्भ्य जर पोक्त मनुष्यांचें आहे असें म्हटलें, तर आपल्यामधील कित्येक अर्वाचीन कवी व चित्रकार यांची कृति म्हणजे निवळ अर्भकांची बडबड आहे असेंच म्हणावें लागेल. आपल्यांतील वैद्य काय करीत आहेत, आपल्यांतील वकील काय करीत आहेत, आपले इंजिनीअर्स काय करीत आहेत, आपले शिपाई काय कामें करीत आहेत, आणि आपले खलाशी कशांत व्यग्र आहेत, इकडे पाहिलें म्हणजे आपल्या राष्ट्राच्या फुटलेल्या कपाळावरील खोक आपल्याला चांगली दिसूं लागते. आपल्या राष्ट्रांतील प्रत्येक जातीचे आणि धंद्याचे लोक या जीवनकलहाच्या जिन्याच्या अगदीं शेवटच्या पायरीवर धडपडत पडलेले आहेत. आपले बिनशिकलेले देशी वैद्य आपल्या कुलपरंपरागत आलेल्या आजोबांच्या बटव्याच्या पलीकडे कधींहि न जातां सगळ्या जगांतील रसायनशास्त्राचें संपुटीकरण आपल्या एका बटव्यामध्यें करीत आहेत; आणि आपले शिकलेले डॉक्टर त्यांचीं विलायती औषधें आणून तीं खपविण्याच्या एजन्सीचें काम करीत आहेत. दुसऱ्यांच्या कलहावर आपल्या कुटुंबाची एकी आणि दुसऱ्याच्या कर्जबाजारीपणावर आपली

श्रीमंती अवलंबून ठेवून आपल्यांतील वकील स्वदेशबांधवांत अनीतीचा आणि कोर्ट-फीच्या तिकिटांचा फैलाव करण्याकरितां झटत आहेत. पाहिल्याबरोबर डोळे फिरून जावेत आणि हें काम कसें केलें असेल याच्या-बद्दल बघणाराची अक्कल गुंग होऊन जावी, अशा प्रकारचीं प्रतिसृष्टितुल्य कामें करण्याच्याऐवजीं खडी फोडणारांच्यावर देखरेख करण्याचें अत्यंत जबाबदारीचें काम आपले इंजिनीअर्स बजावीत आहेत. आजचें आपलें शिपायाचें काम म्हटलें म्हणजे शिरस्तेदारापुढचा कागद साहेबापुढें आणि साहेबापुढचा कागद शिरस्तेदारापुढें नेऊन ठेवण्यापलीकडे कांहींएक नाहीं. आणि परदेशचे दर्यावर्दी अटलांटिक महासागरांतून हिंदी महासागरांत आणि हिंदी महासागरांतून पॅसिफिक महासागरांत तेथील लाटांशीं आणि वादळांशीं आपल्या आगबोटींनीं टकरा देत सगळ्या जगाचा व्यापार चालवीत असतां आमचे खलाशी हातभर रुंदीच्या होडग्यांत बसून किनाऱ्या-जवळच्या ढोंपरभर पाण्यांत मासे मारीत किंवा त्यांच्या आगबोटीवरील तेलकट यंत्रें सुताच्या बोळ्यांनीं साफ करीत पोटाची खांच भरीत आहेत. असा जिकडे तिकडे अधःपात झालेला आहे.

अशा स्थितींत आशेला कोठें शोधावें ? ती कोठें आहे ? ती कोणाला सांपडेल ? नेटिव राजांच्या दरबारांत ती नाहीं असें पुष्कळ लोक सांगतात; आणि नेटिव राजेच आशेच्या शोधासाठीं सामान्य लोकांमध्यें फिरत असतात. तेव्हां त्यांच्यांत आशा काय सांपडावयाची आहे ? भाताच्या दाण्यांतून तांदुळाचा कण एकदांच निघतो, त्याप्रमाणें शिंदे, होळकर, वगैरे घराण्यांच्या भाताच्या दाण्यांच्या पोटांतून जनकोजी शिंदे, अहिल्या-बाई होळकरीण, वगैरे तांदुळाचे कण एकदां निघाले, आतां मागें जें कांहीं राहिलें आहे तें निवळ फोलपट आहे, तो कोंडा आहे. त्या कोंडयामधून आतां दुसरा दाणा निघेल ही आशा व्यर्थ आहे. एखाद्या सोसाट्याच्या वाऱ्यानें यावें, आणि या फोलफटांना उडवून न्यावें, एवढेंच यांच्यासंबंधीं आतां उरलें आहे. पूर्वींचे सरदार आणि जहागीरदार यांच्या-मध्येंहि आशा सांपडणें दुर्घट आहे. एखाद्या एजंटानें, गव्हर्नरनें किंवा व्हाइसरॉयनें दरबार भरविला तर ज्यांचे टोळांच्याप्रमाणें थवेच्या थवे उजव्या बाजूच्या खुर्च्या भरून काढतात ते देशाच्या उन्नतीला काडी-

इतकेहि उपयोगी नाहींत. पूर्वीं मोगलाईत किंवा पेशवाईत यांना इनामें आणि जहागिरी होत्या, तें ठीक होतें. कारण त्याबद्दल त्यांच्यापासून चाकरी करून घेण्यांत येत होती. परंतु आतां सरकारच्या नवीन पद्धतीप्रमाणें या बारभाई खेतीपासून लष्करी चाकरी घेणें म्हणजे आपल्या सुव्यवस्थित राज्यव्यवस्थेमध्यें जास्त घोंटाळा करून घेणें होय, अशी स्थिति असल्या-मुळें यांची चाकरी सरकार घेत नाहीं. परंतु आपण यांची चाकरी घेत नाहीं म्हणून यांचीं सगळींच जातइनामेंहि काढून घेतलीं तर हे पूर्वींचे गर्भश्रीमंत आतां भिकार होऊन कदाचित् असंतुष्ट होतील; तेव्हां लांचा-दाखल यांच्याकडे पूर्वींचीं कांहीं इनामें ठेवून सरकारनें यांना आपले मिंधे करून ठेविलें आहे. त्या इनामांच्या पायीं देशाचा जो पैसा खर्च होत आहे त्यापासून स्वराज्य असतें तर चाकरीच्या रूपानें कांहीं फायदा झाला असता. परंतु हल्लीं परराज्य असल्यामुळें त्यांच्या चाकरीचा फायदा देशाला न मिळून देशाचे इतके पैसे निव्वळ फुकट जातात, व फिरून आपल्याच देशातील पैशांनीं हे इतके लोक ब्रिटिश सरकारचे मिंधे होतात, हा कांहीं देशाचा लहान तोटा नव्हे. येथें काम करून विलायतेस गेलेल्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या पेन्शनचा पैसा हिंदुस्थानचा बुडीत खर्च आहे, अशी नेहमी ओरड करणाऱ्या लोकांच्या लक्षांत हा स्वदेशीं होत असलेला बुडीत खर्च येत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. त्यांतल्या त्यांत युरोपियनांनीं परदेशांत पैसा नेण्यापेक्षां आपलेच लोक आपल्या देशांत त्याचा उपभोग घेत आहेत, यामुळें आपण कोणी याबद्दल गवगवा करीत नाहीं इतकेंच काय तें. बाकी दोन्ही बाबी सारख्याच! सारांश, युरोपियन पेन्शनरांप्रमाणेंच जे सरकारचे मिंधे झालेले, त्यांच्यापासून देशाला आशा काय असणार? जशी ही जहागिरदारांची स्थिति तशीच देवस्थानांची स्थिति झालेली आहे. देवासाठीं दिलेल्या मिळकती खाजगी उत्पन्नें होऊन बसलीं आहेत, आणि अनायासें पैसे मिळत असल्यामुळें धार्मिक किंवा व्यावहारिक बाबतींत कांहीं एक उद्योग न करतां अनेक लोक आळशी, स्वैराचरणी, धर्मभ्रष्ट, दुर्व्यसनी आणि कुलकलंक होऊन बसलेले आहेत. इंग्रज सरकारला हिंदुस्थानांत आपलें राज्य कायम राखावयाचें आहे; म्हणून कोणाच्या धर्मांत हात घालावयाचा नाहीं असा त्यांनीं

नियम केला आहे. धर्मांत हात घालावयाचा नसल्यामुळें देवस्थानांच्या उत्पन्नांत ठेवावयास पाहिजे तशी व्यवस्था त्यांना ठेवतां येत नाहीं, व सरकारी दाब नसल्यामुळें धर्मसंस्थानें आणि देवस्थानें यांच्यामध्यें पूर्ण बेबंदशाही माजलेली आहे. पण सरकार या संस्थानांकडे जो पैसा खर्च करितें तो कोठला ? आमच्याच देशांतील. पण सरकार आमच्या देशाचा पैसा खर्च करीत असून त्याच्या योग्य विनियोगाकडे योग्य तऱ्हेनें पाहात नसल्याकारणानें देशाचे पैसे मात्र खर्च होऊन धर्माभिवृद्धीपासून देशाचा जो फायदा व्हावयाचा तो न होतां अधर्मापासून देशाचें उलट नुकसान मात्र होत आहे. अशी चोहोंकडे स्थिति असल्यामुळें आशेला कोठेंहि जागा नाहीं. फ्रान्समध्यें मागें जी पहिली राज्यक्रान्ति झाली, त्या वेळींहि फ्रान्समध्यें अशीच स्थिति झाली होती. तिकडीलहि सरदार, जहागिरदार, धर्माधिकारी आणि देवस्थानांचे अधिकारी आपल्या इकडच्या-प्रमाणेंच स्वार्थलोलुप, कर्तव्यपराङ्मुख, अनाथांबद्दल बेफिकीर, व स्वतःच्या सुखलेशासाठीं इतरांना अत्यंत पीडा देणारे धर्मभ्रष्ट, आणि धर्माच्या रूढीच्या नांवाखालीं अघोर अधर्म आणि अनन्वित पातकें करणारे असे झाले होते. तशी हुबेहूब स्थिति आज आपल्यामध्यें झाली आहे. राष्ट्राचा प्रत्येक अवयव नासलेला, कुजलेला आणि सडलेला झाला आहे. एकाहि भागामध्यें ताकद उरली नाहीं. प्रत्येक कामांत आणि धंद्यांत इंग्लिशांच्या उच्छिष्टावर आपला चरितार्थ चालला आहे. स्वतःची कल्पकता, बुद्धीचा जोर, सामर्थ्याचा उपयोग, इत्यादि गोष्टी कोठेंच दिसत नाहींत. हिंदुस्थानांतील लोकांची म्हणून जी एक कांहीं विशिष्ट मर्यादा ठरलेली आहे, तिच्या आंत मध्येंच नाचण्यांत जो तो भूषण मानीत आहे. तिचें उल्लंघन करण्याचें धैर्य एकामध्येंहि नाहीं. एक विशिष्ट उंची ठरवून दिलेली आहे, तेथपर्यंत अचाट बुद्धीचे आणि विलक्षण देणगीचे हिंदुस्थानांतील महापुरुष उंच वाढतात; पण त्याच्यावर डोकें काढण्याची महत्त्वाकांक्षा किंवा समर्थता एकामध्येंहि नाहीं. सगळें राष्ट्र रेमेडोक्यांचें ! सगळे लोक एका सांच्यांतून काढलेले ! कांहीं तरी अचाट, अद्भुत आणि विलक्षण कृत्य करणारा एकहि मनुष्य नाहीं. तशी कोणाची बुद्धिहि नाहीं. सामाजिक रूढींचीं बंधनें फार प्रबळ झालीं आहेत, आणि त्यांनीं लोकांचे

हातपाय जखडून टाकिले आहेत, अशी एक सुधारकांची ओरड आहे. कांहीं विलक्षण सामाजिक रूढींनीं आमचे हातपाय जखडून टाकिले आहेत हें तर खरेंच; परंतु कित्येक राजकीय रूढींचीं बंधनेंहि तितकींच उत्तरोत्तर दृढ होत चाललीं आहेत, व त्यामुळें आपण सामाजिक रूढींच्या दाबाखालीं जितके दडपले जात आहों, तितकेच वेडगळ राजकीय रूढीच्या दाबाखालींहि दडपले जात आहों. अशीं अनेक कारणें चोहोंकडून हिंदुस्थानांतील लोकांवर आपापले परिणाम घडवून आणीत असल्यामुळें जिकडे तिकडे सर्व सपाट झालेलें आहे. सामान्यपणाशिवाय दुसरें कोठें कांहीं नाहीं. अद्भुत शक्तीचा किंवा बुद्धीचा उंचवटा कोठेंच नाहीं. कोणत्याहि कामांत का होईना, साहस आणि अद्भुतपणा हीं पाहिजेत. पण हिंदुस्थानांत तसें कांहीं नाहीं. सुधारक धर्मावर आणि समाजावर पूर्वीं हल्ला करीत असत; तेंच का काम होईना, पण त्यांतदेखील अचाटपणा पाहिजे होता. पण सगळे सुधारकसुद्धां रेमेडोकेच ! सुधारणेच्या बाबतींतच का होईना, पण एखाद्यानें एखादें छातीठोक काम केलें आणि सर्व जगाला थक्क करून सोडिलें असें उदाहरण नाहीं. करूं कीं नको करूं केलें तर समाज काय म्हणेल, आणि न केलें तर आपले सुधारक मित्र काय म्हणतील, अशा बुचकळ्यांत पडून 'घुणाक्षरन्याया'नें एखादें सुधारणेचें काम झालें तर सुधारक, आणि नाहीं झालें तर जुन्याचा अभिमानी, अशीं धरसोडीचीं सगळीं कामें चाललीं आहेत. तात्पर्य, खरें धैर्य कोठें नाहीं अचाट कृत्यें करण्याची हिंमत आणि इच्छा कोणामध्यें नाहीं. 'कुच रोटी कुच लगोटी' असें करून कसें तरी पोट जाळावें, याच्यापलीकडे दीर्घोद्यम नाही. याचा खिसा कातर आणि त्याचें पागोटें घे, इत्यादि एकमेकांतील लबाड्यांच्या पलीकडे दृष्टीचा पल्ला गेलेला नाहीं. आहे तें राखावें याच्या पलीकडे नवीन संपादन करण्याची धाडसी महत्त्वाकांक्षा नाहीं. सगळे सरडे बनलेले आहेत, आणि आपल्या समोरच्या कुंपणापर्यंत आपण धांवत गेलों म्हणजे आपण शक्कृत्य केलें, याच्या पलीकडे जगांतील महात्म्यांच्या महत्कृत्यांची ओळख नाहीं. सर्व शेणांत सांपडलेले किडे आहेत. त्या शेणांतच घरें घ्यावीं, वाडे बांधावे, बागांतून हवा खावी, असले क्षुद्र उद्योग जिकडे तिकडे चालू आहेत. परंतु शेणाची घाण

कोणाच्याहि नाकाला येत नाहीं. अत्यंत हीन स्थितीमध्यें पूर्ण संतोष नांदत आहे. तीस कोटी डोक्यांपैकीं कांहीं दहा-पांच डोक्यांतील मेंदूंतसुद्धां कांहीं असामान्यपणाचे, वैलक्षण्याचे आणि अद्‌भुतपणाचे तंतु नसावेत, इतकी विलक्षण सृष्टि हिंदुस्थानाकरितां अलीकडे देवानें मुद्दाम केली आहे, असें असेल तर हा परमेश्वराचा मोठा रोषच होय. कदाचित् कांहीं डोक्यांतून असे तंतू असतीलहि; परंतु त्यांना कधीं चालना न मिळाल्यामुळें अंगांतून बाहेर ओढून काढलेल्या नारूप्रमाणें ते बहुधा मृतप्राय झाले असावेत; किंवा रावणाच्या घरच्या नवग्रहांप्रमाणें ते कदाचित् उपडेहि पडले असतील! कांहींहि असलें तरी आजकाल हिंदुस्थानांत मठ्ठ डोक्यांचें आणि मंद मेंदूंचें साम्राज्य माजलें आहे. त्यामुळें लोकांच्या जीवनक्रमामध्यें कांहीं नवीन असें उरलेंच नाहीं. पुढील दिवसांबद्दल कांहीं आशा नाहीं. लोकांना आयुष्याचे दिवस बेचव, नीरस आणि कंटाळवाणे वाटतात. आजपासून पुढें दहा दिवस काय काय गोष्टी होतील हें ज्योतिषशास्त्राच्या माहितीच्या गंधावांचूनहि प्रत्येकाला सांगतां येईल अशी स्थिति आहे. कारण, दिवस उगवणें, निजून उठणें, दुपार होणें, जेवणें, वगैरे ठराविक गोष्टींपलीकडे दुसरें कांहीं व्हावयाचें नाहीं, हें ठरलेलेंच आहे. कोणी नियमानें आपली डायरी लिहिणारा असला, आणि त्याची वर्षानुवर्षांची डायरी चाळली तरी जेवणें, खाणें, बसणें, बोलणें, निजणें, उठणें यांच्याहून जास्त महत्त्वाची गोष्ट त्यामध्यें कधींहि आढळावयाची नाहीं. असा लोकांच्या वर्तनक्रमामध्यें हाताच्या कर्तव्यांत आणि डोक्याच्या गतींत एक प्रकारचा कंटाळवाणा एकसारखेपणा भरलेला असून तो सर्वांना हिंदुस्थानांतील आयुष्याचा वीट आणि तिटकारा आणीत चालला आहे. जेव्हां मनुष्याच्या डोक्यांत असा मंदपणा उत्पन्न होतो, तेव्हां धरणीकंप, ज्वालामुखीचे स्फोट, उल्कापात, भयंकर मेघगर्जना, विद्युत्पतन, अग्निप्रलय वगैरेसारख्या आधिभौतिक सृष्टचमत्कारांनीं त्यांच्या झोंपीं गेलेल्या मेंदूमध्यें कधीं कधीं एकदम उजेड पडतो. परंतु हिंदुस्थानांत लोकांना जागृत करण्याला असेंहि कोठें होत नाहीं. त्यामुळें सगळी गति कुंठित झाली आहे. नासलेल्या तळ्याचें पाणी कुजून आणि किडे पडून जसें स्तब्ध आणि गतिशून्य होतें, तशी स्थिति झाली आहे. एखाद्या मोठ्या शहरांतल्या अतिशय रहदारीच्या

स्मशानांत प्लेग, पटकी, वगैरेसारख्या रोगांच्या हंगामांत प्रेतांची अतिशय गर्दी जमते, तरी पण त्यांच्यांत कांहींएक हालचाल नसते, तद्वत् देखावा दिसत आहे. चोहोंकडून कोंडल्यासारखें दिसतें. वाट कोठेंच पडत नाहीं. नजरेच्या टप्प्याहून अतिशय उंच अशा निराशेच्या भिंतीनें चोहोंकडून वेष्टिलें आहे. कांहीं केल्यानें कोंडी फुटत नाहीं ! आणि स्तब्ध झालेल्या पाण्याला ओघ फोडितां येत नाहीं ! सर्व रेमींडोकीं माणसें आणि जिकडे जावें तिकडे थोड्याशा अंतरानंतर प्रतिबंधाचे दरवाजे ! "काय करावें, कसें करावें" ही विवंचना सगळ्यांच्या डोक्यांत चाललेली आहे, परंतु तोड मात्र सांपडत नाहीं. रासेलसला जसें चोहोंकडून डोंगरांनीं कोंडून टाकिलें होतें, तशी अवस्था झाली आहे ! प्रत्येक प्रयत्नांत निराशा होत आहे. प्रत्येक कामांत अपयश येत आहे. निरुपाय झाला आहे, उमेद उरली नाहीं, उत्साहाचें नांव नाहीं, हात टेकले आहेत, कंबर खचली आहे, आणि सभोंवतालच्या डोंगरांचीं शिखरें जास्त जास्तच उंच आणि अगम्य होत चाललीं आहेत ! कलकत्त्यास आमच्या सुजाउद्दवल्यानें कांहीं शंभर-सवाशें युरोपियन लोकांना "ब्लॅक होल" नामक एका लहानशा खोलीमध्यें कोंडून ठेविलें होतें, अशी इतिहासामध्यें एक गोष्ट आहे. सुजाउद्दवल्याच्या या अघोर कृत्याचा परमेश्वर बहुधा त्याच्या हल्लींच्या देशबांधवांवर सूड उगवीत आहे, असें दिसतें ! आपण हल्लीं तशाच प्रकारच्या एका 'ब्लॅक होल'मध्यें गुदमरून चाललों आहों. आपल्या दृष्टीला काळोखाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. आपल्या हाताला आपल्याला कोंडणाऱ्या भिंतीवांचून दुसरें कांहींच लागत नाहीं, आपल्या कानांना आपल्या शेजाऱ्यांच्या किंकाळ्यांवांचून दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं, आणि आपल्या मनाला निराशेवांचून दुसरें कांहीं भासत नाहीं. तान्हेनें तोंडें कोरडीं पडलीं आहेत, ओरडून घसे बसले आहेत, भुकेनें पोटें खपाटीला गेलीं आहेत, गाल बसले आहेत, डोळे खोल गेले आहेत, दांतांच्या कवळ्या पुढें आल्या आहेत, पाय गार पडले आहेत, हातांतील नाड्या सुटत चालल्या आहेत, श्वासोच्छ्वासांत चलबिचल उडाली आहे, लागलेल्या घरघरीच्या आवाजांत मंदत्व येऊं लागलें आहे, नाकापुढील कापूसहि

झालेनासा झाला आहे. अशा स्थितींत या ब्लॅक होलच्या भिंती आपण फोडिल्या तरी पाहिजेत, किंवा यांच्या आंत आपण मेलें तरी पाहिजे. याशिवाय तिसरा मार्ग नाहीं.

• • •

# ११. जसे लोक तसे त्यांचे देव !

( काळ : अग्रलेख, ता. ७-४-१९०५ )

हे परमेश्वरा ! तूं मूळचा निर्विकार, निर्विकल्प, निर्गुण, निष्कलंक, निरंजन, निष्क्रिय आणि स्वतंत्र असा आहेस. ज्यांना तुझ्या स्वरूपाचें योगसमाधीनें दर्शन झालें आहे, ते तू असा आहेस म्हणून सांगतात. आणि ज्यांना तुझ्याबद्दल आगमादिकांवरून ज्ञान झालेलें आहे, तेहि तुझ्या स्वरूपाबद्दल अशाच प्रकारचें वर्णन करितात. वेदांनीं तुला याच शब्दांनीं स्तविलें आहे. उपनिषदांमध्यें तुझ्या याच स्वरूपाचें प्रतिपादन आहे. बादरायणांनीं आणि शंकरांनीं अनेक पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष करून, अखेरीस तुझ्या स्वरूपाबद्दलचें हेंच मत स्थापित केलें आहे. परंतु हें फक्त आमच्याच तत्त्वज्ञान्यांचें मत आहे असें नाहीं; इतर देशांतील विचारवन्त तत्त्ववेत्तेहि अखेरीस याच मताला येऊन पोहोंचलेले आहेत, व पोहोंचत आहेत. वास्तविक तुझें असें स्वरूप असतां, व सत्, चित् आणि आनंद यांच्याशिवाय वास्तविक दुसरें कांहीं एक नसतां, हे परमेश्वरा ! तुझ्या रूपासंबंधानें आणि गुणासंबंधानें या जगांतील लोकांनीं काय ढवळाढवळ केली आहे याची तुला कल्पना तरी आहे काय ? सर्व जगाची व्यवस्था तूं उत्तम रीतीनें ठेवितोस अशी तुझी ख्याति आहे, परंतु प्रत्यक्ष तुझ्याच संबंधानें तेथें किती अव्यवस्था माजलेली आहे याच्याबद्दल तुला कांहीं तरी दाद आहे काय ? ‘ एकमेवाद्वितीयं ब्रह्म ’ अशा स्वभावाचा जो तूं त्या तुझे प्रकार किती झाले आहेत ! ‘ सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ’ असें जें तुझें स्वरूप त्यावर असत्य अज्ञानाचीं लोकांनीं किती पुटें चढविलीं आहेत ! आणि ‘ निष्फलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरंजनम् ’ हें ज्या तुझें लक्षण, त्याच्यावर इहलोकीं किती मनोविकारांचे आणि क्रियांचे आरोप केले जात आहेत, याच्याबद्दल तूं कधीं विचारहि केलेला नसावा असें दिसतें. तुझ्या स्वरूपासंबंधानें जितके विपर्यास झालेले आहेत, तितके दुसरे कशाहि संबंधानें झालेले नसतील. आणि तरीहि तूं स्वस्थच आहेस, हें मोठें

आश्चर्य आहे ! तूं वास्तविक अवयवरहित असतां, आमच्या जगामध्यें तुला हात किती असावेत, डोळे किती असावेत, वगैरेबद्दल कडाक्याचे वाद चालतात; व प्रत्येकजण आपापला पक्ष खुद्द श्रुतीच्या आधारावर सप्रमाण सिद्ध करून दाखवीत असतो. कोणी माणसें आपल्या स्वतःप्रमाणें तुला दोनच हात असले पाहिजेत असें मानितात. कोणी 'देव म्हटला म्हणजे त्याला आपल्यापेक्षां कांहीं तरी जास्त असलें पाहिजे' या कल्पनेवर तुला आणखी दोनच हात चिकटवितात. कोणी तुला सहा हात आहेत असें म्हणतात; आणि जो तूं मूळचा अपाणिपाद त्या तुला आठ हात दिल्यावांचून कित्येकांची हौस पूर्ण होत नाहीं. तुझें तोंड आणि डोळे यांच्या-संबंधानेंहि असाच घोंटाळा चाललेला आहे; आणि त्यांची संख्या एक आणि हजार यांच्यामध्यें नेहमीं कमी-जास्त प्रमाणानें बदलत असते. अणूपेक्षांहि जो तूं वास्तविक अणीयान्, त्या तुझा आकार, लांबी, रुंदी व उंची यासंबंधानें तर कोठेंच कांहीं मेळ नाहीं. कोणी तुला लहानशा डबी-मध्यें ठेवितात, आणि कोठें कोठें अतिशय विस्तीर्ण मंदिरेंहि तुला पुरत नाहींत असें जाणून कोणी तीं आणखी वाढवीत असतात. तुझ्या आकाराला लोकांनीं एक प्रमाण असें कोठेंच ठेविलें नाहीं. कोठें लहान, कोठें मध्यम, आणि कोठें अतिशय मोठी, अशा तुझ्या मूर्ती बनविण्यांत येतात. आणि पुष्कळ प्रसंगीं तर मालकाची पैसे खर्च करण्याची शक्ति आणि सुतार, सोनार किंवा पाथरवट यांचें कौशल्य यांच्यावर – हे जगच्चालक परमेश्वरा ! तुझ्या आकृतीचें प्रमाण अवलंबून राहिलेलें आहे. तुझें मूळचें स्वरूप कसेंहि असो; कारागीर लोक तुला जो आकार देतील त्या आकारांत, आणि चितारी जो रंग देतील त्या रंगांत, हे विश्वव्यापक सृष्टिकर्त्या ! तुला रहावें लागत आहे. ज्या तुझ्यापासून पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहा-भूतें निर्माण होतात, त्या तुझें शरीर कोणी मातीचें बनवितात, कोणी दगडाचें बनवितात, कोणी लांकडाचें बनवितात, आणि कोणी धातूंचें बनवितात. ज्या प्रांतांत ज्या दगडाच्या खाणी उपलब्ध असतील, त्या प्रान्तांत त्या मानानें त्या त्या दगडाचें शरीर तुला प्राप्त होतें ! संगमरवरी दगडाच्या खाणी असतील तेथें तुला काळ्या दगडाचा बनवून तुझी किंमत कमी करण्याचें पातक कोणीहि करीत नाहींत. परंतु जेथें निरुपायच आहे, तेथें काळ्या

दगडाच्या मधूनच तुझें सत्स्वरूप लोकांना फोडून बाहेर आणावें लागतें. तूं जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं सर्वत्र भरलेला असतांनाहि तुझ्या मूर्ती फक्त कांहीं ठिकाणींच स्वयंभू मानल्या जातात, आणि बाकीच्या ठिकाणींच्या मूर्ती उसनवार असल्या पाहिजेत असें लोक समजतात. ह्या तुझ्या बहिरंगासंबंधाच्या गोष्टी झाल्या. परंतु तुझ्या अंतरंगाबद्दलहि आम्ही इहलोकींच्या माणसांनीं असेंच एकेक विलक्षण चमत्कार करून ठेवलेले आहेत. तुला आमच्यासारखेंच क्षुद्र आनंदानें आनंदित होणारें आणि क्षुद्र दुःखानें दुःखित होणारें मन आम्हीं दिलेलें आहे, हें तुला माहीत असेलच ! आणि तूं निर्विकार आहेस म्हणून श्रुति आणि स्मृति कितीहि ओरडत असल्या तरी तुला आमच्यासारखेच मनोविकार आहेत, असें आम्हीं ठरविलें आहे ! आम्हांला जसे राग आणि द्वेष आहेत, त्याचप्रमाणें तुलाहि असल्याचें आम्हीं कल्पिलें आहे. एखाद्या साध्या आणि विकारवश माणसाप्रमाणें तूं आमच्यावर रागावतोस, आणि लहर लागेल तेव्हां आमच्यावर खूषहि होतोस. अशा मनोविकाराच्या तडाक्यामध्यें सांपडल्यामुळें तू कधीं कधीं एखाद्या अगदीं क्षुद्र मनुष्याप्रमाणें वर्तन करतांना आढळतोस ! तुला एक पैशाची खडीसाखर दिली म्हणजे तेवढ्यावरच खूष होऊन आमच्या एखाद्या श्रीमंत बाईची हजारों रुपये किंमतीची हरवलेली नथ जेथें होती तेथें तूं आणून ठेवतोस ! आणि एखाद्या कुळंब्याच्या बाईनें तुला कोंबडें दिलें नाहीं तर तिच्यावर रागावून तूं तिच्या मुलाचा हिंवताप बंद करीत नाहींस ! तुला एखाद्या कचेरींतील कारकुनाप्रमाणें नवसाचा लांच दिल्यावांचून तूं लोकांचें काम करीत नाहींस, आणि एखाद्या हट्टी मुलाप्रमाणें तुला पाण्यांत कोंडल्यावांचून तूं पाऊस पाडीत नाहींस, किंवा एखाद्या माणसाला लवकर घरीं आणीत नाहींस ! हे अनंता, हे पुरुषोत्तमा ! हे धर्म तुझ्या ठिकाणीं कसे संभवतात ? हे जे लोकांनीं तुझ्यावर अज्ञानामुळें अनेक अध्यारोप केलेले आहेत, ते सर्व वाईटच आहेत; परंतु तूर्त या हिंदुस्थानच्या राजकीय स्थितीला अतिशय घातक असे जे कित्येक अध्यारोप तुझ्यावर झालेले आहेत, ते मात्र अतिशय दोषार्ह आणि असह्य असे आहेत.

हे परमेश्वरा ! तूं जरी सर्वोत्कृष्ट, सर्वश्रेष्ठ आणि सर्वगुणसंपन्न असा आहेस, तथापि तुझें सर्वांशांनीं आकलन करण्याला सर्वच लोक समर्थ

असतात असें नाहीं. त्यामुळें कित्येक लोक आपापल्या मगदुराप्रमाणें तुझ्या स्वरूपाची कल्पना करून घेतात. समुद्र हा जरी सर्व उदकांनीं संपूर्ण असला, तरी ज्याच्यापाशीं जेवढें भांडें असेल तेवढेंच तो त्याच्यामधून भरून घेणार ! आणि म्हणूनच जशी लोकांची किंमत असेल, त्या मानानें त्यांचे देव बनलेले असतात. मूळचें देवांचें स्वरूप कसेंहि असो, देव मानणारे लोक जितके रानटी किंवा सुधारलेले असतील, तितकें त्यांच्या देवाचें स्वरूप रानवट किंवा सुधारलेलें असतें, असें या जगांतील निरनिराळ्या थरांवरच्या लोकांच्या स्थितीवरून दिसून येतें. रानांत राहणारे लोक वृक्षांना आणि विशिष्ट आकारांच्या दगडांना, भुतांना आणि मेलेल्या माणसांच्या अवशेषांना देव मानतात ! त्यांना नदीच्या पाण्यांत आसरा ( अप्सरा ) आणि डोंगरांच्या शिखरांवर समंध दिसतात. पूर्वींचे ईजित-मधील जुने लोक पशूंनाहि देव मानीत असत. देवाविषयींची कल्पना अज्ञानावस्थेमध्यें जास्त स्थूल असते. परंतु जसजशी लोकांमध्यें सत्यज्ञानाची वृद्धि होत जाते, तसतसा अज्ञानाबरोबर देवतांचाहि स्थूलपणा झडत जातो. आणि जसजसें ज्ञान सूक्ष्म होत जातें, तसतशी देवाची कल्पनाहि सूक्ष्मत्व पावत जाते. वेदान्तामध्यें ' नेति नेति ' या श्रुतीनें जें परब्रह्मस्वरूप निषेधाच्या भाषेमध्यें वर्णिलेलें आहे, तो सूक्ष्मत्वाचा कळसच होय. तितक्या पायरीला पोहोंचणारे फारच थोडे भाग्यवान् पुरुष या भूतलावर अवतीर्ण होतात. सामान्य लोक म्हटले म्हणजे यांच्यापेक्षां खालच्या कोटींतीलच असावयाचे, अशा जड लोकांमध्यें देवाविषयींच्या जड कल्पनाच प्रसृत झालेल्या असा-वयाच्या, आणि म्हणूनच जड बुद्धीच्या लोकांनीं आपले मनोविकार देवावर लादून त्यांची आपल्यासारखीच एक मनोविकारयुक्त क्षुद्र व्यक्ति बनविलेली असते. यावरून ' जसे लोक तसे त्यांचे देव ' हा सिद्धान्त बिनचूक दिसतो. एखाद्या लोकांचे देव कसे आहेत याची कल्पना बरोबर कळली, तर त्यावरून ते लोक किती प्रतीचे आहेत हें सहज ताडतां येण्यासारखें आहे. यावरून हें दिसून येईल कीं, लोकांच्या स्थितीचा देवाच्या स्वरूपावर नेहमीं पुष्कळ परिणाम होत असतो. परंतु याच्या उलट सिद्धान्तहि खरा आहे कीं, परमेश्वराच्या स्वरूपाची शुद्ध कल्पना लोकांच्या डोळ्यांपुढें मांडलेली असली, तर त्या कल्पनेचा, लोकांची स्थिति शुद्ध आणि उन्नत

करण्याच्या कामीं पुष्कळ उपयोग होतो. असा या दोन गोष्टींचा अन्योन्य परिणाम होत असल्यामुळें राष्ट्राच्या राजकीय उन्नतीच्या दृष्टीनें ईश्वरस्वरूपाविषयीं विशुद्ध कल्पना असणें फार जरूर आहे.

परंतु पुष्कळ वेळां असेंच आढळून येतें कीं, लोक स्वतः जसे असतात, तसेच ते आपले देव बनवितात. काळे लोक आपल्या देवाला काळा रंग देतात. खुजा लोकांच्या देवांच्या मूर्ती फारशा उंच नसतात, आणि चापट नाकाचे लोक आपल्या देवांच्या मूर्तींनाहि तरतरीत नाकें देत नाहींत. ह्या शरीरधर्मांप्रमाणें लोक आपले मनोधर्महि आपल्या देवांवर संक्रमित करितात. सत्यवादी लोकांच्या देवांसंबंधींच्या गोष्टींतून देवांना असत्यपणा लावलेला आढळत नाहीं, आणि असत्यवादी लोक देवांच्या काल्पनिक गोष्टींतून त्यांच्या तोंडीं असत्य भाषणें घालण्याला मागेंपुढें पाहात नाहींत. तापट लोकांचे देवहि उग्र असतात, आणि मंदट लोकांच्या देवांचीं स्वरूपें मंद आणि थंड अशीं असतात. स्वतंत्र लोकांचे देव स्वतंत्र असतात, आणि गुलाम लोक आपल्याबरोबर आपल्या देवांनाहि गुलाम बनवितात. हें लोकांच्या मनोविकारांचें देवतांमध्यें पडलेलें प्रतिबिंब निरनिराळ्या लोकांमध्यें तर निरनिराळ्या स्वरूपानें दृग्गोचर होतच असतें, परंतु एकाच लोकांमध्यें-सुद्धां निरनिराळ्या काळीं निरनिराळीं प्रतिबिंबें त्या त्या वेळच्या विकारांच्या अनुरोधानें उमटलेलीं दिसतात. आपल्याच पुराणांतील गोष्टी घेतल्या, तर त्यावरून असें दिसून येतें कीं, विष्णु ही देवता लोकांच्या मनांतील सत्त्वगुणाचा उत्कर्ष प्रदर्शित करिते, आणि शंकर ही देवता आपल्या उपासकांच्या तमोगुणाची साक्ष देते. श्रीरामचंद्राची मूर्ति हें लोकांच्या मनातील वीररस आणि सत्यनिष्ठा यांचें द्योतक आहे. हे जसे मनुष्याच्या मनोविकारांचे स्पष्ट छाप देवतांवर उमटलेले आहेत, तसेच कित्येक गोष्टीतून परतंत्रतेचे आणि गुलामगिरीचे छापहि देवावर स्पष्टपणें उमटलेले आहेत. पुराणकालच्या गोष्टी जेव्हां घडून आल्या, किंवा रचल्या गेल्या, त्या वेळीं आपण स्वतंत्र होतों, म्हणून त्या वेळच्या देवतांवर गुलाम-गिरीचे छाप फारसे उठलेले नाहींत. तरी पण रावण वगैरे मंडळींच्या बंदीशाळेंत पडलेल्या देवतांच्या गोष्टी त्यांतहि नाहींत असें नाहीं; पण ते अपवाद होत. सामान्यतः तो काळ स्वतंत्रतेचा होता. परंतु आपल्या गुलाम-

गिरीचा स्पष्ट काल म्हटला म्हणजे मुसलमानी बादशाहीचा होय. या काळांत प्राधान्य पावलेल्या देवतांचें किंवा त्यांच्या गुणांचें पर्यालोचन केलें असतां तेथें लोकांच्या गुलामगिरीचीं स्पष्ट चिह्नें कोणालाहि दृश्यमान् झाल्यावांचून राहणार नाहींत. या गोष्टिच्या स्पष्टीकरणार्थ आपण त्या वेळच्या संतमंडळींनीं केलेल्या उत्कृष्ट आणि हृदयद्रावक अशा वाङ्मया-पैकीं दामाजीपंत आणि सेना न्हावी या दोघांच्या कथा घेऊं. या दोन्हीहि गोष्टी फार उत्तम आहेत. आणि ह्यांपैकीं दामाजीपंताची गोष्ट तर इतकी सुंदर, मनोवेधक आणि प्रेमळ आहे कीं, ती ऐकून ज्याच्या डोळ्यांतून अश्रु निघणार नाहींत, असा मनुष्यच सांपडणें कठिण. परंतु या गोष्टीमध्यें स्वतंत्रतेच्या अभिमानाच्या दृष्टीनें एक मोठें व्यंग आहे. नारसिंहावताराची गोष्ट ही खरोखर स्वतंत्रतेच्या काळांतच लिहिली गेलेली असली पाहिजे. तो लिहिणारा स्वतंत्रच मनुष्य असला पाहिजे. कोणताहि गुलाम नारसिंहाची गोष्ट लिहूं शकणार नाहीं. परंतु तीच दृष्टि दामाजीपंत आणि सेना न्हावी यांच्या गोष्टींकडे वळवा, म्हणजे आपल्या दृष्टीला काय दिसतें! बादशहाच्या हजामतीला उशीर होतो, म्हणून आमचा परमपूज्य देव विठोबा खाकेंत धोकटी घालून आणि न्हाव्याचा वेष घेऊन बादशहाची हजामत करण्याकरितां जातो! आणि दुष्काळांत उपाशी मरणाऱ्या लोकांना अन्नदान करण्यांत खर्च झालेली सरकारी रसद पोहोंचविण्याकरितां ब्रह्माण्डाचा धनी आणि त्रैलोक्याचा नायक जो सर्व सामर्थ्ययुक्त विठोबा तो ‘ विठ्या महार ’ बनून हिंदुस्थानावर जुलूम करणाऱ्या बादशहापुढें लवून मुजरा करितो! ह्या गोष्टी ज्यांनीं रचिल्या, किंवा त्या खऱ्या घडल्या असल्या तर त्या ज्याना मान्य झाल्या, त्यांच्या गुलामगिरीची छाया यांमध्यें स्पष्ट दिसत आहे. या गोष्टींप्रमाणें देवहि जेथें बादशहांची इतकी मिजास सांभाळतात, तेथें असल्या गोष्टींचा लोकांची गुलामगिरी वाढविण्याच्या कामीं किती वाईट परिणाम होत असला पाहिजे, याची कल्पनाहि करणें कठिण आहे. बादशहाच्या हजामतीला थोडा उशीर झाला असता म्हणून त्रैलोक्य-नायकाचें काय बिघडत होतें? सेना न्हाव्याची भक्ति कवीला व्यक्त करावयाची होती, ही गोष्ट खरी आहे; परंतु गुलामगिरीची वृद्धि ज्यानें

होईल अशा रीतीनेंच भक्तीचें वर्णन एखाद्या कवीनें करणें जरूर आहे असें नाहीं. दामाजीपंतानेंहि सत्कार्यांतच धान्याचा विनियोग केलेला होता. ज्या लोकांचे त्यानें दुष्काळांत प्राण वांचविले, तीं देवानेंच निर्माण केलेलीं माणसें होतीं. त्या मरणोन्मुख लोकांना दामाजीपंतानें वांचविलें, ही गोष्ट त्यानें चांगली केली असें जर देवाला वाटत होतें, तर मग त्या कामीं बेदरच्या बादशहाची एवढी मिनतवारी कशाला पाहिजे होती ? नृसिंह हा जर त्या ठिकाणीं देव असता, तर तो न्हाव्याची धोकटी अगर महाराची घोंगडी शोधीत खात्रीनें कधींहि बसला नसता. आपल्या भक्तांस छळणाऱ्या शत्रूवर त्यानें आपल्या नखांचाच प्रहार केला असता. पण ‘ जसे लोक तसे त्यांचे देव ! ’ आणि गुलाम लोकांचे देवहि गुलामच ! मुसलमानांच्या गुलामगिरींत राबत असलेल्या कवींच्या, ग्रंथकारांच्या आणि साधुसंतांच्या लेखणींतून असल्या गुलाम देवांशिवाय दुसरें चित्र निघणें शक्यच नव्हतें. गोष्टी, कथा, कथानकें, पुराणें वगैरे हीं सर्व राष्ट्राचे शिक्षक आहेत. त्यांनीं आपल्या राष्ट्राला उच्च आणि उदात्त असेच विचार शिकविले पाहिजेत. देवांनीं गुलामगिरींत प्रावीण्य मिळविल्याबद्दलच्या कथा राष्ट्राच्या प्रगतीला विघातक होतात. धार्मिक ग्रंथांतून आणि कथांतून तर असले हे गुलामगिरीचे पोषक विचार बिलकुलच असतां कामा नयेत. कारण या कथा लहानपणींच मुलांच्या कानांवर जातात, आणि त्यांतील तत्त्वें लहानपणापासून त्यांच्या मनांत मुरतात, आणि मोठेपणीं त्यांच्या प्रत्येक कृत्यांतून तीं तत्त्वें प्रादुर्भूत होतात. अशा स्थितींत आपण आपल्या मुलांना कोणतीं तत्त्वें शिकवितों, इकडे प्रत्येकानें लक्ष पोहोंचविलें पाहिजे.

‘ जसे लोक तसे त्यांचे देव ’, हें तत्त्व इतर ठिकाणच्या इतिहासांतूनहि दिसून येतें. युरोपांतील धार्मिक चळवळींच्या [illegible] पाहिलें, तर तेथेंहि हीच गोष्ट निदर्शनास येते. तिकडील लोक रोमन कॅथोलिक पंथाचे होते, तोंपर्यंत त्यांना लांकडाचे, दगडाचे, वगैरे सर्व प्रकारचे देव खपत असत. परंतु ल्यूथरनें सर्व युरोपखंडामध्यें सत्यज्ञानाचा प्रकाश प्रसृत केल्यानंतर तेच लोक इकोनोक्लॅस्टस बनून देवांच्या मूर्ती फोडूं लागले. प्रॉटेस्टंट लोकांच्या बुद्धीची सूक्ष्मता जशी वाढली, तसे त्यांना मातीचे आणि दगडाचे देव चालेनासे झाले.

जॉन नॉक्स हा जो प्रसिद्ध स्कॉटिश धार्मिक सुधारक, तो आपल्या गुन्ह्याच्या शिक्षेबद्दल समुद्रांत वल्हीं मारीत असतां त्याला मेरीची एक लांकडी मूर्ति अभिवंदनासाठीं जेव्हां देण्यांत आली, तेव्हां त्यानें त्या लांकडाला वंदन न करितां तें समुद्रांत फेंकून दिलें. इतर लांकडांप्रमाणें तेंहि लांकूड पाण्यावर तरंगत राहिलें, आणि कांहीं वेळानें कॅथोलिक धर्मांतील ती मेरी कोठें वाहून गेली तिचा पत्ता नाहीं ! ह्यावरून विचारांच्या सूक्ष्मतेप्रमाणेंच प्रत्येक मनुष्याला देव लागत असतो हें दिसून येतें. फ्रान्समध्यें राज्यक्रान्ति होण्याच्या पूर्वीं कॅथोलिक धर्माचेंच प्राबल्य होतें. परंतु त्या राज्यक्रान्तीच्या वेळीं समान हक्क, स्वतंत्रता वगैरे तत्त्वांचा सर्व फ्रेंच राष्ट्रामध्यें इतका कांहीं अनावर संचार झाला कीं, त्या संचाराच्या भरांत लोकांनीं पूर्वीच्या देवतांच्या सर्व मूर्ती पदच्युत करून Equality, Liberty (समानता, स्वतंत्रता) या भाववाचक कल्पनांच्या प्रत्यक्ष मूर्ती बनवून मुख्य मुख्य ठिकाणीं स्थापित केल्या. ‘ जसे लोक तसे त्यांचे देव ’, हें तत्त्व या फ्रान्सच्या वरील उदाहरणावरून अतिशयच स्पष्ट रीतीनें व्यक्त होत आहे. परंतु या तत्त्वाच्या स्पष्टीकरणाच्या कामांत फ्रान्सचीच एवढी मोठी प्रतिष्ठा पाहिजे आहे असें नाहीं. ‘ जसे लोक तसे त्यांचे देव ’ हें तत्त्व आपण हिंदुस्थानांतील लोकहि कमी व्यक्त करीत आहों असें नाहीं. पण आपण जसे गुलाम तसे आपले देवहि आपण गुलाम बनविले आहेत; याचे अनुभव आपल्याला पदोपदीं आहेत. परंतु एका गृहस्थानें याविषयीं सांगितलेली एक हकीकत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तो म्हणाला, “ कांहीं वर्षांपूर्वीं प्रिटोरियामध्यें इंग्लिशांना जय मिळाला तेव्हां हिंदुस्थानांत जिकडे तिकडे उत्सव झाला. त्या वेळीं आमच्याहि गांवांत महोत्सव झाला. ध्वजा लागल्या, पताका उभारल्या गेल्या, आंब्याचे टाहाळे झाडांच्या खांदीवरून निघून कमानीच्या खालीं टांगून लोंबत राहिले, आणि शाळेंतील मुलें उत्तम उत्तम कपडे घालून मिरवूं लागलीं. हा प्रकार मला फारसा इष्ट न वाटल्यामुळें आमच्या येथें गांवाबाहेर एक उत्तम, रमणीय आणि आल्हादकारक देवस्थान आहे, तिकडे मी आपल्या मनाची करमणूक करून घेण्याकरितां गेलों. परंतु ज्या त्रासानें मी तेथें गेलों, त्या त्रासाचें कारण तर तेथें जास्तच जोरांत आलेलें दिसलें. तें

देऊळ सर्व बाजूंनीं शृंगारलेलें, आणि देवाच्या अंगावर त्या दिवशीं सर्व उत्तम पोषाख आणि दागिने घातलेले मला आढळले. त्या देवावर माझी फार श्रद्धा होती; परंतु ‘ प्रिटोरिया डे ’च्या दिवशींचा देवाचा तो थाट पाहून मला देवाचा किळस आला, आणि माझ्या तोंडून पुढील उद्गार निघाले : “ देवा ! तूंहि आमच्यासारखा गुलाम बनलास ! ‘ प्रिटोरिया डे ’साठीं तुला पोषाख करून आणि दागिने घालून काय करावयाचें होतें ! मला वाटलें होतें कीं, शाळेंतील लहान लहान अज्ञान मुलें फक्त आज नटलीं असतील. पण तूं तर त्या लहान मुलांपेक्षांहि जास्त ऐट केली आहेस ! म्हणून मी तुझ्याजवळ आपलें दुःख निवेदन करण्यासाठीं आलों, तो तूं त्या मुलांपेक्षांहि जास्त अज्ञान झालेला माझ्या दृष्टीस पडत आहेस ! अथवा देवा ! तुझा तरी काय उपाय ? तूं गुलाम लोकांच्या हातीं सांपडला आहेस ! तेव्हां ते लोक तुला गुलाम बनविल्यावांचून कधींहि सोडावयाचे नाहींत. अशा लोकांना शहाणपण शिकविण्याचें टाकून तूंहि त्या गुलामां-बरोबर गुलाम बनतोस, हें आमच्या देशाचें दुर्भाग्य होय.” ही गोष्ट आपले हल्लींचे देव कसे गुलाम झाले आहेत हें चांगल्या रीतीनें व्यक्त करिते.

या सगळ्या विवेचनावरून, ‘ जसे लोक तसे त्यांचे देव ’ हें तत्त्व सिद्ध होतें खरें; परंतु हे परमेश्वरा, आमची तुझ्यापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, आमच्या अवगुणांनीं तूं कलुषित न होतां तूं आपल्या सद्‌गुणांनीं आम्हांला मंडित कर. हे विश्वचालका ! तुझीं जीं या पृथ्वीवर अल्प प्रतिमास्वरूपें आहेत, तीं जरी आमच्या दोषांनीं संसृष्ट होत असलीं, तरी तूं जसा आहेस तसें आम्हांला करण्याचें तुझ्या अंगामध्यें सामर्थ्य नाहीं असें नाहीं. आणि या वेळीं तर तुझ्या कृपेची आम्हांला आणि आमच्या देशाला फारच आवश्यकता आहे. आम्ही आणि आमचा देश इतक्या वाईट स्थितीला जाऊन पोहोंचलों आहों कीं, त्या स्थितींतून वर निघण्याला तुझ्या कृपेशिवाय दुसरें कांहींच साधन नाहीं, असें प्रत्येकाला वाटूं लागलें आहे. याकरितां तूं सर्वांना स्फूर्ति दे, सर्वांच्या अंतःकरणांत सद्बुद्धि उत्पन्न कर, आणि सर्वांचें लक्ष आपल्या देशाच्या आणि तुझ्या सेवेकडे लागेल असें कर !



● ● ●

# १२. मंगळ

( काळ : स्वतंत्र लेख, ता. २३-६-१९०५ )

ग्रहांचीं स्तुतिपर स्तोत्रें पुष्कळ आहेत; आणि अलीकडे तर ग्रहपूजेचें स्तोम पुष्कळच माजलें आहे. मराठींतलें हें पहिलें राजकीय ग्रहस्तोत्र म्हटलें पाहिजे.

रात्रीच्या प्रहरीं कोठल्या तरी उघड्या मैदानांत उभा राहून मी आ[illegible] घटकाघटका टक लावून पाहात बसतों. त्या वेळीं माझ्या मनांत अनेक प्रकारचे तरंग उत्पन्न होतात. सूर्याचा अस्त झाल्यानंतर आकाशामध्येंहि जिकडे तिकडे अंधःकार माजतो; त्याप्रमाणें हल्लीं आपल्या हिंदुस्थानामध्येंहि प्रबळ अंधःकार माजलेला आहे, असें मला दिसून येतें. आकाशामध्यें तेजाचा एक किरणहि कोठें उरलेला नसतो, त्याप्रमाणें हिंदुस्थानच्या विस्तीर्ण मर्यादेमध्यें कोठेंहि आशेचा लेश उरला नाहीं, ही गोष्ट मला दृग्गोचर होते. अशा अनेक कारणांनीं रात्रीच्या वेळचें आकाश आणि हल्लींच्या वेळचें हिंदुस्थान यांच्यामधील साम्याची कल्पना मनामध्यें वृद्धिंगत होत जाते, व त्या योगानें रात्रीच्या वेळचें आकाश पाहिलें म्हणजे प्रत्येक खेपेला हिंदुस्थानची मला आठवण होते. हिंदुस्थानला भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभ्या राहतात, व या संकटांतून हिंदुस्थानला कोण सोडवील, अशाविषयींचे प्रश्न मनामध्यें उचंबळूं लागतात. अशा मनाच्या व्यग्र स्थितीमध्यें हिंदुस्थानला सोडविणारा कोणी आहे काय; हें जणूं काय शोधण्यासाठीं माझी दृष्टि चोहोंकडे संचार करूं लागते. पृथ्वीतलावर कोणीहि दृश्यमान् होत नसल्यामुळें ती साहजिकपणेंच आकाशतलाकडे वळते. पण आकाशांत तरी कोण आहे? हिंदुस्थानच्या संकटनिवारणासाठीं सध्यां कोणी कोठेंहि दिसत नाहीं. पण त्यांतल्या त्यांत जर कांहीं आशा असली तर ती आकाशांतच आहे. कारण, परमेश्वरावांचून अशा राष्ट्रीय संकटापासून सोडविण्याला अन्य कोण समर्थ आहे! पण त्याशिवाय दुसराहि एक विचार आहे. रात्रीच्या प्रहरीं आकाशाकडे पाहिलें म्हणजे असंख्य तारे दिसतात. परंतु त्या सगळ्यांमध्यें मंगळ ग्रह हा मला

फार प्रियकर वाटतो. हा राजकीय ग्रह आहे. शौर्य, पराक्रम, तेज, क्रोध, आवेश, अभिमान, युद्धनैपुण्य, राजवैभव इत्यादि अनेक उदात्त गोष्टींचा हा दाता आहे. युद्धातील विजय आणि राष्ट्रांचे उत्कर्ष हे या महात्म्याच्या कृपादृष्टीपासून उत्पन्न होत असतात. सर्व लोकांचें स्वास्थ्य आणि राष्ट्रांचें स्वातंत्र्य हे मंगळाच्या अनुकूल स्थितीचे परिणाम आहेत. या कारणामुळें आकाशामध्यें रात्रीं लक्षावधि तारे चमकत असले तरी त्यांपैकीं कोणाचीहि पर्वा न करतां मी आपली दृष्टि मंगळावर स्थिर करतों. हा आपला तारा, हा आपल्या देशाचा भाग्यदायक, हा आपल्या लोकांचें सुखनिधान, अशा मंगळाबद्दल माझ्या मनामध्यें अनेक भावना उत्पन्न होतात; व त्या योगानें त्याच्यावर माझें प्रेम बसतें, आणि माझ्या आशा त्याच्याकडे धांव घेतात. आकाशांत लक्षावधि तारे चमकत आहेत, परंतु मला त्यांतील एकहि नको. माझी सर्व श्रद्धा एकट्या मंगळावर आहे. तो तारा रात्रीं आकाशामध्यें पाहिला आणि रात्रीसारखी आपल्या हिंदुस्थानची स्थिति लक्षांत आली, म्हणजे तर माझें मन त्या मंगळाकडे विशेषच धांव घेतें. रात्रीच्या शान्तपणांत आणि एकान्तपणांत अशा भावनेनें त्या तेजःपुंज मंगळाच्या ताऱ्याकडे एकसारखे पाहूं लागल्यानें तो तारा माझ्या जवळजवळ येत आहे, आणि मीहि त्या ताऱ्याच्या जवळ जवळ जात आहें, असा भास उत्पन्न होतो. व असल्या एकनिष्ठेच्या ध्यानांत आम्हां दोघांमध्यें कांहीं भाषा सुरू होते. मंगळाला आपल्या विलक्षण आकर्षणानें जरी कित्येक राष्ट्रीय शुभदायक परिणाम घडवून आणितां येत असले, तरी त्याला बोलतां येत नाहीं किंवा बोललेलें ऐकतां येत नाहीं, या गोष्टी मी विसरून जातों. मला उपासकाला माझें उपास्य दैवत प्रत्यक्ष भेटत आहे अशी मनाची धारणा होते; आणि मी त्या आपल्या उपास्य मंगळाची प्रार्थना करूं लागतों. मी त्याला म्हणतों, " हे मंगळा, तूं स्वतंत्रतेचा तारा आहेस. युद्धातील विजयावर तुझा अंमल चालतो. राष्ट्रीय दिग्विजयाचा उगम तुझ्यापासून आहे. एखाद्या देशानें सुसंपन्न, वैभवशाली आणि स्वातंत्र्ययुक्त असावें, या गोष्टी म्हणजे केवळ तुझ्या एका कृपाकटाक्षाचा खेळ आहे. तूं ज्या देशाकडे क्रोधानें पाहशील त्याचीं सैन्यें रणांगणांतून पळून जातील, आणि त्याचीं गलबतें समुद्राच्या तळाशीं दडून बसतील. कोणत्या राष्ट्रानें अभ्युदयाला यावें,

आणि कोणत्या देशांतील लोकांच्या पायांत गुलामगिरीच्या शृंखला पडाव्या, या गोष्टी प्रथमतः तुझ्या दरबारामध्यें ठरतात; आणि राष्ट्रांच्या उन्नतीचे किंवा अवनतीचे पहिले हुकूम तुझ्या मंडळापासून सुटतात; असें तुझ्यामध्यें सामर्थ्य आहे. म्हणून हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, तुझ्याजवळ माझी अशी प्रार्थना आहे कीं, तूं अतःपर आमच्या या दीन झालेल्या हिंदुस्थान देशाकडे वक्र दृष्टीनें पाहूं नको. तू या देशावर रागावूं नको, किंवा येथील लोकांविषयीं क्रोधाविष्ट होऊं नको. हा देश तुझा आहे व तूं या देशाचा आहेस; कारण, आमच्या या देशांतील ज्योतिःशास्त्रवेत्त्यांनींच प्रथम तुझें महत्त्व जाणलें, व तें लोकांमध्यें प्रसिद्धीस आणलें. हजारों तारे आकाशांत रोज उगवत होते आणि मावळत होते, पण त्यांची कोणीहि दाद घेत नव्हतें. अरण्यांतील फुलांप्रमाणें या आकाशांतील फुलांनीं दररोज संध्याकाळीं प्रफुल्लित व्हावें आणि सकाळीं कोमेजून जावें, परंतु त्यांचा वास घ्यावयाला कोणी नाहीं, अशी कित्येक काळपर्यंत तुमची उपेक्षा चाललेली होती. अशा स्थितींत आमच्या वेदकालीन ऋषींनीं प्रथमतः तुमची वास्तपुस्त घेण्याची सुरुवात केली. सारें जग तुमच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहात नव्हतें, अशा वेळीं या हिंदुस्थानच्या ऋषींनीं तुमच्याकडे पाहिलें, तुम्हांला जाणिलें, आणि तुमचें महत्त्व सर्व जगाला जाणवून दिलें. तुमचें पहिलें गौरव आमच्या हिंदुस्थानच्या लोकांनीं केलें; आणि नंतर मग ॲसीरियन, ईजिप्शन, ग्रीक, रोमन, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे लोकांमध्यें तुमचा सल्ला घेण्याची चाल पडली. सारांश, तुमच्या महत्त्वाचा जन्म हिंदुस्थानांत झालेला असल्यामुळें, हे स्वतंत्रतेच्या आणि पराक्रमाच्या ताऱ्या, हिंदुस्थान हें तुमचें माहेरघर आहे. ह्याच्यावर तुम्ही कधींच अवकृपा करावयाची नव्हती. परंतु दुर्दैवानें आज आठ-नऊशें वर्षांमध्यें एक-दोन वेळां खेरीज करून ही गोष्ट तुमच्या कधींच लक्षांत आली नाहीं. असो, झालें तें झालें. परंतु आतां तरी, हे मंगळा, तूं ह्या हिंदुस्थान देशाशीं कृतघ्नपणाचें अमंगळ वर्तन करूं नको. तूं आपल्या भ्रमणाच्या नियमाप्रमाणें कोठेंहि फिरत असलास, तरी तुझी कृपादृष्टि या हिंदुस्थान देशावर सदोदित राहूं दे. हिंदुस्थानांत यापुढें जीं नवीन मुलें निपजतील, त्यांच्या जन्मकाळीं तूं फार सावधगिरी ठेव. हिंदुस्थानचे भावी नागरिक जन्मास येत असतांना तूं नेहमीं त्यांच्या शुभस्थानीं ऐस.

ह्या हिंदुस्थानच्या भावी योद्धयांच्या जन्मकालीं तूं आमच्या मंडळींतील कुंडलीमध्यें अशीं स्थानें हस्तगत करून ठेव कीं, त्यांच्या योगानें ते तेजस्वी, स्वदेशाभिमानी, पराक्रमी, परसहिष्णु, स्वतंत्रवर्ती आणि वैभवशाली असे निपजतील. आमच्याकरितां तूं आपलें दशमस्थान दुसऱ्या कोणालाहि घेऊं देऊं नकोस. हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, ज्योतिःशास्त्रज्ञांना तुझें माहात्म्य कळलें आहे, त्यांच्यापेक्षां तें किती तरी जास्त असेल ! तेव्हां अशा आमच्या मानवी अज्ञानाच्या स्थितीमध्यें तूं अमक्याच स्थानांत ये आणि अमक्यांत येऊं नको, असें नियमन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून तुला अशी विनंति आहे कीं, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, रशिया, जपान, अमेरिका हीं राष्ट्रें अभ्युदयाला आलीं तेव्हां तूं ज्या स्थानांत होतास, त्याच स्थानांत तूं हिंदुस्थानाकरितां ये. सर्व लोक तुझा गौरव करतात, तसा आम्हीहि करूं. रोमन लोक फार पराक्रमी होते, आणि त्यांनीं तुला आदिदैवत मानलें होतें. त्यांचा पहिला राजा जो रोम्युलस त्याचें जनकत्व त्यांनीं तुजकडे दिलें होतें. आणि त्यांच्या स्वतंत्रतेचें घर असें जें रोम शहर, त्या शहराची त्यांनीं तुला संरक्षक देवता केलें होतें. तसा तूं आमच्या देशाचा संरक्षक हो रोमन लोकांकडून तूं जसे पराक्रम घडवून आणलेस, तसे तूं आमच्या लोकांकडून घडवून आणीव. हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, तूं जें मनांत आणशील तें होईल. तुला अशक्य असें कांहींएक नाहीं. म्हणून तुझी आम्ही प्रार्थना करतों कीं, तूं आमच्या देशाकडे कृपादृष्टीनें पाहा; आणि राष्ट्रीय उन्नतीच्या शिडीवर आमच्या लोकांना एकेक पायरी चढवीत लवकर वर ने.'' अशी मी मंगळाची दररोज प्रार्थना करतों, व दुसऱ्या दिवशीं तो क्षितिजावर आला म्हणजे ‘ कालच्या माझ्या म्हणण्याचें काय झालें? ’ असा प्रश्न मी त्याला विचारतों. या रोजच्या ‘ प्रार्थने ’मुळें मंगळ आतां अनुकूल होत चाललेला आहे, व आपण हिंदुस्थानांतील लोक जसजशी पराक्रमाचीं कृत्यें करण्याची उमेद धरूं, त्याप्रमाणें तो आपल्याला अधिकाधिक अनुकूल होत जाईल, याबद्दल कोणालाहि शंका बाळगण्याचें कारण नाहीं. कारण, जसा मंगळाचा आपल्या कृत्यांच्या गतीवर परिणाम होतो, त्याचप्रमाणें आपल्या कृत्यांचाहि मंगळाच्या गतीवर परिणाम होतो.

● ●●

## १३. सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति

( काळ : अग्रलेख, ता. ७-९-१९०६ )

ह्या पर्वत परमेश्वरानें हिंदुस्थानला हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेकरितां दिला आहे.

प्रातःकाळची वेळ होती; आणि उन्हाळा संपून पावसाळ्याचे दिवस सुरू झाले होते. अशा एके प्रसंगीं कोणी एक कल्पनाशक्ति सह्याद्रीच्या उच्च शिखरांमधून परिभ्रमण करीत असतां त्या ठिकाणीं तिला कित्येक सुविचार सुचूं लागले. पर्वतांचे उच्च शिरोभाग हे बहुधा सर्व उच्च वस्तूंचे गर्भाशय असतात. स्वच्छ पाण्याचे झरे पर्वताच्या शिखरावर उगम पावतात, आणि शुद्ध व दोषरहित वारे पर्वतांच्या अग्रभागावरील वृक्ष-वाटिकांमधूनच निर्माण होतात. त्याप्रमाणें निर्मळ, उदात्त, आणि सात्त्विक विचारांचेंहि जननस्थान असल्याच पर्वतांच्या शिरोभागांवर पुष्कळ वेळां आढळून येतें. अशा रीतीनें सह्याद्रीच्या भव्यपणापासून निसर्ग-नियमानुसार कल्पनाशक्तीला कांहीं सुविचार सुचूं लागले असता तें आपल्या अंगच्या प्रतिभेमुळेंच आपल्याला सुचत आहेत असें वाटून त्या विचारांना "कल्पनाशक्तीच्या तावडींत सांपडलेला सह्याद्रि" असें नांव देण्याची त्या कल्पनाशक्तीनें योजना केली. परंतु हें नांव किती अयथार्थ झालें असतें ! मन हें अणुपरिणाम मानलें तर ह्या मनांतील कल्पनाशक्तीच्या वांटणीला अणूचा विभाग शक्य असेल तर कितवा येईल, याची कल्पनाहि करणें अशक्य आहे. ह्या कल्पनाशक्तीच्या तावडींत असंख्य परमाणूंनीं बनलेला सह्याद्रि सांपडला, अशी मनाची समजूत करणें अगदीं गैरशिस्त आहे. आपल्या तावडींत ह्या वेळीं सह्याद्रि सांपडला आहे, असें एक वेळ कल्पनाशक्तीला वाटलें खरें, पण तिची ती समजूत लवकरच नाहींशी झाली. त्याच पर्वताच्या दरींतील झाडांचीं वाळलेलीं पानें ज्याप्रमाणें सोसाट्याचा वारा गरगर फिरवीत होता, त्याप्रमाणें हा पर्वत आपली अवस्था करून सोडीत आहे, अशी तिची खात्री झाली. तेव्हां तिनें "सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति" हेंच नामाभिधान कायम केलें. अशा स्थितींत सांपडलेल्या कल्पनाशक्तीनें

आपल्या निरनिराळ्या सुविचारांना एका ठिकाणीं आणण्याचा प्रयत्न केला होता. परंतु बारीक दोरा तुटून गेल्यामुळें सगळे मणि विस्कळित झाले आहेत. ते ओघळत ओघळत जसे आले तसे ते पुढें पडले आहेत.

ग्रीष्मऋतूचीं चिह्नें पुरीं नाहींशीं झालेलीं नव्हतीं; आणि वर्षाऋतूचीं सर्व लक्षणें पूर्णपणें प्रादुर्भूत झालेलीं नव्हतीं; अशा संधींत सह्याद्रीच्या रांगेंतील एके ठिकाणीं मोठा चमत्कार चाललेला होता. शंकराचीं स्वयंभू स्थानें बहुतेक पूर्वीं जमिनींत झांकलेलीं असतात, व त्यांवरील माती काढून मग तीं लोकांत प्रख्यातीस येतात. परंतु ह्या ठिकाणीं जें स्वयंभू स्थान दिसत होतें तें फारच अद्भुत होतें. आपल्यावरची माती बाजूला फेंकून देऊन हें शंकराचें उग्र स्वरूप आपण होऊनच आपलें वसतिस्थान जें आकाश तिकडे जात आहे कीं काय, असें वाटत होतें. सह्याद्रीचें एक मोठें थोरलें भव्य शिखर मध्येंच उंच आकाशामध्यें गेलेलें होतें, आणि त्या तेथील प्रशान्तगंभीर प्रदेशाच्या जादूनें भरलेल्या मनानें त्याच्याकडे पाहिलें म्हणजे ही प्रत्यक्ष शंकराची मूर्ति कांहीं कारणानिमित्त तपश्चर्या करण्याकरितां इकडे एकीकडे येऊन बसली आहे कीं काय असा भास होई. ही कल्पना दृढ होण्याला दुसरेंहि एक कारण झालें. शंकराच्या जटेमध्यें गंगा वास्तव्य करीत असते, हें सर्वांना विदितच आहे. त्याप्रमाणें या नैसर्गिक महादेवाच्या शिरोभागामधून जें झऱ्याचें स्वच्छ पाणी झुळझुळ वाहत येऊन खालीं पडत होतें त्यावरून तर बिलकुल शंका उरली नाहीं. शिवाय त्या शिखरावरील झुडपांच्या जाळींतून मेलेल्या वाघांचीं कातडीं पडलेलीं होतीं तीं त्या पर्वतशिरोभागानें पांघरलेलीं पाहून शंकराच्या व्याघ्रांबरपरिधानाची आणखीहि एक खूण पटली. तेव्हां ही प्रत्यक्ष शंकराचीच मूर्ति येथें अवतीर्ण झाली आहे अशी खात्री होऊन त्या अरण्यांतील आणि त्याच्यावरील आकाशांतील सर्व वस्तु त्या स्वयंभू स्थाणूची अनेक उपचारांनीं पूजा करण्याकरितां प्रवृत्त झाल्या. शंकराला संततधार आवडते, म्हणून मेघांनीं आकाशांतील पोकळीचें विस्तीर्ण अभिषेकपात्र घेऊन त्यांतून सहस्रधारांनीं त्या अभिषेकप्रिय परमेश्वराच्या मस्तकावर अभिषिंचन करण्याला सुरुवात केली. संततधार सुरू झालेली पाहून पर्जन्यकाळामुळें प्रमुदित झालेले अनेक प्रकारचे आणि निरनिराळ्या शाखांमधील जे

द्विजगण त्यांपैकीं कित्येक आपआपल्या पूर्णासनांवर विराजमान झाले, आणि कित्येक आनंदानें त्या भव्य पर्वतमूर्तीसभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागले. आपल्या सुंदर, मधुर आणि उंच अशा सुरांनीं ते आपल्या भाषेंत शंकराला अत्यंत प्रिय अशा रुद्राच्या आवर्तनांतील चमक आणि नमक गाऊं लागले. गंधवती पृथ्वीच्या पोटांत जो गंध सांठवून ठेवलेला असतो तो पर्जन्यकाळाच्या प्रारंभीं जणूं काय सगळाच बाहेर पडत असतो. त्या वेळीं पहिल्या पावसानें भिजलेल्या मातीचा सुगंध जिकडे तिकडे पसरून पृथ्वी जणूं काय गंधोद्दामच झालेली होती. तसल्या त्या सुगंधयुक्त पृथ्वीचा कांहीं भाग वाहून येऊन त्या पर्वताच्या मस्तकाला लागला होता. परंतु तें त्या गंधप्रिय गंधर्वाधिपतीला सुगंधयुक्त विलेपनच लाविलें आहे कीं काय, इतकी त्याची विलक्षण शोभा दिसूं लागली. सर्व वनलतांनीं आपआपलीं परम सुवासिक आणि अत्यंत नेत्राल्हादक अशीं पुष्पें त्या स्वयंभू प्रभूच्या मस्तकावर समर्पण करण्याकरितां आपले करपल्लव उंच उभारले. आस-पासच्या दऱ्यांतून धुक्याचे लोट हळूहळू हवेच्या मऊ अंथरुणावरून लोळत लोळत वर येत होते, ते या भव्य मूर्तीच्या समोर आल्याबरोबर मंत्र म्हणून त्या दऱ्यांनीं "धूपोऽयं प्रतिगृह्यताम्" अशी त्या मूर्तीची अत्यंत नम्रपणानें प्रार्थना केली. आकाशांतून जमिनीवर आणि फिरून जमिनीवरून आकाशांत अशी वर, खालीं, इकडे, तिकडे, चहूंकडे, सारखी चमकणारी प्रत्यक्ष वीज या मूर्तीच्या भोंवतीं पंचारती ओवाळूं लागली. तसेंच या पूजेनिमित्त सूर्याचा नंदादीप पाजळण्यांत आला; परंतु त्या वेळीं वारा अतिशय सुटला असल्यामुळें कदाचित् तो जाईल म्हणून एका पातळ ढगाच्या पडद्याच्या आड त्याला पूर्वेच्या आंगच्या एका कोपऱ्यांत बाजूला ठेवून दिलें होतें. आकाशमंडपामध्यें मेघगर्जनेचे चौघडे झडूं लागले, हवेमध्यें पक्ष्यांच्या किलकिलाटाच्या सुस्वर सनया वाजूं लागल्या, आणि जिकडे तिकडे सुप्रसन्नता दिसूं लागली. अशा रीतीनें त्या सृष्टींतील अनेक वस्तूंनीं त्या मूर्तिमंत सृष्टिदेवतेची चालविलेली महापूजा पाहून कल्पनाशक्ति एकाग्र भक्तिभावानें ओतप्रोत भरून गेली, आणि अत्यंत दीन होऊन तिनें अतिशय विशाल अशा या विश्वरूपापुढें साष्टांग प्रणिपात घातला, आणि ब्रह्मापासून तों स्तंब्रापर्यंत जें चैतन्य सर्वत्र पसरून राहिलें आहे

त्यामध्यें ती एक क्षणभरपर्यंत तल्लीन आणि तन्मय होऊन गेली. त्या वेळीं कल्पनाशक्ति जेथें होती तो स्वर्गलोक ! आणि त्या क्षणांत तिनें जें कांहीं पाहिलें तोच परमेश्वर !

अशा उदात्त आणि रम्य प्रदेशामध्यें जो कोणी जाईल तो कवि होऊन माघारा येईल. अशां ठिकाणें हीं कवितेच्या वास्तव्याचीं ठिकाणें होत. या ठिकाणीं परमेश्वरानें आपल्या हातानें मोठमोठ्या अक्षरांनीं सुंदर काव्यें लिहून ठेविलेलीं आहेत. तेथें जावें आणि तीं वाचावीं. आंधळ्या मनुष्याला या जगांत जर कांहीं खरें दुःख असेल तर तें हेंच कीं, त्याला या अपौरुषेय वेदांतील ऋचा आपल्या डोळ्यांनीं वाचतां येत नाहींत. अशा ठिकाणाहून जे लोक नेहमींच राहतात ते धन्य होत. आपण एखाद्या वेळीं तेथें गेलों तर आपल्याला इतका आनंद होतो, मग जे लोक नेहमीं त्या अप्रतिम देखाव्यांचा उपभोग घेत असतात त्यांचें भाग्य काय वर्णावें ! ते सृष्टिदेवतेचे खरे खरे उपाध्ये होत. ते सृष्टिदेवतेची प्रातःकाळची अपूर्व टवटवी पाहतात, ते सायंकाळचा शान्तपणा आपल्या शान्त अंतः-करणामध्यें सांठवून घेतात, आणि मध्याह्न रात्रीं कदाचित् आपल्या चुकलेल्या गाईला किंवा वांसराला शोधण्याकरितां जातां जातां मध्येंच लागलेल्या एखाद्या उंच कड्यावर क्षणभर उभें राहून आपल्यासभोंवतीं सृष्टिदेवता गाढ आणि स्वस्थ झोंपेचा अनुभव घेत असलेली पाहतात ! असे जे लोक तेच सृष्टिदेवतेचे खरे उपासक. स्वच्छ झऱ्यांतील अमृत हें ज्याना पाणी, निसर्गपरिपक्व फळें हें ज्यांचें अन्न, मेघ ही ज्यांची छत्री, वारा हा ज्यांचा पंखा, गाई आणि वांसरें हे ज्यांचे आप्तवर्ग, झाडांचीं तरुतलें हीं ज्यांचीं वसतिगृहें, तृणभूमिका ही ज्यांची सुखशय्या, आणि चंद्र व नक्षत्रें हे ज्यांचे दिवे, त्यांना स्वर्गामध्यें देव याहून सुख काय देऊं शकणार आहे ? अशा भव्य आणि अद्भुत देखाव्याच्या मध्यभागीं बसून तेथील रहिवासी लोक जेव्हां आपलें गोड गोड भोजन सेवीत असतात, तेव्हां त्यांना पुष्कळ वेळ भ्रम पडतो, मध्येंच तें खाण्याचें विसरून जातात, आणि आसमंताद्-भागीं पसरलेल्या दिव्य सृष्टीची अनुपमेय शोभा पाहण्यामध्यें ते तल्लीन होऊन जातात, व आपल्यापुढें गोड पदार्थ आहेत ते खावे, किंवा ही गोड सृष्टि घटाघटा पिऊन टाकावी, असें त्यांना होऊन जातें. अशा

ठिकाणीं कोणी एखादे उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ वाचीत बसतील, त्यांना हें आपल्या हातांतील पुस्तक वाचूं किंवा हें परमेश्वराचें पुस्तक वाचूं, अशा गोंधळांत क्षणभर पडल्यासारखें वाटून सर्व पुस्तकें वाचण्याचें जें श्रेय तें त्यांना येथें प्राप्त होत असलें पाहिजे. कवीच्या काव्यांतील कठिण स्थळें या ठिकाणीं बसून विचार केल्यास सहज उकलतात, आणि तत्त्वज्ञानाच्या पुस्तकांतील गूढ तत्त्वें ह्या ठिकाणीं सुलभ होऊन जातात.

देव पहिल्या दिवसापासून हें जग निर्माण करीत करीत हिंदुस्थानच्या किनाऱ्यापर्यंत येऊन ठेपला, व तेथें त्यानें बहुतेक हिंदुस्थान स्थापलें. नंतर देवानें हातांत एक मातीचा गोळा घेतला, आणि तो एकीकडे एका हातानें झेलीत झेलीत विचार करूं लागला, व त्याची मुद्रा सचिंत झाली. सर्व लोक म्हणूं लागले कीं, देवाला इतकी काळजी कसली पडली आहे! परंतु हा मातीचा गोळा कोठें ठेवावा अशा विवंचनेमध्यें देव होता. देवानें मनांत असा विचार केला कीं, हिंदुस्थानच्या उत्तरेस हिमालय पर्वत आहे, तेव्हां तिकडून हिंदुस्थानला भीति नाहीं. आणि दक्षिणेच्या बाजूचें टोंक चिंचोळें आणि निमुळतें करून हिंदुस्थानला आपण दक्षिणची बाजूच ठेविली नाहीं. तेव्हां आतां हा आपल्या हातांतील गोळा टाकावा कोणत्या बाजूला? पूर्वेच्या बाजूला टाकावा तर परराज्यलोलुप असे लोक त्या दिशेला कोणीहि नाहींत! तेव्हां हा गोळा तिकडे व्यर्थ खर्चीं घालण्यांत हंशील नाहीं. असा सगळा विचार करून परमेश्वरानें आपल्या हातांतील मातीच्या गोळ्याचा हिंदुस्थानच्या सबंध पश्चिम किनाऱ्यावर बांध घातला. आणि त्यालाच पुढें तीन साडेतीन हात उंचीचे लोक सह्याद्रि पर्वत असें म्हणूं लागले! हा पर्वत परमेश्वरानें हिंदुस्थानला हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेकरितां दिला आहे. हा स्वतंत्रतेचा पर्वत आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या किल्ल्याला पश्चिमच्या बाजूनें सह्याद्रीसारखी तटबंदी, आणि त्याच्यापुढें समुद्रासारखा पाण्यानें भरलेला खंदक असतांना हिंदुस्थानाला कालत्रयींहि भीति नसावी अशी परमेश्वरानें सृष्टिरचनेच्या वेळीं उघड उघड योजना करून ठेविलेली होती. या सह्याद्रीच्या डोक्यावरून आपण चोंहींकडे दृष्टि फेंकीत जर त्याच्या रांगांवरून फिरत गेलों तर ठिकठिकाणचे वर चढण्याला अशक्य असे तुटलेले कडे, दबा धरून बसण्याला सोयीच्या अशा

दऱ्या, लाखों लोकांच्या सैन्याला दडून बसतां येण्यासारखीं दाट अरण्यें, एक रांग हस्तगत झाली असतां तिच्या मागें तयार करून ठेविलेल्या जास्त उंच तटबंदीच्या भिंतीवर जाऊन मारा करण्याकरितां सोयीच्या केलेल्या जागा, या गोष्टी जेव्हां आपल्या दृष्टीस पडतात, तेव्हां परमेश्वराच्या कृपेची बरोबर कल्पना आपल्या मनामध्यें येते. परमेश्वरानें हा पर्वत अगदीं बरोबर जेथून भय होतें तेथेंच नेमका ठेवला होता. पण पर्वत काय करणार? जेथें माणसें फितूर होतात, तेथें जे बिचारे बोलून चालून दगड – त्यांनीं काय करावें? आपल्या गुलामगिरीला आंत घेण्याकरितां कालिकतचे दरवाजे प्रथम माणसांनीं उघडले. एवढा उंच सह्याद्रि पर्वत रचण्याची देव खटपट करीत बसला त्याच्यापेक्षां त्यानें असलीं माणसें हिंदुस्थानांत निर्माण केलीं नसतीं तर त्याच्या हेतूचें जास्त चीज झालें असतें. पण प्रत्येक देशांतील लोक आपापल्या देशाबद्दल अभिमानी असतीलच, अशा समजुतीवर देव गेला! पण तसें नाहीं! हिंदुस्थानांत स्वदेशद्रोही लोक आहेत; आणि त्यामुळें सह्याद्रीसारख्या भिंतीचीहि उंची ठेंगणी झाली आहे, आणि मजबुती कमकुवत होऊन गेली आहे. तरी पण परमेश्वराचे हेतू सर्वथैव विपरीत कधींहि होऊं शकणार नाहींत. जो स्वतंत्रतेचा पर्वत म्हणून परमेश्वरानें निर्माण केला, त्यानें हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत नुकतीच एकदां स्वतंत्रतेची कामगिरी बजाविलेली आहे. [illegible] मावळे हे याच पर्वताच्या पोटापासून बाहेर पडले, आणि यांच्याच वंशजांनीं स्वतंत्रतेचे झेंडे चंदीचंदावरपासून अटकेच्या अटकेपर्यंत नाचविले. ज्याच्या पोटांत असली प्रजोत्पत्ति करण्याचें सामर्थ्य आहे त्याच्या पोटांतून फिरूनहि कदाचित् तसलीच प्रजा निर्माण होणार नाहीं म्हणून कशावरून? परमेश्वराची लीला अगाध आहे!

या स्वतंत्रतेच्या पर्वताला आपल्यासभोंवतालची स्थिति पाहून खात्रीनें अतिशय वाईट वाटत असलें पाहिजे. प्रतापगड, रायगड, तोरणा, राजगड, सिंहगड वगैरे ठिकाणचें पूर्वकालीन राजांचें वैभव आणि स्वतंत्रतेचें सामर्थ्य नाशाप्रत गेलेलें पाहून यांचीं उंच उंच शिखरें अतिशय खिन्न होतात, आणि झऱ्यांच्या विशुद्ध पाण्याच्या रूपानें त्यांच्या डोळ्यांतील अश्रु टपटप खालीं गळत असलेले प्रवासी लोकांच्या नेहमीं नजरेस पडतात! मी

स्वतंत्रतेचा पर्वत; परंतु हल्लीं मी परतंत्रतेंत आहे, असें पाहून वणव्याच्या रूपानें या पर्वताचें हृदय जळत असतें. आणि स्वतंत्रतेच्या दरवाजावरील आपल्या रखवालदारीचा कांहीं उपयोग झाला नाहीं ही गोष्ट मनांत आणून तो पर्वत सोसाट्यानें वाहणाऱ्या वाऱ्याच्या मिषानें रात्रंदिवस दुःखाचे दीर्घ श्वास टाकीत असतो. तो आपल्यावरील दगडांना आणि कंटकांना म्हणतो कीं, “ हे दगडांनो, दुष्ट लोक दुसरीकडे, आणि तुम्ही येथें पडून काय करतां ? हे कंटकांनो, कांट्यानें कांटा काढावा म्हणून ज्या तुमची उत्पत्ति, ते तुम्ही येथें निरुद्योगी काय बसलां ? ” अशा अनेक रीतींनीं हा स्वतंत्रतेचा पर्वत गेलेल्या स्वतंत्रतेबद्दल विलाप करीत असतो !

परंतु त्याला विलाप करण्याचें कांहींच कारण नाहीं. तो स्वतंत्र आहे, आणि तो आपल्या छायेखालील लोकांनाहि स्वतंत्रतेचे धडे शिकविल्यावांचून कधींहि राहावयाचा नाहीं. जेथील पक्षी स्वतंत्रतेचीं राष्ट्रगीतें गात असतात, आणि जेथील झऱ्यांतून स्वतंत्रतेच्या विचारांचे परमाणु वाहत येत असतात, त्याच्या [illegible] लोकांच्या अंतःकरणामध्यें तत्समान धर्म उत्पन्न न होणें अशक्य आहे. आणि शिवाय, जेथें मनुष्याचें मन परमेश्वरापाशीं सारूप्य पावून अद्वितीय स्वतंत्रतेचा अनुभव घेतें, तेथें ही ऐहिक स्वतंत्रता प्राप्त होण्याबद्दल अशक्यता [illegible] काय आहे ? जेथें आकाशांतील देवदूत खालीं उतरतात, आणि जेथून पृथ्वीवरील निवृत्तिपर मनुष्यें आकाशाच्या पायऱ्या चढूं लागतात, जेथें पृथ्वीवरहि गंधर्वांचें सुस्वर गायन ऐकूं येतें, आणि जेथील साध्याभोळ्या शेतकऱ्यांचीं प्रेमळ आणि भाविक गाणीं आकाशांतील रहिवाश्यांना ऐकूं येतात, व जेथें आकाशांतील नक्षत्रें जवळपणामुळें मोठीं दिसतात, आणि जेथील गरीब लोकांच्या घरांतील दिव्यामुळें पृथ्वीवरहि नक्षत्रें आहेत कीं काय असा नभोमंडळांतील ज्योतिष्यांना भास होतो – इतकीं जीं उंच शिखरें, तेथें मन रमल्यानंतर साहजिकपणें त्याला या खालच्या नीच, अधम, अमंगळ, मत्सरानें भरलेल्या, कलहानें पेटलेल्या, दुःखानें व्यापलेल्या, आणि जुलुमानें गांजलेल्या जगाचा वीट येऊन तें निर्मळ, निष्कलंक आणि निरंजन अशा परमेश्वराच्या चरणीं लीन झाल्यावांचून कधींहि राहावयाचें नाहीं !

● ● ●

# १४. अर्जुनाचा वेडेपणा

( काळ : अग्रलेख, ता. १३-४-१९०६ )

परमेश्वर स्वमूलोच्छेदनाच्या सत्कृत्याला हातभार लावो !

कौरव-पांडवांचा इतिहास सर्वांना माहीतच आहे. पांडवांचें राज्य कौरवांनीं घेतलें होतें तें परत मिळविण्याचे सर्व सामोपचाराचे उपाय व्यर्थ झाले, आणि अखेरीस लढाईवर पाळी आली. दोन्ही बाजूंचीं सैन्यें कुरुक्षेत्राच्या मैदानावर येऊन उभीं राहिलीं. भीष्माचार्योनीं सिंहनाद केला. इकडे भीमानें आपला पौंड्रनामक महाशंख वाजविला. त्याच्या मागोमाग सर्व योद्धयांनीं आपले भयंकर शंख वाजविले. नगारे आणि नौबदी यांच्या कर्णभैरव गर्जना होऊं लागल्या. जिकडे तिकडे तुमुल रणवाद्यांची एकच गर्दी उसळून गेली. भयंकर प्रतिध्वनि उठूं लागले. त्या भयंकर निनादामुळें समुद्राचें पाणी वर उसळलें, मेरु डळमळूं लागला, आणि झाडांवरील फुलांप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें खालीं गळून पडलीं. इतक्या रंगाला रणसंग्रामाची तयारी येऊन पोहोंचली, तेव्हां अर्जुनाच्या आज्ञेप्रमाणें अर्जुनाच्या रथाचे घोडे श्रीकृष्णांनीं कौरवांच्या सेनेकडे वळविले. अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं येऊन उभा राहिला. अर्जुनानें आपली दृष्टि कौरव-सैन्याकडे फेंकली, आणि त्या क्षणापासून अर्जुनाच्या वेडेपणाला सुरुवात झाली.

कोणताहि पाश्चिमात्य अर्जुन अशा स्थितींत उभा राहिला तर तो अर्जुना-सारखें धर्मशास्त्र कधींहि बरळत सुटणार नाहीं. अर्जुन एवढा शूर आणि मुत्सद्दी म्हणून म्हणतात, पण त्याचें शौर्य आणि राजकारस्थान हल्लींच्या कसोटीच्या दगडांना लावून पाहिलें तर तें अगदीं फिक्कें पडतें. ज्याच्या अंगांत शौर्य आहे त्यानें धर्माची चिकित्सा करीत बसायचें ? ही केवढी चूक ! ज्यांच्या अंगांत दुसऱ्यांना ठोकून त्यांच्यापासून त्यांचें घरदार, धनधान्य, वतन व राज्य लुटून घेण्याचें सामर्थ्य देवानें ठेविलें आहे, ते जर धर्म-शास्त्राचा कीस काढीत बसले तर मग बायकापोरांनीं आणि भटाभिक्षुकांनीं काय करावें ? धर्म हा मूळ देवानें अशक्त बायकामुलें आणि अज्ञानी भट-

भिक्षुक यांचा वेळ जाण्याकरितां केलेला आहे. तें त्यांचें खेळणें, तो त्यांचा करमणुकीचा जिन्नस, बलाढ्य लोकांनीं आपल्या हातांत हिसकावून घेतला तर दुसऱ्याचे खून कोण करील? दुसऱ्यांना लुटील कोण? आणि दुसऱ्यांचीं राज्यें हरण करील कोण? जे फक्त दुसऱ्यांना आपल्या जुलुमाखालीं तुडविण्याकरितां देवानें निर्माण केलेले आहेत ते जर आपलें काम सोडून दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ करूं लागतील, तर मग या जगांतील वर्णव्यवस्था बिघडून जाऊन एकंदर अव्यवस्था होईल; धर्म कोणीं पाळावा, आणि कत्तली कोणीं कराव्या, याच्याबद्दलच्या श्रमविभागाच्या सर्व योजना अनवस्थेप्रत जाऊन पोहोंचतील; आणि येथून तेथून सर्व एकच संकर माजून राहील. परंतु हें अर्जुनाच्या मुळींच लक्षांत आलें नाहीं. पण सुदैवाची गोष्ट ही आहे कीं, अर्जुनाप्रमाणें त्याच्या पाठीमागून येणारे सर्वच योद्धे अशी चूक करण्याला प्रवृत्त झाले नाहींत. अशी चूक होण्याची चुकूनसुद्धां भीति उरूं नये यासाठीं धर्मतत्त्वें आणि राज्यहरणतत्त्वें यांच्यामध्यें अलीकडे मोठी थोरली अतिशय उंच अशी भिंत बांधून टाकण्यांत आलेली आहे. त्यामुळें आपल्या कृत्यांचा आणि धर्मांचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध आहे असें आतां कोणाच्या स्वप्नांतहि येत नाहीं. हल्लींच्या युगांतील प्रत्येक लबाड मनुष्याकडून धर्म हा शब्द बरोबर शंभर वेळां घोकून घेण्यांत येतो, व प्रत्येक लबाडीचें काम करीत असतांना मी हें धर्मासाठीं, न्यायासाठीं, सुधारणेसाठीं, लोककल्याणासाठीं, आणि खुद्द परमेश्वरासाठीं करीत आहें, असें त्यानें म्हटलेंच पाहिजे, असे सक्त हुकूम सोडण्यांत आलेले आहेत. त्यामुळें धर्माच्या आणि लबाडीच्या दरम्यान घातलेल्या उंच भिंतीकडे कोणाचेंहि लक्ष न जातां सर्व जगाची राहटी पूर्वींप्रमाणें हल्लींहि धर्माच्याच पायावर चालली आहे, असा सर्वांचा समज कायम राहून, बलाढ्य लबाडांना गरीब माणसांना लुबाडण्याची फारच निर्वेध संधि सांपडूं लागली आहे. हा अर्वाचीन सुधारणेच्या कल्पकतेपासून जगाचा किती मोठा फायदा झाला आहे इकडे अद्यापि कोणाचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

"न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च। किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥" हे जे नेभळटपणाचे उद्गार अर्जुनाच्या तोंडून निघाले आहेत, तसे हल्लींच्या कोणत्याहि योद्ध्याच्या तोंडून निघावयाचे

नाहींत. "आम्हांला राज्य घेऊन काय करावयाचें आहे? ( किं नो राज्येन )" अशा शब्दांनीं आपली जीभ विटाळून टाकण्याइतका एक तरी मूर्ख योद्धा आज पृथ्वीच्या पाठीवर आढळेल काय? राज्य घेऊन करावयाचें काय म्हणजे! राज्य घेऊन तेथील लोकांना लुटावयाचें! तेथील संपत्ति आपल्या घरीं न्यावयाची! आणि तेथील लोकांना उपासमारीच्या विस्तवावर भाजून यमाच्या घरीं पाठवावयाचें! राज्य घेऊन त्याचा उपयोग काय करावयाचा हें माहीत नसल्यामुळेंच अर्जुनाच्या तोंडून असे उद्गार निघाले. नारळाच्या आंतील खोबरें पोखरून पोखरून खावयाचें आणि ज्याचा नारळ असेल त्याच्या हातांत प्रामाणिकपणानें त्याच्या करवंट्या द्यावयाच्या, हा नारळाचा उपयोग ज्या मनुष्याला ठाऊक नाहीं तो स्वाभाविकपणेंच असें म्हणणार कीं, देवा, हा नारळ घेऊन मी काय करूं? तशी बहुतकरून अर्जुनाच्या मनाची स्थिति झालेली असावी.

वेडाच्या भरामध्यें अर्जुन जीं धर्माचीं कित्येक तत्त्वें बरळला आहे, तीं फार विलक्षण आहेत. कोणताहि समंजस मनुष्य इतका धर्मवेडा होणार नाहीं. आणि ज्याला राज्य मिळवावयाचें आहे तो लबाड मनुष्य तर धर्माची इतकी पर्वा कधींच ठेवणार नाहीं. लबाड मनुष्यास जुनें धर्मशास्त्र जर सोईचें वाटत नसलें, तर तो आपल्याकरितां नवें धर्मशास्त्र बनवील. कारण पहिलें धर्मशास्त्रसुद्धां कोणीं तरी असेंच कांहीं तरी हेतु मनांत धरून बनविलेलें असलें पाहिजे कीं नाहीं? मग लबाड बलाढ्यांच्या मनांतून जर दुसऱ्यांना मारून त्यांची संपत्ति लुबाडावयाची असेल, तर त्याकरितां त्यांनीं आपलें धर्मशास्त्र कां बनवूं नये? "एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन। अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते॥" हें अर्जुनाच्या वेळचें नेभळट-पणाचें धर्मशास्त्र कांहींएक कामाचें नाहीं. भगवंतांनीं अर्जुनाच्या असल्या विचारसरणीला क्लैब्य हें अगदीं यथार्थ नांव दिलें आहे. जर कोणी कोणाला मारावयाचें नाहीं, व दुसऱ्यापासून कोणी कांहीं लुबाडून घ्यावयाचेंच नाहीं असें ठरलें, तर मग या जगांत लोक श्रीमंत होणार कसे, आणि श्रीमंताचे राजे होणार कसे? कोणी राजे झाले नाहींत, तर मग अनाथ प्रजेपासून कर कोण घेईल? त्यांना पावलोपावलीं फायद्यावांचूनहि प्रतिबंध कोण करील? आणि त्यांना अपराधावांचूनहि तुरुंगांत कोण घालील? सर्व

पृथ्वीवर हाहाःकार उडून जाईल! दुसऱ्याला मारण्याची आणि त्याला लुबाडण्याची जर बंदी झाली, तर राजा होण्याचीच बंदी झाली, असें म्हणावयाचें! मग राज्याभिषेकाचे मंत्र, राजधर्म, राजांनीं करावयाचीं यज्ञादिक कर्मे, या गोष्टी धर्मशास्त्रानें सांगितल्या असत्या कशाला? पण त्या तर सांगितल्या आहेत. तेव्हां यावरून लोकांस मारणें, लुटणें वगैरे जे राज्य मिळविण्याचे राजमान्य उपाय आहेत ते धर्मशास्त्राला पसंत आहेत, असें सिद्ध होत नाहीं काय? अशीं अनुमानें हल्लींचे धर्मशास्त्रकार काढतात. परंतु यावरून हल्लींच्या धर्मशास्त्रांना अनवस्था दोष माहीत नाहीं असें मात्र कोणाला म्हणतां यावयाचें नाहीं. अर्वाचीन उपयुक्त धर्मशास्त्रांत खून हा गुन्हाच नाहीं असें नाहीं. पण तो केव्हां होतो याबद्दल मात्र फार सूक्ष्म विचार केला पाहिजे. फक्त एकच मनुष्य मारला तर तो खून होतो! राजरोसपणा न पत्करतां किंवा जाहीरनामे छापून ती गोष्ट प्रसिद्ध न करतां एखाद्याला चोरून मारलें तर तो खून होतो. अतिशय सुधारलेल्या साधनांचा आणि हत्यारांचा उपयोग न करतां कोयती, पहार, कुऱ्हाड, सोटे, दगड वगैरे रानटी उपायांनीं जर एखाद्याचा प्राण घेतला गेला तर तो खून होतो! खून ओळखण्याचे असे हे बारीकसारीक भेद आहेत. थोड्या पैशासाठीं किंवा एखाद्या लहानशा इस्टेटीसाठीं एखाद्याला मारलें तर तोहि खून होतो! हीं ठिकाणें वर्ज्य करून बाकीच्या ठिकाणीं अलीकडच्या उपयुक्त धर्मशास्त्रानें खुनाची पूर्ण संमति दिली असल्याचें हल्लींच्या प्रतिष्ठित लोकांच्या कृतीवरून दिसत आहे. 'त्रैलोक्याचें राज्य मिळविण्यासाठींदेखील मीं कोणाचा वध करावयाचा नाहीं, मग यःकश्चित् पृथ्वीसाठीं मी मनुष्यवध करूं?' असें बोलून अर्जुनानें या अतिशय सन्माननीय अशा पृथ्वीचा अपमान केला आहे. ही बहुमान्य पृथ्वी इतकी तुच्छ आहे काय? आणि हिच्यापेक्षां त्या कवडीमोल आणि केवळ राजांच्या खेळण्यासाठीं निर्माण केलेल्या भिकारड्या माणसांची किंमत अधिक आहे काय? यःकश्चित् पृथ्वीसाठीं मी मनुष्यवध करूं? असें अर्जुन विचारतो. अरे, या पृथ्वीच्या एक वीतभर तुकड्यासाठींदेखील लाखों माणसांचे खून झाले तरी ते केले पाहिजेत; मग सबंध पृथ्वीची गोष्ट कशाला विचारतोस? हल्लींचे जे लोक आपापलीं साम्राज्यें वाढवूं इच्छीत आहेत, त्यांना जर

कोणी त्रैलोक्याचें राज्य देऊं लागेल, तर त्रैलोक्यांत स्वतःखेरीज जितकीं माणसें आहेत तितक्यांचेहि पाहिजे असल्यास ते खून करण्याला तयार होतील. मग अर्जुनालाच कांहीं पांचपन्नास लाख माणसांचे खून करण्याला एवढी दहशत काय म्हणून वाटत होती ? " भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्" या वचनावरून रुधिरप्रदिग्ध भोग आपण कसे भोगावे, अशी अर्जुनाला शंका वाटत असावी असें मात्र एक दिसतें.

पण हा केवढा खुळचटपणा आहे ! रक्ताचे डाग कायम राहतात काय ? रक्ताचे डाग पाण्यानें, फार झालें तर साबण लावून धुतले म्हणजे जातात, एवढी साधी रसायनशास्त्रांतील गोष्ट अर्जुनाला माहीत नसावी हें अतिशय लज्जास्पद आहे. खून केलेल्या मनुष्याचें रक्त सांडणार कुरुक्षेत्रांतील जमिनी-वर, आणि अर्जुन नाना प्रकारच्या चैनीच्या भोगांचा उपभोग घेणार हस्तिना-पुरांतील सिंहासनावर ! आणि कुरुक्षेत्रांतून हस्तिनापुराला चालत येण्याला माणसासारखे माणसाच्या रक्ताला कांहीं पाय नाहींत ! मग अर्जुनाचे भोग रुधिरप्रदिग्ध कसे झाले असते ? रक्तामध्यें अशी चालण्याची शक्ति असती तर राजांना लबाडीनें मिळविलेल्या आपल्या स्वतःच्या राज्यांचा कधीं उपभोगच घेतां आला नसता. पण असें कोठें झालें आहे ? शेंकडों लबाड राजांनीं कोट्यवधि अनाथ लोकांचे आतांपर्यंत खून केले आहेत. पण म्हणून त्यांचे भोग कधीं रुधिरप्रदिग्ध झाले आहेत ? त्यांनीं मेजवानीकरितां एखादें पांढरेंशुभ्र पक्वान्न तयार केलें, तर त्यांनीं मारलेल्या माणसांच्या रक्तानें तें सगळें लालभडक होऊन गेलें, असें कधीं झालें आहे काय ? किंवा परस्त्रियांचा जेथें बलात्कारानें संभोग करावयाचा, अशा त्यांच्या शय्येवर जर पांढरें-शुभ्र वस्त्र पसरलेलें असलें तर तें वस्त्र त्यांनीं मारलेल्या लोकांच्या रक्तानें भिजून ओलें होऊन गेलें, असें तरी कधीं झालें आहे काय ? हॅम्लेट आणि मॅक्बेथ या नाटकांच्या संविधानकांतील मूळच्या गोष्टी जेव्हां घडून आल्या, त्या वेळीं राज्यलोभानें मारलीं गेलेलीं माणसें भुतें होऊन आपले खून करणाऱ्यांना भेवडाविण्याकरितां येत असत. पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून, कंटाळून मारल्या गेलेल्या लोकांनीं तीहि पद्धत टाकून

दिलेली आहे. म्हणून आतां तीहि भीति नको. सारांश, हा सगळा मनाचा वेडेपणा आहे. वास्तविक मारलेल्या माणसांचें रक्त चालत नाहीं, किंवा उपभोगाचे विषय त्यांच्या रक्ताच्या डागांनीं बिघडून जाऊं शकत नाहींत, किंवा मारलेलीं माणसें भुतें होऊन फिरून या जगांत येत नाहींत. असें जर असतें तर अर्जुनाच्या पाठीमागून येणाऱ्या लबाड बलाढ्यांना या जगांत जिवंत राहण्याचीहि सोय नव्हती. कारण, अर्जुनानें पाहिलीं नसतील इतकीं माणसें या राजांनीं नुसतीं मारलीं आहेत. तेव्हां जर या मारलेल्या माणसांच्या रक्तांत आपला सूड उगविण्याचें सामर्थ्य असतें, तर या राजांच्या राज्यावर बारा महिने एकसारखा रक्ताचा पाऊस पडून राहिला असता. पांढरा रंग त्यांच्या राज्यांत पाहावयालाहि मिळाला नसता, चित्रकला त्यांच्या राज्यांत लोप पावली असती, आणि त्यांच्या राज्यांतील कोरड्या अन्नाला लागणाऱ्या कालवणाची गरजच उरली नसती ! तसेंच त्यांनीं मारलेल्या असख्य लोकांनीं जर भुतें होऊन त्यांच्या मानेवर बसण्याचें मनांत आणलें असतें, तर एकेकाच्या मानेभोंवतीं इतकीं भुतें जमलीं असतीं कीं, तीं सूक्ष्म देहानें आलीं असतांहि त्यांना त्यांच्या मानेवर बसण्याला सगळ्यांना जागा न मिळाल्यामुळें त्रासून तीं माघारीं गेलीं असतीं ! असे भोग जर रुधिरप्रदिग्ध होऊं लागले असते, तर अर्जुनाच्या पाठीमागून आलेल्या राजांना या जगांत राहवलें नसतें. पण असें कोठें आहे ? मागचें राहूं द्या; पण अलीकडचीच गोष्ट घेतली तरी असें कोठें दिसून येत आहे ? हल्लीं कांहीं कमी लोक मारले गेले आहेत असें नाहीं. अर्जुनालाच मोठी घमेंड नको. अगदीं अलीकडच्या दिवसांतसुद्धां किती तरी लोक मारले गेलेले आहेत ! नीग्रो, क्यूबन, फिलिपिनो, दरवेशी, हिरोरो, सोमाली, काफीर, बोअर, आफ्रिडी, तिबेटी, ब्रह्मी, चिनी, जपानी, रशियन, ज्यू, आर्मेनिअन वगैरे किती तरी लोक या यादींत येतात ! सुधारणादेवीच्या प्रसाराच्या चरणतळीं बळी म्हणून पशूप्रमाणें कापून काढलेल्या या असंख्य मुंडक्यांची गणना कोण करूं शकणार आहे ? पण इतके लोक ही मर्त्यभूमि सोडून स्वर्गलोकांतील नंदनवनामध्यें राहण्याकरिता गेले म्हणून पाठीमागें त्यांच्या रक्तानें कोणाच्या कपड्यांना डाग पडले आहेत ? जगांतील प्रत्येक मनुष्याचा हात पाहावा तो बर्फासारखा

पांढरा शुभ्र दिसत आहे ! राजांकडे पाहावें तर त्यांचे पोषाख धुवून काढण्याला आपल्याला अतिशय त्रास पडतो अशी कोणत्याहि राजाच्या परटाची तक्रार नाहीं ! सगळ्या राजांना रात्रींच्या स्वस्थ झोंपा लागतात ! लेडी मॅक्बेथप्रमाणें आपण केलेल्या खुनांची आठवण होऊन कोणी राजे किंवा त्यांच्या राण्या आपल्या अंथरुणांतून उठतात आणि दिवसां केलेलीं पापकर्मे रात्रीच्या झोंपेंत बडबडतात, असा कोणत्याहि राजवैद्याकडून बोभाटा बाहेर आलेला नाहीं ! सर्व राजे खुशाल खातात, पितात, घोड्यावर बसतात, गाड्यांतून फिरतात, नाच नाचतात, मेजवान्या रगडतात, आणि फिरून लोकांना नीतीचा आणि न्यायाचा उपदेश करतात ! अशी अव्याहत चैन प्रत्यक्ष चालली असतां अर्जुनाला भोगांच्या रुधिरप्रदिग्धत्वाची एवढी भीति वाटावी हें मोठें आश्चर्य आहे !

" यांना मारलें तर पाप लागेल ( पापमेवाश्रयेदस्मान् )", " राज्यलोभासाठीं आम्ही मोठें पाप करण्याला प्रयुक्त झालों आहों ( अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् )", " या पातकासाठीं आपल्याला नरकांत राहावें लागेल ( नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम । ) " इत्यादि श्लोकांतून उक्त आणि अनुक्त अशीं जीं भयें अर्जुनाला वाटत होतीं तींहि अगदीं निराधार आहेत. जगांत पाप म्हणून कांहीं पदार्थ आहे, आणि तें केलें म्हणजे स्वर्गांत देव म्हणून दुसरा कोणीएक पदार्थ आहे तो आपल्याला शासन करतो, अनेक साधनांनीं आपला नाश करतो, आणि आपल्याला नरकांत टाकतो, या कल्पना अगदीं पोरकटपणाच्या आणि वेडगळपणाच्या आहेत. पाप आणि पुण्य, देव आणि शासन, व स्वर्ग आणि नरक या वस्तू जर कौरव-पांडवांच्या वेळीं खरोखर अस्तित्वात होत्या असें मानलें, तर त्या अलीकडेच एकाएकीं कशा नाहींशा व्हाव्यात? अलीकडेसुद्धां लाखों लोकांचे प्रतिवर्षीं खून चालले आहेत, याबद्दलचीं ठळक ठळक उदाहरणें वर दिलेलींच आहेत. आतां यांत जर पाप असतें, आणि आकाशांत जर देव असता, तर असंख्य माणसांचे प्राण घेणाऱ्या या लोकांना देवानें त्यांच्या पापाबद्दल कांहींच भयंकर शासन केलें नसतें काय? पण तसें कोणाला होत आहे? हल्लींचे खंडोगणती राजे जमिनीवर चालत असतात, पण त्यांच्या पायाखालीं धरणीकंप होत नाहींत ! ते पाण्यावर

नावांतून तरंगत असतात, पण त्या नावा आपल्या प्रचंड पोटांत गट्ट करून टाकण्याविषयीं देव समुद्राला कधींहि चुणकावीत नाहीं! ते पर्वतांच्या शिखरांवर जाऊन राहतात, पण ते पर्वत शासन करणाऱ्या परमेश्वराच्या हुकुमानें कधींहि ज्वालामुखी पर्वत बनत नाहींत! ते माणसांच्या रक्तानें तृप्त न होऊन फुरसतीच्या वेळीं करमणुकीसाठीं पर्वतांच्या जंगलामधील वाघांना मारण्याकरितां जातात; पण मनुष्यवध आणि व्याघ्रवध हीं जर पातकें असतीं, आणि तीं देवाला दुःसह झालीं असतीं, तर तीं पातकें करणारांचें पारिपत्य करण्याला देवाला काय अडचण होती? जो वाघ मरणारा तोच मारणारा करण्याला देवाला कांहीं अवकाश असतो काय? पण नाहीं; असें नाहीं. असा कांहींएक अपघात न होतां फक्त वाघच मरतात, यावरून पातक आणि देव हेच नसले पाहिजेत, असें सिद्ध होतें. हत्तीचें गंडस्थळ आणि हत्तीचें पदतळ यांच्यामध्यें तीन-चार हातांपेक्षां काय जास्त अंतर असतें? लाखों लोकांच्या खुनानें धुंद झालेला आणि रक्तानें लाल झालेला प्राणी मारलेल्या माणसांच्या पाठीच्या तक्त्यांचे जिने करून त्यावरून हत्तीच्या गंडस्थळावर चढून मोठ्या डौलानें बसतो. आतां यांत जर देवाला – आंधळ्या देवाला – कांहीं गुन्हा दिसता, तर हत्तीच्या गंडस्थळापासून हत्तीचा पाय दूर असतो काय? पण तसें होत नाहीं. यावरूनसुद्धां देवाच्या अस्तित्वाला मोठा धक्का बसतो. अशा स्थितींत देव आहे असें म्हणण्याचें धाडस कोण समंजस मनुष्य करू शकेल? नास्तिकांनीं देव नाहीं म्हणून ठरविलें आहे, हा त्यांच्यावर वृथा आक्षेप आहे. नास्तिकांच्या वितंडवादापेक्षां देवानें आपल्या स्वतःच्या कृतींनेंच आपल्यावरील लोकांची श्रद्धा जास्त उडवून घेतली आहे. तसेंच, नरक तरी कोठें आहे? मागील युगांतील मनुष्याचें मन रानटी अवस्थेमध्यें होतें. त्या वेळीं त्यानें स्वर्ग वर असतो आणि नरक खालीं असतो, अशी आपली कल्पना करून घेतली आहे. पण वर कांहीं नाहीं आणि खालींहि कांहीं नाहीं! अर्जुनाच्या वेळीं लोकांना पृथ्वीचा फारच थोडा भाग माहीत होता, व पृथ्वीच्या पोटांत काय आहे याबद्दल तर बिलकुलच कल्पना नव्हती. तेव्हां नरक खालीं आहे, ही कल्पना खून करणाऱ्या राजांना दबकावण्याला बरी होती. पण आतां आपल्याखालीं म्हणजे अमेरिका घेतली, तर अमेरिकेंत

काय आहे हें हल्लींच्या राजांना माहीत झालेलें आहे. तेथें अमेरिकेंतील स्वतंत्र संस्थानें आहेत, हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे, व तेथें नरक नाहीं अशी त्यांची पक्की खात्री झालेली आहे. आतां खालीं म्हणजे या पृथ्वीच्या पोटांत नरक आहे अशी कोणाला शंका असेल, तर भूगर्भशास्त्रवेत्त्यांनीं त्याहि शंकेला जागा ठेविली नाहीं. एकंदर पृथ्वीच्या मध्यभागापर्यंत काय काय भरलेलें आहे ह्या सगळ्याबद्दलची इत्थंभूत माहिती अर्वाचीन राजां-पाशीं आहे. तेव्हां जर देव, पाप, नरक वगैरे वस्तु वास्तविक अस्तित्वांतच नाहीत, तर मग त्यांच्याबद्दल भीति कोण बाळगणार आहे?

सारांश, भोग जर खरोखरच रुधिरप्रदिग्ध होत असते, मारलेल्या माणसां-मध्यें भुतें होऊन सूड उगविण्याचें जर खरोखर सामर्थ्य असतें, पाप आणि देव ह्या जर खरोखरच अस्तित्वांत असणाऱ्या वस्तु असून, पापाबद्दल देव शासन करता; धरणीकंप, खवळलेला समुद्र, ज्वालामुखी पर्वताचा स्फोट, चवताळलेल्या वाघाची उडी, आणि मदोन्मत्त झालेल्या हत्तीचा पाय, हीं जर पातकाच्या पारिपत्याचीं प्रचीतिदायक साधनें असतीं, आणि प्रवाश्यांना अमेरिकेंत व भूगर्भशास्त्रवेत्त्यांना पृथ्वीच्या पोटांत जर कोठें खरोखरच नरक आढळला असता, तर आजकल जे योद्धे जास्त खुनाबद्दल जास्त छातो वर काढून चालत आहेत त्याचीहि दुसऱ्यांचे निष्कारण खून करण्यापूर्वीं अर्जुनाप्रमाणें स्थिति झाली असती, पातकाच्या भीतीमुळें त्यांचींहि गात्रें खिन्न झालीं असतीं, मुख परिम्लान झालें असतें, शरीराला कंप सुटला असता, सर्व अंगावर रोमांच उभे राहिले असते, हातांतून शस्त्रें गळालीं असतीं, मन भ्रमण पावूं लागलें असतें, अपशकुन दिसूं लागले असते, आणि हातांतून आयुधें टाकून डोळ्यांतून पाणी काढीत ते स्तब्ध बसले असते. पण अशी स्थिति कोणाची तरी होत आहे काय? नाहीं. प्रत्येकाला लढाईच्या वेळचे खून करावयाला जाताना आपण अतिशय पवित्र काम करावयाला जात आहों असें वाटतें! देवाची भीति बिलकुल उरलेली नाहीं. मनुष्यें मनुष्याना वाघाप्रमाणें खाऊं लागलीं आहेत, तरीहि देव असून नसून सारखा झाल्याप्रमाणें झाला आहे. गांजलेल्या मनुष्यांनाहि आपलें आपण संरक्षण करून घेण्यावांचून देवाच्या मदतीचा वगैरे दुसरा कांहीं मार्ग उरला नाहीं. या सगळ्या अर्वाचीन स्थितीवरून काय सिद्ध होतें? पाप,

पुण्य, स्वर्ग, नरक, देव, धर्म वगैरे जुन्या गोष्टी नव्या राजांनीं अगदीं थोतांडें ठरवून टाकलीं आहेत. चार्वाकांनीं नास्तिकपणाचा प्रसार केला असें म्हणतात. परंतु असंख्य लोकांचे खून करूनहि सर्व सृष्टिनियमांविरुद्ध प्रतिदिवशीं जास्त जास्त भरभराटीस चढणाऱ्या अलीकडच्या लोकांनीं नास्तिकपणाला जास्त उत्तेजन दिलें आहे. साम्राज्य हा देव, कोणताहि न्याय किंवा अन्याय करून त्या साम्राज्याचा प्रसार करणें हें पुण्य, आणि इतरानी स्वदेशभक्तीनें प्रेरित होऊन अतिशय प्रिय अशा स्वदेशाच्या संरक्षणासाठीं त्या प्रसाराच्या आड येणें हें पाप, अशी आजकालची स्थिति आहे. हीं तत्त्वें लक्षांत बाळगून अर्जुन वागला नाहीं, व भलभलत्याच शंका काढीत बसला, हें अगदीं गैरशिस्त होय. जेथें दुसऱ्यांना मारून बेलाशक त्यांचें राज्य घ्यावयाचें, तेथें ‘न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः’ अशा शंका काढीत अर्जुनानें बसावें, यावरून त्या वेळचे लोक धार्मिक कल्पनांच्या बाबतींत मागसलेले होते असें म्हणावें लागते. अर्जुनाचा हा रानटीपणा पाहून कोणालाहि हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हांपासून जर ही देवाधर्माची कल्पना गुंडाळून ठेवण्यात आली असती, तर आजला मनुष्यप्राण्यांची प्रगति फारच वाढली असती ! पण दुर्दैव जगाचें ! परंतु असो. वेडेपणामुळें जीं तत्त्वें त्या वेळच्या अर्जुनाला समजलीं नाहींत ती हल्लींच्या अर्जुनाला समजून ते त्याप्रमाणें जगाची वाट लावीत आहेत, ही कांहीं थोड्या समाधानाची गोष्ट आहे असें नाहीं. देव असल्यास तो या स्वमूलोच्छेदनाच्या सत्कृत्याला हातभार लावो !

• • •

# १५. शिवाजीची एक रात्र

( काळ : अग्रलेख, ता. १८-१०-१९०७ )

शिवाजी लहान होता. वडिलांचा धाक आणि आईची प्रीति ह्यांच्या मिश्रणामध्यें कधीं विद्या तर कधीं क्रीडा अशा अवस्थेंत त्याचे दिवस जात होते. त्याच सुमारास दुसरीकडे हिंदुस्थानवर परकी लोकांचे अतिशय जुलूम चाललेले होते. देवळें मोडावीं, गाई कापाव्या, ब्राह्मण बाटवावे, लोकांना लुटावें, गांवच्या गांव बेचिराख करावे, गरीबांच्या कत्तली कराव्या, असे अनेक अनर्थावह जुलूम देशावर चालले होते. ते पाहून शिवाजीच्या कोंवळ्या मनावर फार विलक्षण परिणाम होत असत; व या सगळ्या जुलमांपासून आपल्या देशाला आणि आपल्या देशबांधवांना कसें स्वतंत्र करावें याच्याबद्दल तो रात्रंदिवस विचार करीत असे. परंतु हे विचार त्या वेळींसुद्धां उघडपणें बोलण्याची चोरी होती; यामुळें त्याच्या-सारख्या कलाचे जे कोणी चार सोबती त्याला भेटत त्यांच्याशीं तो संध्याकाळच्या संधिप्रकाशांत किंवा मध्यरात्रीच्या निबिड अंधकारांत आपल्या भावी पराक्रमाचे गुप्त कट करीत बसे; व अशा वेळीं स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या मनोराज्यामध्यें पुष्कळ वेळां तो अगदीं गर्क होऊन जात असे.

असल्या स्वदेशाच्या स्वातंत्र्याच्या कल्पनांनीं त्याचें डोकें भणाणून गेलेलें असल्यामुळें आत्मसदृशवृत्तीच जेथें तेथें संचरून राहिली आहे, असा सदोदित त्याला भास होत असे. अशा मनाच्या स्थितींत एके दिवशीं संध्याकाळीं तो एकटाच बसला असतां त्याचें लक्ष आकाशांत हळूहळू एकेक दिसूं लागणाऱ्या ताऱ्यांकडे आणि नक्षत्रांकडे वेधलें. त्यांच्याकडे पाहात तो स्तब्ध राहिला. त्याच्या मनानें पृथ्वीवरील दाट हवेचें वातावरण सोडलें, आणि तो मनाचा अतिशय हलका आणि अतिशय सूक्ष्म परमाणु वायूच्या सरोवराच्या पृष्ठभागावर पोहणाऱ्या एखाद्या पतंगाप्रमाणें वरवर तरंगत जाऊं लागला. जितकें जितकें उंच जावें तितका तितका जास्त विस्तीर्ण देखावा दिसूं लागतो, हा एक निसर्गदेवतेच्या राज्यांतील कायदा आहे; आणि त्यांतून

कल्पनेची दृक्शक्ति तर फारच विलक्षण असते! शिवाजी त्या ताऱ्यांना उद्देशून म्हणाला :

"हे ताऱ्यांनो, तुम्ही आहां तरी कोण? तुम्ही तारेच असाल अशी माझी आजपर्यंत समजूत होती. पण आतां मला तुमच्या नेहमींच्या कृतीवरून कांहीं निराळाच भास होऊं लागला आहे. आतां तुमचें खरें स्वरूप हळूहळू माझ्या लक्षांत येऊं लागलें आहे. मला वाटत आहे तेंच खरें असलें पाहिजे! जुलमाच्या अतिरेकावांचून आणि परिस्फोटाच्या दहशतीवांचून असली वर्तणूक संभवावयाचीच नाहीं! इतक्या उंचावरदेखील जुलमी राजे गेले आहेत ना! शिव शिव! या जुलमी राजांच्या जुलमानें ज्यांना जेरीस आणलें नाहीं असे लोक विरळाच सांपडतील. हें जग खालपासून वरपर्यंत देवानें जुलमी राजांच्या जुलमाकरितांच निर्माण केलें आहे कीं काय कोण जाणे!—तुमच्याबद्दल माझा तर्क अगदीं बरोबर आहे. सूर्य मावळून अंधार पडत चालला म्हणजे तुमच्यांपैकीं एकेकजण या पटांगणामध्यें येऊं लागतो. एक पूर्वेकडून येतो, तर दुसरा पश्चिमेकडून येतो. एक दक्षिणेकडून आला तर दुसरा हळूच उत्तरेकडून डोकावूं लागतो. कोठें कोणी दिसत नसतां एकदम तुम्ही या ठिकाणीं येतां. आपल्याला कोणी ओळखतील म्हणून आपल्या गुप्त मसलतीच्या या गुप्त संकेतस्थानीं येऊन पोहोंचेपर्यंत आपली वाट गुप्त आणि अदृश्य रीतीनें चालण्याची मोठी अजब हातोटी तुम्हांला साधली आहे! कोठें कांहीं दिसत नसतां एकदम तुम्ही या शून्य संकेतस्थानीं कसे जमतां!—एक आला, दोन आले, दहा आले, पंचवीस आले, शंभर आले,—अबब! थोड्याशा वेळांत किती तरी हे गुप्त कटवाले या निर्मानुष मैदानामध्यें एकाएकीं जमा झाले! हे किती असतील! आतां यांची संख्या कसली मोजतां येते!—एखाद्या विस्तीर्ण रणमैदानावर लढाईच्या पूर्वीं दबा धरून बसलेल्या असंख्य शिपायांच्या पलटणी लढाईची वेळ आली म्हणजे जशा चोहों बाजूंनीं एकदम पुढें सरसावतात, त्याप्रमाणें या आकाशांतील गुप्त कटवाल्यांची स्थिति दिसत आहे!—हे ताऱ्यांनो, तुम्हांला गुप्त रीतीनें एकत्र जमा होण्याची ही हातोटी किती तरी छान साधली आहे! तुम्ही इतकेजण येथें जमलां, पण कोठें एक पाऊल तरी वाजलें आहे का! किंवा कोठें

थोडासा तरी गलबला झाला आहे का? किती गुपचूप पद्धत! इतक्या गुप्त रीतीनें तुम्ही वावरतां यावरून तुमच्यावर फारच कडक जुलूम चाललेला असला पाहिजे! रात्रीच्या अंधारांत तुम्ही लपून छपून येथें येतां यावरून दिवसास तुम्हांला एकमेकांपाशी आपलीं अंतःकरणें मोकळीं करून आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी सांगण्याची सक्त मनाई असली पाहिजे! अरेरे! इतक्या जाचांत तुम्हांला ठेवणारा असा कोणता तरी राजा तुमच्यावर जुलूम करीत आहे! आमची – या पृथ्वीतलावरील लोकांची – पुराणादिकांतील गोष्टींवरून साधारणपणें अशी समजूत झालेली आहे कीं, नरकलोक खालीं आहे आणि स्वर्गलोक वर आहे. पण छे छे! वरदेखील गुलामगिरीचा नरकलोक आहेच असें दिसतें! तुमच्यावर कोणता जुलमी राजा जुलूम करीत आहे? सांगा, सांगा, मला तुम्ही त्याचें नांव निर्भयपणानें सांगा. माझ्याबद्दल तुम्हांला यत्किंचित्‌हि शंका नको. मी कांहीं कोणी जुलमी राजांच्या जुलमाला मदत करणारा गुप्त हेर नव्हे. उलट मी तुमच्यासारखाच दुसऱ्या एका जुलमी राजाच्या जुलमानें गांजलेला प्राणी आहें. तुम्ही ज्या स्वतंत्रतेच्या प्राप्तीसाठीं गुप्त बेत करण्याकरितां या ठिकाणीं एकत्र जमले आहां, त्याच स्वतंत्रतादेवीचा मीहि एक उपासक आहें. तुम्हांला जसें कोणी तरी गुलाम बनविलें आहे त्याचप्रमाणें मी गुलामगिरीमध्यें सांपडलों आहें. पण या गुलामगिरीचे साखळदंड लवकरच तोडल्यावांचून मी कधीं राहणार नाहीं, असा माझा निश्चय आहे. असल्या मनुष्यापाशीं तुम्ही आपलें रहस्य सांगणार नाहीं, तर तुम्हांला माझ्यासारखा समदुःखी व माझ्यापेक्षां जास्त विश्वसनीय असा कोण स्वदेशभक्त भेटणार?—तेव्हां सांगा, मोकळ्या मनानें मला सांगा. तुमच्यावर कोण दुष्ट जुलूम करीत आहे? माझ्या देशाचें नांव हिंदुस्थान आहे; त्याप्रमाणें तुमच्या देशाचें नांव काय? तो आहे कोठें, आणि त्याची स्वतंत्रता गेली केव्हां? हें सगळें तुम्ही मला सांगा. तुमची स्वतंत्रता तुमच्या जुलमी राजानें कशा रीतीनें फसवून घेतली हें तुम्हीं मला आधीं सागा. बहुतकरून सगळ्या जुलमी राजांची फसविण्याची एकच तऱ्हा असते. त्यानें तुमच्यांत फूट पाडून तुम्हांला जिंकलें काय? आणखी त्यानें तुमच्या देशांत काय काय अनन्वित कृत्यें केलीं? बहुतकरून त्यानें तुमची

रत्नखचित देवळें तर खास फोडलीं असलीं पाहिजेत; कारण हे सर्व आकाशभर अस्ताव्यस्त पडलेले त्या भग्न करून टाकलेल्या देवळांच्या कोंदणांतील लखलखीत हिरे या गोष्टीची साक्ष स्पष्टपणें देत आहेत. इतके हिरे ज्यांनीं टाकून दिले त्यांनीं लुटून नेलेल्या हिऱ्यांची संख्या किती तरी प्रचंड असेल ! काय ही लूट ! आणि काय हा परचक्राचा भयंकर परिणाम ! आकाशांत हल्लीं जी जी मोकळी जागा दिसत आहे ती सगळी पूर्वीं हिऱ्यांच्या राशींनीं भरून गेलेली असेल ! आणि त्या राशी लुटारूंनीं आपल्या कंठाळींत भरून नेल्यामुळेंच बहुतकरून आतां ही मधून मधून हजारों ठिकाणीं रिकामी जागा पडली असली पाहिजे ! इतकी ही तुमची दुर्दशा कोणी केली ?—हे ताऱ्यांनो, नक्षत्रांनो, आणि ग्रहांनो, तुमचे इतके हाल होत असून ते तुम्ही मुकाट्यानें कसे सहन करतां ? तुमच्यापैकीं जे नवग्रह आहेत ते फार मोठे पराक्रमी म्हणून आमच्या मृत्युलोकांत त्यांची अतिशय ख्याति आहे. मग हे ग्रहांनो, तो तुमचा पराक्रम कोठें गेला ?—अथवा कसला पराक्रम आला आहे ? तुम्हां ग्रहांनादेखील केव्हां तरी ग्रहदशा असलीच पाहिजे ! आणि या गुलामगिरीच्या ग्रहदशेच्या फेऱ्यांत सापडलेल्या कोणाचाहि पराक्रम चालत नाहीं ! आणि हे नवग्रहांनो, या नियमाला तुम्हीहि अपवाद नाहीं. तुम्ही अनेक वेळां अनेक दानवांच्या गुलामगिरींत बांधलेले आहां, रावणानें तर तुम्हां नऊजणांना एकमेकांवर पालथे घालून आपल्या जिन्याच्या नऊ पायऱ्या केल्या होत्या ! गुलामगिरींत सांपडल्यावर कोणाचें शहाणपण चालत नाहीं. तुमच्यापैकीं मंगळ लढवय्या आहे, बुध बुद्धिमान् आहे, गुरु उत्कृष्ट मंत्री आहे, शुक्र अत्यंत कुशल आहे, आणि शनीसारखा उच्छेद करून टाकणारा दुसरा कोणी आढळणारच नाहीं ! मग हे मंगळ-बुधादिक ग्रहांनो, स्वराज्य आणि स्वतंत्रता यांच्याकरितां लागणारे सर्व आवश्यक गुण तुमच्या अंगांत असतांना तुम्ही असे रात्रीचे, अंधारांत, आणि निर्मानुष जागेंत चोरट्यासारखे गुप्त खल करण्याकरितां कां जमतां ? हे शनैश्वरा, तूं गरीबांच्या पाठीस लागून त्यांना आपल्या साडेसातींत बुडवून टाकतोस, तें तुझें विध्वंसक सामर्थ्य या जुलमी राजांवर तूं उपयोगांत कां आणीत नाहींस ? तुझी आज्ञा शिरसावंद्य मानून तुझ्याभोंवतीं सदोदित घिरट्या घालीत असणाऱ्या आपल्या सर्व उपग्रहांसहवर्तमान तूं या जुलमी

राजांना आपल्या पूर्ण दृष्टीच्या आकर्षणामध्यें आणून त्यांना रसातळाला कां नेऊन पोहोंचवीत नाहींस?—अथवा तुम्हीहि आम्हां मनुष्यांप्रमाणेंच गुलामगिरीचें जोखड झुगारून देण्याला असमर्थ आहां असें दिसतें. तरी पण तुम्ही सगळेजण रात्रीच्या अंधकारांत एकत्र जमून गुप्त विचार करीत आहां हें कांहीं वाईट नाहीं. तुम्ही स्वतंत्रतेच्या मार्गांत आहा, आणि तुमची ही गुप्त कट करण्याकरितां जमण्याची जागा तर फारच मजेदार आहे! आम्हांला जर अशी जागा मिळती तर किती छान झालें असतें! आमच्या या जमिनीवर कोठें कांहीं गुप्त गोष्ट बोलण्याची किंवा गुप्त बेत करण्याची सोय नाहीं. जिकडे जावें तिकडे चहाडखोर! हे ताऱ्यांनो, मी आपल्या साथीदारांना घेऊन आमच्या स्वतंत्रतेचे गुप्त कट करण्याकरितां तुमच्या या रमणीय जागेंत येऊन बसत जाऊं का? आम्हांला येथें कोठें चांगली जागा नाहीं. आमच्या ह्या जगांत फार घाण भरली आहे. दुष्ट, नीच, अधम, लबाड, विश्वासघातकी, अन्योन्यद्वेषी, क्षुद्र दृष्टीचे आणि स्थूल पातकांचे, अंतःकरणवृत्तीचे हलके आणि बुद्धीचे जड, अशा असंख्य प्राण्यांना यमाचे दूत नरकलोकाकडे नेत असता त्यांची नजर चुकवून ते या भूलोकांत शिरून येथील किल्ल्यांतून आणि राजवाड्यांतून दडून बसलेले आहेत. असल्या ठिकाणीं बसून कोणतेहि चांगले नवीन विचार मनांत उत्पन्न व्हावयाचे नाहींत. कारण, विषकुंडांत अमृतवल्ली कधींहि उगवत नाहींत. उलट जे उदात्त विचार असतील ते यांच्या या घाणेरड्या संसर्गानें कुजून आणि सडून गेल्यावांचून रहावयाचे नाहीत. म्हणून मी म्हणतों कीं, हे ताऱ्यांनो, आम्ही तुमच्या त्या जागेंत गुप्त बेत करण्याकरितां येऊं का? ती तुमची जागा किती शान्त दिसत आहे! तेथें जाऊन एखाद्या ढगावर बसावें असें वाटतें! आम्ही सगळे साथीदार जमून तेथे आलों तर खात्रीनें तेथें आम्हांला आपल्या स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या प्राप्तीचे कांहीं तरी उत्कृष्ट विचार सुचतील असें मला वाटतें. आम्ही तेथें येऊ का? तुमच्या जागेंतील ही रात्र किती प्रशान्त, गंभीर आणि रमणीय दिसत आहे! आम्हांला पृथ्वीतलावर अशा रात्री फार दुर्मिळ असतात. येथील रात्री म्हणजे सगळ्या दुष्ट आणि निंद्य कर्मांच्या हंगामाची वेळ! व्याभिचार, वेश्यागमन, मद्यपान, जुगार, नाच, तमाशे, बीभत्सपणा, चहाड्या, घरें फोडणें, आगी लावणें,

दरवडे, गुप्त छापे, खून वगैरे सर्व लहानमोठ्या पातकांच्या गर्दीनें येथील रात्रींचा शान्तपणा अगदीं गजबजून गेलेला असतो ! येथें कोणाला गुलाम-गिरीचा तिटकारा नाहीं, आणि तोंडपुजेपणाचा वीट नाहीं. आपसांत भांडत बसण्याबद्दल कोणाला लाज नाहीं, व क्षुद्र हेतु साधून घेण्यांतच मोठेपणा आहे असें मानण्यांत कोणाला कमीपणा वाटत नाहीं. असल्या जगापासून अलिप्त होण्याकरितां भणभर तरी आम्ही वर येऊं का ? हे ताऱ्यांनो, तुमच्या प्रकाशाच्या किरणासारख्या दिसणाऱ्या तुमच्या त्या सोन्याच्या तारेनें विणलेल्या दोरखंडाच्या दोऱ्या जरा खालीं सोडाल काय ? म्हणजे आम्ही सगळेजण पटापट त्यांना धरून वर चढून येऊं. आमच्यापैकीं सगळ्या सार्थीदारांना दोरीला धरून उंच उंच किल्ले चढण्याची चांगली संवय आहे. आम्हीं तुम्हांला ही तसदी दिली नसती, पण काय करावें ? देवाच्या पक्षपातापुढें कोणाचाच इलाज नाही यःकश्चित् पक्ष्यांनादेखील त्या देवानें पंख दिले आहेत; मग मनुष्यांवरच त्याची इतकी इतराजी कां झाली कोण जाणे ! अतिशय सूक्ष्म आणि परमाणुप्राय अशी जी कल्पनाशक्ति तिला-देखील पंख आहेत ! पण हा मनुष्याचा इतका स्थूल देह असून त्यांच्या हातांत अंतरिक्षांतील स्वेच्छाचाराचें कांहींएक साधन ठेविलेलें नाहीं ! पाण्यावर पोहतां येण्याची तरी शक्ति देवानें मनुष्याच्या अंगांत ठेविली आहे, ही एक त्याची मेहेरबानीच समजावयाची ! नाहीं तर त्यानें मनुष्याला ज्याप्रमाणें अकलेनें दगड केलें आहे, त्याचप्रमाणें वजनानेंहि दगड केलें असतें तर बिचारा मनुष्यप्राणी काय करणार होता ! शरीराच्या पंचीकरणाच्या वेळीं या कातडीच्या पोत्यांत देवानें हे मातीचे गोळे जरा कमी भरले असते, तर आम्ही तुमच्या या शान्त आणि रमणीय देशाच्या सरहद्दीवर येऊन तेथें किती तरी उपयुक्त गोष्टी केल्या असत्या. आमच्या-वर जुलूम करणारे लोक आपल्या उंच उंच प्रतोलिकांवर आमच्या देशांतील साध्वी स्त्रियांना धरून नेऊन जो गुप्त बलात्कार करीत असतात, तो आम्हीं वरून पकडला असता, आणि आकाशांतील एखाद्या ढगाच्या अंतर्भागांत एखाद्या गुतीप्रमाणें गुप्त असलेली वीज क्षणभर उचलून घेऊन ती त्या दुष्ट अधमांच्या डोक्यांवर वरून खालीं फेंकून दिली असती ! शत्रूच्या सैन्याची आम्हीं वरून टेहळणी केली असती, आणि त्याची

सगळी छावणी पूर्णपणें चिरडून जाईपर्यंत वरून आम्हीं ढगांचे ढीगच्या ढीग खालीं ढकलून दिले असते !—पण देव फार मत्सरी आहेत. ते आकाशांत मनुष्याला येऊं देत नाहींत. त्रिशंकु राजालादेखील अर्ध्या वाटेंत अडवण्यांत आलें ! पण ते मनुष्याला अक्कल देऊन चुकलेले आहेत, आणि याबद्दल त्यांना लवकरच केव्हां तरी पश्चात्ताप झाल्यावांचून राहणार नाहीं. —पण हे ताऱ्यांनो, आम्हांला वर येतां आलें नाहीं, तर निदान तुमचे काय काय बेत चालले आहेत ते तरी मला कळूं द्या. तुम्ही एक-मेकांशीं काय काय बोलत आहां ? तुमचे विचार काय चालले आहेत ? तुमच्या-वर जो राजा जुलूम करीत आहे, त्याचा तुमच्या देशांतून उच्छेद करून टाकण्यासाठीं तुम्ही काय उपाय योजीत आहां ? तुमच्यापैकीं कोणी एकमेकांच्या कानाशीं लागून कांहीं कानगोष्टी करीत आहेत; कोणी हातांत हात घालून बसले आहेत; कोणी आपआपल्या पुढाऱ्यांच्या सभोंवतीं वर्तुळ करून त्याची सल्लामसलत ऐकत आहेत; आणि कोणी एकटेच एकीकडे जाऊन विचार करीत आहेत. पण या सगळ्या खलबतांनंतर तुमचा अखेर निकाल काय ठरतो तो कोणी तरी मला सांगा. आमच्या देशांत त्याची फार आवश्यकता आहे; म्हणून मी एवढ्या काकुळतीला येऊन तुमची याचना करीत आहें. तुमचीं काय बोलणीं चाललीं आहेत तीं मी कान लावून ऐकत आहे, पण कांहीं ऐकूं येत नाहीं. तेव्हां तुम्हींच होऊन कांहीं सांगितलें तर तें मला कळण्याचा मार्ग आहे; — किंवा अजून पारतंत्र्याचें जोखड कसें मोडावें, आणि स्वातंत्र्याचें निशाण कसें उभारावें, याच्याबद्दल तुमचा कांहीं निश्चय ठरलाच नाहीं ? पण वास्तविक तुम्हांला इतकी अडचण पडूं नये. प्रत्यक्ष बृहस्पतीसारखे वक्ते तुमच्या या सभेंत हजर आहेत. राजधर्म, दंडनीति इत्यादिकांचा मुख्य प्रवर्तयिता जो देवयानीपिता शुक्र तो तुम्हांला मसलत सांगण्याला बसलेला आहे. सप्तऋषि आकाशगंगेच्या निर्मळ प्रवाहांत स्नान करून तुमच्या स्वतंत्रतेकरितां ध्रुववृक्षाच्या पारासभोंवतीं प्रत्यहीं प्रदक्षिणा घालून तपश्चर्या करीत आहेत. अरुंधतीसारख्या पवित्र स्त्रियांच्या पातिव्रत्याच्या तेजाचीहि तुमच्या देशकार्याला मदत आहे. शत्रूशीं नेटानें टक्कर देणारे त्या अश्विनी नक्षत्राजवळील मेषासारखे योद्धे तुमच्यामध्यें आहेत. सर्व पशूंचा राजा आणि बलानें अति बलाढ्य असा जो

सिंह त्याचेंहि साहाय्य तुम्हांला आहे. इतकी सामग्री जवळ असतां तुमच्या स्वातंत्र्यप्राप्तीचे बेत अजून कायम होत नाहींत, हें मोठें आश्चर्य आहे. याच्या निम्मे सामग्री माझ्या हातीं येती तरीदेखील मी आपला देश केव्हांच स्वतंत्र करून सोडला असता.—अरे, हे मृगशीर्ष नक्षत्रांतील व्याधा, मी तुला असा हा बाण मारतांना किती तरी दिवस पाहात आहे! आतां हें तुझें शरसंधान पुरे. तो बिचारा मृग कधींच मरण पावलेला आहे. मग आतां रोजरोज तूं त्याच्या पाठीमागें कां धांवत असतोस? आणि त्याच्या पोटांत रोज तूं आपला बाण कां फेंकीत असतोस? मेलेल्यांना मारण्यांत किंवा गरीब मृगांची मृगया करीत बसण्यांत व्यर्थ कालक्षेप करून कांहीं मोठा पुरुषार्थ साधतो असें नाहीं. अरे, तुझे हे सगळे इतके देशबांधव आपल्या देशाच्या स्वतंत्रतेकरितां गुप्त बेत करीत असतां तूं आपल्या भात्यांतील बाण या मृगयेमध्यें व्यर्थ दवडीत आहेस, त्या तुला काय म्हणावें? तुझ्या हातांत परमेश्वरानें जे धनुष्यबाण दिले आहेत ते या गरीब मृगांना मारण्याकरितां नव्हेत, तर तुझ्या स्वतंत्रतेचे जे शत्रु असतील त्यांना . . . . . ते आहेत.—हे कृत्तिकांनो, तुम्ही या गुप्त मंडळींमध्यें हजर असतांना या मंडळींचें देशकार्य साधूं नये, हे शक्य तरी कोण मानील? जगांतील सगळ्या सेनापतींचा आदिगुरु—देवांचा शिवाजी—जो षडानन त्याला तारकासुराच्या वधाकरितां आणि देवांच्या स्वातंत्र्याकरितां तुम्हीं धात्रीप्रमाणें आपल्या दिव्य शक्तीचें दूध पाजून वाढविलें, त्या तुमच्या दुधांतील शक्ति आजच कशी नाहींशी झाली? त्या पहिल्या दिव्य सेनानीच्या मुखस्पर्शानें पवित्र झालेला तो दुधाचा झरा कधींहि आटावयाचा नाहीं. जेव्हां जेव्हां जुलमी दैत्य गरीब प्रजेला छळतील, तेव्हा तेव्हां त्याचें जोखड झुगारून देऊं इच्छिणाऱ्या भावी लोकांच्या चेतनेकरितां दूरदर्शी आणि परोपकारी भगवान् षडाननानें तें अमृततुल्य दुग्ध मुद्दाम कांहीं तरी अवशिष्ट ठेवलेलें असलें पाहिजे. त्याच दुग्धाचे बिंदु प्राशन करून श्रीरामचंद्र, युधिष्ठिर, चंद्रगुप्त, भोज, मान्धाता, पृथ्वीराज आदिकरून महान् महान् महाभाग महाराजांनीं या आर्यमहीचें स्वातंत्र्य परकीयांपासून कायम राखण्याचे प्रयत्न केले. हे कृत्तिकांनो, अशा त्या पवित्र पूर्वपीठिकेच्या दुग्धापैकीं मला एक थेंब तुम्हीं दिला

तरी मी या परकीय लोकांच्या जाचांतून आपल्या देशाला स्वतंत्र करीन! —पण थांबा; तें दूध माझ्या तोंडांत घालतांना कदाचित् एकदम फार पडेल असें मात्र करूं नका. कारण, या स्वतंत्रतेच्या रसायनाची हल्लींच्यापेक्षां पुढें जास्त गरज लागणार आहे. त्या वेळेकरितां हा दिव्यरस फार जपून ठेवा.—हे ताऱ्यांनो, ज्या दुग्धाच्या प्रभावानें इतर लोक स्वतंत्र होऊं शकतात, तें तुमच्या इतकें सान्निध असतांना मग तुम्ही इतक्या चिंतेंत कां पडलां आहां? आणि शिवाय इतकेजण असून तुम्ही आधीं परतन्त्रतेंत पडलांच कसे? आणि पडल्यावर अजून त्यांतून निघूं शकत नाहीं कसे? मला वाटतें, आमच्या हिंदुस्थानपेक्षां तुमच्या देशाची लोकसंख्या पुष्कळच कोटींनीं जास्त असली पाहिजे. तुम्ही इतके कोटि लोक एकत्र झालां तर आपल्या तेजानें वाटेल त्याचें भस्म करून टाकाल आणि वाटेल तसला अंधकार असला तरी तो प्रकाशित कराल. मग तुम्ही एकदिल कां करीत नाहीं? तुमचीं शरीरें फक्त एकत्र झालेलीं दिसतात; पण तुमचीं मनें आमच्यासारखींच एकमेकांपासून विलग आहेत कीं काय? मला जर आपल्या देशांतील इतके लोक गुप्तपणाने एकत्र करण्याला तुमच्यासारखी जागा मिळती तर मीं सगळ्यांचीं मनें एका क्षणांत आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या बाबतींत एक करून टाकलीं असतीं. तुमच्यामध्यें परस्पराकर्षण आहे म्हणून म्हणतात; पण तुम्हांला परस्परांचीं मनें आकर्षण करून घेण्याची विद्या अद्यापि साध्य झालेली नाहीं असें दिसतें.—आणखी दुसरी गोष्ट अशी कीं, मी तुम्हांला असे रात्रींच्या प्रहरीं लपून छपून जमतांना येथें आज कित्येक वर्षें पाहात आहें, तरी अजून तुमचे राज्य-क्रान्तीचे बेत कांहींच ठरत नाहींत हें कसें? इतक्या सगळ्या रात्री तुम्हीं विचार करण्यांतच फुकट दवडतां? अतिविचार कार्यविघातक असतो. आणि राजकारणांत दीर्घसूत्रीपणा बिलकुल उपयोगी नाहीं, हीं तत्त्वें तुम्हांला समजतात ना? तुम्ही माझ्या प्रश्नाचें कांहींच उत्तर देत नाहीं. माझा आवाज तुम्हांला ऐकू येत आहे ना? किंवा तुमच्यामध्यें श्रवणशक्तिच नाहीं? किंवा कोणी म्हणतात तसे तुम्ही खरोखर जड तर नाहीं? किंवा मी ज्यांना उद्देशून बोलत आहें ते त्या आकाशगंगेच्या वाळवंटातील नुसते निरनिराळे पडलेले सोन्याचे कणच आहेत? किंवा वर्षाऋतूच्या प्रारंभीं जो

विजेचा सोनेरी पत्रा आकाशांत लखलखत आणि कडकड वाजत होता तो आतांशा कोठें दिसत नाहीं; त्याचे तर कोणी लहान लहान तुकडे करून फेंकून दिलेले नाहींत? बहुतकरून हाच तर्क खरा असला पाहिजे. कारण, जेव्हां हे सोन्याचे कण दिसत असतात त्या वेळेला तो विजेचा पत्रा दिसत नाहीं. आणि तो विजेचा पत्रा दिसत असतो तेव्हां ते सोन्याचे कण दिसत नाहींत. मला वाटतें, वर कोणी तरी एक प्रचंड शक्तीचा सुवर्णकार आपली ऐरण आणि घण घेऊन बसलेला असला पाहिजे; व पावसाळ्याचे दिवस जवळ आले म्हणजे तो हे सगळे सोन्याचे कण एका ठिकाणीं ठोकून त्यांच्यापासूनच तो विजेचा सोनेरी पत्रा तयार करीत असला पाहिजे!— पण असें म्हणावें तर सोन्यापेक्षांहि त्यांचें तेज जास्त दिसत आहे. शुद्ध हिऱ्यासारखे हे दिसत आहेत. तेव्हां ही उपडी ठेवलेली अथवा खालून वर पोखरली जाणारी एखादी हिऱ्यांची खाण तर नसेल?—हीच कल्पना बरोबर दिसते. कारण, हे हिरे वरून खालीं पडतांना पुष्कळ वेळां आढळतात. लोक त्यांना तारा तुटून खालीं पडला असें म्हणतात. पण त्यांत कांहीं तथ्य नाहीं. हे हिऱ्यांचे दगड वरच्या उपड्या खाणींतून खालीं जमिनीवर पडतांना त्यांचीं जीं दूरपतनामुळें झालेलीं व जमिनींत खोल गेलेलीं लहान छकलें सांपडतात त्यांनाच येथील लोक हिरे, माणकें, पाच, शनीचे दगड वगैरे नांवें देतात. पण ही कल्पनाहि जुळत नाहीं. कारण यांच्या ठिकाणीं गति आहे. तेव्हां हे कोणी तरी दैदीप्यमान् पुण्यवान् पुरुषच असले पाहिजेत. जे पुण्यकर्म करतात ते मरणोत्तर दिव्य देह धारण करून आकाशांत तारे होऊन बसतात अशी लोकांमध्यें एक समजूत आहे, ती खरी असली पाहिजे.—तर मग हे पुण्यवान् पुरुषांनो, चालूं द्या. तुमचे स्वतंत्रतेबद्दलचे गुप्त कट अव्याहत चालूं द्या. पुण्यवान् लोकांच्या कोणत्याहि कृत्याला यश आल्यावांचून राहावयाचें नाहीं.—परंतु मध्यरात्रीं पूर्वरात्रीं तुमच्या गुप्त बैठकींत जितकीं माणसें दिसत होतीं तितकीं आतां पहाटेस कां दिसत नाहींत? आणि तुमच्यांतील हे कांहीं कांहीं लोक तुमच्या सभेंतून उठून कां जाऊं लागले आहेत?—अहो! काय हा चमत्कार! मी पाहतां पाहतां तुमच्यांतील बरेच असामी सभास्थानापासून पार नाहींसे झाले! तुम्हांला कोणीं इशारत दिली? आतां उजाडण्याची

वेळ होत आली, आपले शत्रु आपल्याला पाहतील, आतां आपण चौघांनीं चोहोंकडे पांगून जाण्याची वेळ आली आहे, याबद्दलची सूचना तुम्हांला कोणीं दिली ?—हं, समजलों ! पृथ्वीतलावर कानोसा घेण्याकरितां मुद्दाम दूरदूरच्या निरनिराळ्या पहाऱ्याच्या ठिकाणीं तुम्हीं जे पक्षी ठेविले होते ते तुमच्या खुणेच्या शब्दांचीं गाणीं भैरवी रागामध्यें गात गात आकाशांत तुमच्याकडे उंच उडत येऊन त्यांनींच बहुतकरून तुम्हांला ही इशारत दिली असली पाहिजे.—एकूण, तुमच्या कटामध्यें हे पक्षीदेखील सामील आहेत ना ? अथवा त्यांत काय आश्चर्य आहे ! स्वतंत्रतेच्या पक्षाला कोण पाहिजे तो मदत करील !—ठीक आहे ! ताऱ्यांनो, जा; तुम्ही आतां लवकर जा. मागें उगीच रेंगाळत राहून शत्रूच्या दृष्टीस पडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जा, लवकर जा. स्वातंत्र्याबद्दल खटपट करणारा कोणताहि मनुष्य शत्रूच्या हातीं न सांपडावा म्हणून मला तुमची फार काळजी वाटते. म्हणून मी तुम्हांला विनंति करतों कीं, तुम्ही आतां या संकेतस्थानापासून लवकर नाहींसे व्हा. ही पाहा पूर्वदिशा आरक्त झाली. आणि हा पाहा जगातील पहिला रंगारी जो भगवान् सूर्यनारायण तो आपल्या कलमानें सर्व उंच पर्वतांच्या शिखरांना संधिप्रकाशाचा तांबूस रंग देऊं लागला !"

असें म्हणून शिवाजी आकाशाकडे पाहतो तों बहुतेक सर्व आकाश स्वच्छ झालेलें त्याला दिसलें, आणि कोणीहि कटवाला मागें उरलेला नाहीं असें पाहून त्याला आनंद झाला. आणि नंतर त्यानें आपल्या देशाच्या स्वतंत्रतेकडे फिरून आपलें लक्ष वळवलें.



आतांशा पारधी लोक जसें शुष्क मांस आम्हांला आणून देतात तसें आम्ही शिजवून देतों.' पुढें त्या पारध्यांना आणून विचारलें. तेव्हां त्यांनीं अरण्यांतील सर्व हकीकत राजाला सांगितली. 'कोणी एक ब्राह्मण येथून जवळच्याच एका पर्वतावर बसला आहे. तो फार प्रेमळ वाणीनें कोणा एका उत्कृष्ट ग्रंथाचें एकेक पान वाचतो आणि अग्नींत टाकतो. तें काव्य ऐकण्याकरितां अरण्यांतील सर्व प्राणी त्याच्याभोंवतीं येऊन बसले आहेत. ते तेथून हालत नाहींत, आणि कांहीं खात नाहींत कीं पीत नाहींत. त्यामुळें त्यांच्या सगळ्यांच्या शरीरांतील मांस शुष्क होऊन गेलेलें आहे. तेव्हां आम्हीं तरी त्याला काय करावें?' ही हकीकत ऐकून सातवाहनाला मोठें आश्चर्य वाटलें, आणि हा काय प्रकार आहे तो पाहण्याकरितां तो स्वतः अरण्याकडे निघाला. तेथें आल्यावर त्याला समजलें कीं, ज्याच्या ग्रंथाचा आपण धिक्कार केला होता, तोच हा गुणाढ्य असून दुःखातिरेकामुळें तो आपल्या ग्रंथाचें एकेक पान शेवटचें वाचून घेऊन तें अग्नीमध्यें टाकीत आहे. हें पाहून राजाला फार वाईट वाटलें, आणि ज्या ग्रंथाचें श्रवण करीत असतां पशुपक्षीहि चित्रासारखे तटस्थ होतात, आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रु वाहात असतात, त्या ग्रंथामध्यें खरोखरच कांहीं तरी अद्वितीय गुण असले पाहिजेत, अशी राजाची खात्री झाली. आणि ज्या ग्रंथाचें स्वारस्य पशुपक्ष्यांनाहि कळलें, त्याचें स्वारस्य मनुष्याला कळलें नाहीं, याबद्दल त्याला मोठी लज्जा वाटली. मग पश्चात्तापानें संतप्त होऊन त्यानें गुणाढ्याचे पाय धरले. परंतु गुणाढ्य म्हणाला, 'राजा, आतां काय उपयोग? माझा सहा लक्ष ग्रंथ अशा रीतीनें आतांपर्यंत जळून गेला आहे.' राजा म्हणाला, 'झाल्या अपराधाची क्षमा करून उरलेला ग्रंथ तरी मला द्यावा.' तेव्हां ती गोष्ट गुणाढ्यानें मान्य केली, आणि बृहत्कथेपैकीं एक लक्ष तरी ग्रंथ जगांत आज शिल्लक राहिला आहे. नाहीं तर तोहि जळून गेला असता. परंतु सहा लक्ष ग्रंथ ह्या जगांतून नाहींसा झाला तो झालाच! ही काय गुणाढ्याची लहान हानि झाली आहे? त्या श्यामसुंदर श्रीकृष्णाच्या मुरलीरवाप्रमाणेंच तें मनमोहन काव्य ऐकून वनांतील वन्य पशुपक्षीहि तहानभूक विसरून तटस्थ बसले, आणि अश्रु गाळूं लागले, तें सहा लक्ष काव्य ज्या कवीचें दग्ध झालें, त्याचें या जगामध्यें काय दग्ध

व्हावयाचें उरलें होतें ? तरी पण त्यानें तें सोसलें ना ? भासा, हे दुष्ट लोक जगामध्यें नेहमीं कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपामध्यें उत्पन्न झालेले असतातच. त्यांनीं तुझीं काव्यें जशा अग्नींत टाकलीं, तशींच अगदीं अलिकडे त्यांनीं तुकाराममहाराजांच्या अभंगांची अप्रतिम गाथा पाण्यामध्यें बुडविली ! दुष्टांचे हात कोणत्याहि काळीं धरले किंवा तोडले जात नाहींत ! तुकारामासारख्या साधुपुरुषाची कविता बुडविण्याची कल्पना ज्यांच्या मनामध्यें आली, त्यांच्या मनाची रचना देवानें कोणत्या द्रव्यानें केलेली होती हें कोण जाणूं शकणार आहे ? पण, भासा, अशा एकेक कवीचीं उदाहरणें किती सांगावीं ? जसा सबंध अरण्याला वणवा लावून त्यांतील सर्व वृक्ष एकदम जाळण्यांत येतात, त्याप्रमाणेंहि कित्येक घोर-कर्म्या राजांनीं एकदम असंख्य ग्रंथाच्या राशींच्या राशी जाळल्याचीं उदाहरणें इतिहासामध्यें नाहींत काय ? मिसर देशामध्यें अलेक्झांड्रिया या नांवाचें मोठें शहर आहे. तेथें अनेक विद्वानांनीं लिहिलेल्या असंख्य ग्रंथांचा फार मोठा संग्रह होता. तें शहर उमर नांवाच्या एका यवन राजानें काबीज केलें. त्या वेळीं तेथील सगळे ग्रंथ जाळून टाकण्याविषयीं त्यानें हुकूम केला. त्या हुकुमाप्रमाणें चार हजार स्नानगृहातून पाणी तापविण्या-करितां ते ग्रंथ वांटून टाकण्यांत आले. आणि ते अगदीं सर्पण प्रत्येक ठिकाणीं सहा सहा महिने भरपूर पुरलें असें सांगतात ! यांत किती ग्रंथकारांची नक्कल झाली असेल याची कोणाला कांहीं तरी कल्पना करतां येण्यासारखी आहे काय ! इतक्या लोकांच्या ग्रंथांची होळी पेटलेली पाहिली असतां मग आपले ग्रंथ नष्ट झाल्याचें कांहींच वाटत नाहींसें होतें, असें तुला वाटत नाहीं काय ! आपल्या कपाळीं असेंच होतें, असें म्हणून स्वस्थ बसण्याशिवाय अशा गोष्टीला दुसरा काय उपाय आहे ?

भासा, तुला पूर्वजन्मींचें तुझें चरित्र कांहीं आठवतें का ? पूर्वीं कधीं तूं एखाद्या हरिणाचीं पाडसें मारिलीं होतींस काय, किंवा एखाद्या वेलीचीं फुलें नासून टाकलीं होतींस काय, कीं ज्यामुळें तुझ्यावर असा प्रसंग यावा ! परंतु तुझ्यासारख्या प्रेमळ रसिकाच्या हातून असला अपराध घडेल तरी कसा ?

भासा, तुझ्या वेळचे सगळे कवी हल्लींच्या वाङ्मयांत हयात आहेत,

आणि तूं मात्र त्यांच्यामध्यें नाहींस ! [illegible] एखाद्या ग्रहमालिकेमध्यें पूर्वीं एकदां कांहीं तारे चमकत असावेत, परंतु बाकीचे आपापल्या जागीं कायम राहून त्यांतील एखादाच तेजस्वी तारा आकाशांतून तुटून नाहींसा व्हावा, आणि त्याची आकाशांतील जागा रिकामी पडावी व शून्य दिसावी, त्याप्रमाणें वाङ्मयाच्या अंतरिक्षांतून तुटून गेलेल्या हे भासमान् ताऱ्या, भासा, तुझी अवस्था झाली आहे ! कालिदास, दण्डी, भवभूति, बाण, इत्यादि संस्कृत वाङ्मयाचे प्रवर्तक महर्षि आपआपल्या आसनावर बसून काव्यधर्माचें प्रवचन करीत असतां तूंच आपल्या आसनावरून उठून कोणीकडे अदृश्य झाला आहेस !

ज्या जलाशयाच्या लाटा उचंबळलेल्या पाहून तुझ्या अंतःकरणामध्यें काव्यकल्पनांच्या लाटा उचबळत असत, ते जलाशय कोरडे पडून आज जसे नाहींसे झालेले असतील, त्याप्रमाणें त्यांच्याबरोबर तूंहि नाहींसा झालेला आहेस ! ज्या फुलांनीं, वेलींनीं, पशूंनीं, पक्ष्यांनीं, तुझ्या मनामध्यें पहिली कवित्वाची स्फूर्ति जागृत केली तीं राहिलीं नाहींत, म्हणून त्यांच्या दुःखानें त्यांच्याबरोबर सहगमन करून तूं नाहींसा झालास काय ! परंतु, भासा, तुझ्या प्रतिभेला उद्दीपित करणाऱ्यांपैकीं दुसऱ्या वस्तू अद्यापि थोड्या का अवशिष्ट आहेत ! स्वच्छ आकाश, पौर्णिमेचा पूर्ण चंद्र, ज्योत्स्नेचे अमृतप्रवाह, सुंदर दिग्वधू, मंजुळ वायु, हे सगळे कवितेचे कायमचे खेळगडी आहेत ! हे जसे निरंतर टिकणारे आहेत, त्याप्रमाणें तुझी कविताहि निरंतर टिकावयाला योग्य होती. परंतु अमरांना मृत्यु यावा, त्याप्रमाणें तुझ्या काव्याची आज दशा झाली आहे ! तुझें काव्य जळून नष्ट व्हावयाचें आहे, असें जर तुझ्या वेळच्या रसिक लोकांना समजलें असतें, तर त्यांनीं तें वेदाप्रमाणें सर्व मुखोद्गत करून आपल्या स्मृतीमध्यें सांठवून ठेविलें असतें, आणि तें पितृधन म्हणून मोठ्या प्रेमानें फक्त आपल्या आवडत्या मुलांच्याच स्वाधीन त्यांनीं केलें असतें ! परंतु असें होणार हें आधीं कोणाला कळलें होतें ? एखादी जिन्नस हरवली असली, तर ती सांपडण्याचा कदाचित् संभव असतो; पण आपले ग्रंथ जाळले, ते आतां फिरून हातीं कसचे लागणार, असे विचार मनांत येऊन, हे भासा, तुझा आत्मा निराश होत असेल.

पण, हे भासाच्या आत्म्या, तूं असा निराश होऊं नको. परमेश्वर या जगांत जोंपर्यंत हयात आहे, तोंपर्यंत दुष्ट लोकांनीं कितीहि अपकार केले, तरी कोणालाहि निराश होण्याचें कारण नाहीं. ज्यानें बुडणारी श्रुति मत्स्यरूपानें तारली, ज्यानें ज्वाळामध्यें प्रविष्ट झालेली सीतादेवी प्रत्यक्ष अग्नीच्याहि हातून श्रीरामचंद्राच्या हातीं आणून दिली, आणि ज्यानें तुकारामाच्या अभंगांची गाथा श्रीपांडुरंगाच्या रूपानें इंद्रायणीच्या डोहांतून कोरडीच्या कोरडी वर काढून आणली, तोच परमेश्वर तुझ्याहि कवितेच्या पाठीमागें उभा आहे ! तो पाहा ! तो या जगांतील जरूरीची अशी कोणतीहि चांगली गोष्ट नाहींशी होऊं देणार नाहीं ! भासा, तुझीं कांहीं नाटकें त्याच्या प्रेरणेनें हल्लीं उपलब्ध झालेलीं आहेत, आणि कांहीं उपब्लध होण्याचा अजून संभव आहे. परमेश्वराची कृपादृष्टि वळल्यावर कोणता निधि उपलब्ध होणार नाहीं ! भासा, लावणकांत जळलेली वत्सराजाची वासवदत्ता जशी फिरून जिवंत झाली, तशी तुझी वासवदत्ताहि फिरून जिवंत झालेली आहे ! आपल्या गुरूचीं मुलें जशीं भगवंतांनीं परत आणून दिलीं, तशीं तुझीं नाटकें पुनरुज्जीवित झालीं आहेत. तीं वाचून सर्व रसिकांना किती आनंद होत आहे पाहा. त्यांच्या चर्या बदलल्या आहेत. त्यांचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत, आणि त्यांचीं मनें प्रसन्न झालीं आहेत. हे भासाच्या आत्म्या, आतां तूं शान्त हो, आणि ब्रह्मलोकांत आनंदामध्यें ऐस !

